## विषयानुक्रम

# आमुख

" सौन्दर्यलहरी " या श्रीशंकराचार्यांच्या स्तोत्रावरील कै प्रा ह बा भिडे यांची संशोधित हस्तलिखित टीका लेखकाच्या निधनानंतर सुमार चार वर्षांनीं या स्वरूपात प्रकाशित होत आहे हे संबंधित जाणत्यांच्या लक्षात येईलच माझे दिवंगत पति कै प्रा ह बा भिडे यांचे समर्थ छायाछत्र काळानें हिरावून नेल्यानंतर हें त्यांचे हस्तलिखित कव्हा व कसें प्रकाशित करू शकेन याबद्दल मी साशंक होते परंतु भगवती महात्रिपुरसुन्दरीच्या सहस्र रूपानीं प्रगट झालेले समर्थ आशीर्वाद व दिवंगत पतीची पुण्याई यामुळेंच मला अनभिज्ञ असलेल्या क्षेत्रातील हें अवघड कर्तव्य मी उत्तम प्रकार पार पाडू शकले दिवंगत पतीच्या पश्चात् इतक्या कालावधीनंतर का होईना सदर हस्तलिखित प्रकाशनाचा प्रकाश पाहू शकलें हाच मी भगवती श्रीत्रिपुरसुन्दरीचा कृपाप्रसाद व माझें इतिकर्तव्य मानते

हे प्रकाशन निर्विघ्नपणें तडीस नेण्याची संपूर्ण जबाबदारी पुणें विद्यापीठातील विद्वान व्यासंगी डॉ इ डी कुलकर्णी, एम ए, पीच् डी व त्यांचे स्नेही श्री दामुअण्णा रानडे या दोघानीं प्रथम भेटी — चाकशींतच मोकळेपणीं स्वीकारून पार पाडली या प्रकाशनासाठीं या दोघानाहि आपल्या व्यावसायिक कामाच्या गर्दीत वेळात वेळ काढावा लागल्यानें शारीरिक व मानसिक ताण प्रकर्षानं सहन करावा लागला व आर्थिक झीजहि सोसावी लागली आहे याची मला जाणीव आहे व त्याबद्दल या दोघांची मी कधींहि उतराई होऊ शकणार नाहीं तसेच नीलकण्ठ प्रकाशनचे श्री प्रकाश रानडे यांचेहि आम्हाला बहुमोल साहाय्य झाले आहे त्याबद्दल मी त्यांची आभारी आहे

या ग्रंथाच्या प्रकाशनास महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें उत्स्फूर्त साहाय्य केलें हें कै प्रा भिडे यांच्या पुण्याईचें व भगवती श्रीत्रिपुरसुन्दरीच्या आशीर्वादाचें प्रसाद चिह्नच म्हणावें लागेल लेखकाच्या पश्चात् प्रकाशन करणाऱ्या आम्हास हे अनुदान वरदानच ठरलें व हा ग्रंथ यावेळीं तरी प्रकाशित होऊ शकला या उदार अनुदानाबद्दल महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाची मी अतिशय आभारी आहे

के. ग्रा. भिडे यांचे गुरुबन्धु श्री. के ग. लवळेकर हे तन्त्रमार्गातील एक अनुभवी अधिकारी आहेत. त्यांच्या प्रेमळ व निग्रही पाठिंब्यामुळें हें कार्य पार पडूं शकलें वार्धक्य व प्रकृतीचें अस्वास्थ्य याची तमा न बाळगतां त्यांनीं जें श्रम घेतलें आहेत त्याबद्दल मी त्यांचीहि कृतज्ञ आहे. गुरुबन्धु श्री. लवळेकर यांचे सुपुत्र श्री. रघुनाथराव यांनीं हे काम आपलेंच आहे या जाणीवेनें प्रकाशनाचें कामीं जी मेहनत घेतली आहे ती त्यांच्या कर्तव्य-भावनेच्या चौकटींत बसत असली तरी मी त्यांच्या साहाय्याचे महत्त्व उणावूं शकत नाहीं. त्यांचें आपुलकीचें व कळकळीचें साहाय्य झालें म्हणूनच सर्व यन्त्रांसह या ग्रंथप्रकाशनाचें काम पूर्ण होऊं शकले. या त्यांच्या आपुलकीचें महत्त्व मी विसरूं शकत नाहीं.

श्री. यशवंत नारायण उर्फ अण्णासाहेब वैशंपायन यांनीं प्रकृति-स्वास्थ्याकडे न बघतां यन्त्रें वेळेवर तयार करून दिलीं याबद्दल त्यांचे आभार मानणें आवश्यक आहे

गुरुबन्धु श्री. ना. सि. भट यांच्या साहाय्यामुळें यन्त्रांच्या मूळ उद्धृतिस्थानांवरून यन्त्रांच्या वास्तवतेबद्दल व परंपरेबद्दल निश्चिती करून घेतां आली, त्याबद्दल मी त्यांची उपकृत आहे.

सौन्दर्यलहरीच्या या प्रकाशनांत श्लोक २८ व ९३ हे दोन श्लोक द्विरुक्तीचा दोष पत्करून स्वीकारले आहेत. या द्विरुक्तीमागील भूमिका स्पष्ट केल्याशिवाय हें आमुख अपूर्ण राहील ही द्विरुक्ति स्वीकारण्याची जबाबदारी केवळ माझीच आहे. दिवंगत पतीच्या मूळ हस्तलिखितांत उपरिनिर्दिष्ट श्लोक २८ द्विरुक्तच आहे. सौन्दर्यलहरीच्या दुसऱ्या कोणत्याहि प्रतींत अशी द्विरुक्ति नाहीं.

# कै. प्रा. हणमंत बाळाजी भिडे

### यांचा

## थोडक्यांत परिचय

'श्रीशंकराचार्यकृत सौन्दर्यलहरी' या ग्रंथाचें लेखक कै. प्रा. हणमंत बाळाजी भिडे हे असून त्यांनीं स्वतः लिहिलेल्या ग्रंथाचे प्रकाशन स्वतःचें देखत व्हावें ही त्यांची उत्कट इच्छा असणें स्वाभाविकच होतें. परंतु भगवती महात्रिपुरसुन्दरीची इच्छा निराळीच होती ! या ग्रंथाचें प्रकाशन त्यांच्या हयातीनंतर होत आहे. तेव्हां त्यांचा जीवनवृत्तान्त या ठिकाणीं थोडक्यांत सांगणें अनुचित होणार नाहीं.

सनातन वैदिक धर्मावर दृढ श्रद्धा व त्यांतील तत्त्वज्ञानांवर नितान्त निष्ठा असणारे, तदनुषंगानें इतर धर्मांच्याहि मूलतत्त्वांचें सश्रद्ध चिकित्सक, प्राचीन इतिहास व प्राचीन संस्कृति यांविषयींच्या अभ्यासांत सहज तल्लीन होणारे, वैदिक धर्माचारांतील व कर्मकाण्डांतील सांप्रतचें अवडंबर स्वतःच्या शास्त्रोक्त संशोधनानें उघड करून पीडितांना व मुमुक्षूंना अक्षय सुखाच्या प्राप्तीचा मार्ग दाखविणारे, शिवशक्तीच्या अखंड उपासनेने स्वतःचें व संबंधितांचें जीवन उज्ज्वल करणारे एक मुमुक्षु असें कै. प्रा. भिडे यांचें यथार्थ वर्णन करतां येईल. शक्तिपूजेंतील—शाक्तमार्गांतील गूढ तत्त्वांचें सुलभीकरण करून त्या तत्त्वांची सांगोपांग चर्चा करून साधकांना योग्य मार्ग दाखविण्याचें त्यांनी अविरत प्रयत्न केलें त्यासाठीं त्यांनीं शाक्तपंथांतील कित्येक आचारपद्धतींचें मराठी भाषेंत प्रकाशन केलें. 'श्रीशंकराचार्यकृत सौन्दर्यलहरी' हा त्यांचा ग्रंथ म्हणजे त्यांच्या उपरिनिर्दिष्ट कार्याचाच एक भाग आहे.

कै. प्रा. भिडे यांचा जन्म इसवी सन १८८६, मार्च ७ रविवार रोजी कर्नाटकांतील मुद्दे बिहाळ गांवीं झाला. कुंदगोळ येथील श्री. गाडगीळ हें त्यांचें आजोळ घराणें. त्यांचें प्राथमिक व माध्यमिक शिक्षण कर्नाटकांतच झालें. पुढील शिक्षण सोलापूर, पुणें व मुंबई येथें झालें. प्रा. भिडे हे बी. ए. चे परीक्षेंत प्रथम श्रेणींत उत्तीर्ण झाल्यामुळें त्यांना कॉलेजांत फेलोशिप मिळाली व तेव्हांपासून ते 'फेलो भिडे' म्हणून ओळखले जाऊं लागले. त्यावेळींच



कै भा हणमंत बाळाजी भिडे. एम ए

श्री. सीताराम गणेश भट हे श्रीभटगुरु या नांवानें प्रसिद्धीस पावलेले सत्पुरुष पुणें शहरांत राहात होते. प्रा. भिडे यांची मनाची प्रवृत्ति मूलतः परमार्थमार्गाकडे असल्यामुळें ते श्रीभटगुरूंचेकडे आकर्षित झाले आणि भगवती महात्रिपुरसुन्दरीच्या उपासनेची दीक्षा त्यांनीं श्रीभटगुरूंचेकडुन घेतली.

कै. प्रा भिडे यांनीं विद्यार्थीदशेंत इंग्लिश, संस्कृत, मराठी, हिन्दी, गुजराथी व कानडी या भाषा पूर्ण अवगत करून घेतल्या होत्या. इ. स. १९०९–१९१० सालीं त्यांनीं नागपुरांत वकिलीचा व्यवसाय केला. परंतु त्यांचा पिंड शिक्षकाचा व संशोधकाचा असल्यामुळें त्यांनीं वकिलीच्या व्यवसायाला रामराम ठोकून इ. स. १९११ सालीं नासिक येथील सरकारी हायस्कूलमध्यें शिक्षकाचा पेशा पत्करला. आदरणीय वीर सावरकर यांनीं स्थापन केलेल्या 'अभिनव भारत मंडळाच्या' प्रथमच्या कांहीं क्रियाशील सदस्यांपैकीं ते एक कांहीं काल सदस्य होते. सौराष्ट्रांतील भावनगर येथील 'सामळदास कॉलेज'मध्यें अर्थशास्त्र, इतिहास व संस्कृत या विषयांचे प्राध्यापक म्हणून सुमारें तीस वर्षें नोकरी केली आणि इ. स. १९४३ सालीं ते सेवानिवृत्त होऊन अहमदाबाद येथें स्थायीक झाले. कॉलेजमध्यें प्राध्यापकाचें काम करीत असतांना विद्यार्थ्यांना उपयुक्त अशा संस्कृतमधील काव्यें व नाटकें यांच्या चिकित्सात्मक आवृत्त्या त्यांनीं प्रकाशित केल्या. सौराष्ट्रांत एक विद्वान प्राध्यापक व संस्कृतज्ञ संशोधक अशी त्यांची ख्याति होती. तसेंच तेथे त्यांनीं इतिहास व पुरातत्त्व या विभागाच्या संशोधनाचा पाया घातला. काठेवाडांतील त्या काळच्या साहित्यक्षेत्रांतहि ते प्रसिद्ध होते.

ज्योतिष हा एक त्यांचा आवडता छंद. भावनगर येथें त्यांनीं एक ज्योतिषमंडळ चालू केले व त्याद्वारां त्यांनीं सौराष्ट्रांत ज्योतिषशास्त्राचा प्रसार केला.

कै. प्रा. भिडे यांचे संशोधनात्मक लेख इतिहास, अर्थशास्त्र व तत्त्वज्ञानविषयक नियतकालिकांतून 'एक विद्यार्थी', 'एक रसिक', 'एक अभ्यासू' अशा विविध टोपण नावांनीं प्रसिद्ध झाले आहेत. तसेंच 'वेदांतील देवता' ( Vedic Gods, ) 'रुद्र व काली', 'वेद व आगम' इत्यादि त्यांचे संशोधनात्मक लेख त्या त्या विभागांत संशोधन करणाऱ्या विद्वानांना मार्गदर्शक ठरतील असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. त्यांनीं प्रसिद्ध

केलेले 'ललिताहृदय' 'त्रिपुरसुन्दरीपूजापद्धति' हे ग्रथ शक्तिमार्गातील साधकाना अत्यत उपयुक्त आहत

'श्रीशकराचार्यकृत सौन्दर्यलहरी' वर लिखाण करण्याच के प्रा भिडे याच्या मनात फार दिवसापासून होतें त्याच्या या मानसिक सकल्पाला कृतीचे मूर्तस्वरूप अहमदाबाद येथील शाक्तमार्गातील एक निष्ठावन्त भक्त श्री चैतन्यप्रसाद दिवाणजी याच्या प्रेरणेमुळें आलें हा ग्रथ प्रथम गुजराथी भाषेत अहमदाबाद येथें प्रसिद्ध करण्याचा के प्रा भिडे याचा मानस होता परतु काहीं अपरिहार्य अडचणीमुळें तें जमू शकलें नाहीं नतर त्यानीं मराठी भाषेत हा ग्रथ प्रसिद्ध करण्याचें ठरविलें त्यासाठीं त्यानीं भारताच्या निरनिराळ्या भागातून हस्तलिखित, छापील पोथ्या वगैरे साहित्य फार मोठ्या कष्टानें आयुष्याच्या अखेरपर्यंत जमा केलें ईश्वरी सकेतानुरूप या ग्रथाच लेखन पूर्ण झाल्यावरच दिनाक २५ जानेवारी सन १९६५, पौष वद्य ९ स सोमवार रात्रौ ९–३० वाजता त्याची आत्मज्योत भगवती महात्रिपुरसुन्दरीचे चरणीं विलीन झाली श्रीभगवतीच्या इच्छेनुरूपच या ग्रथाचें आज प्रकाशन होत आहे

॥ भगवती महात्रिपुरसुन्दरी प्रसन्नास्तु ॥ ॥ हरि ॐ तत्सत् ॥



शिवाकार मञ्चे परमशिवपर्यङ्कनिलया

॥ श्री ॥

'मन्त्राणां मातृका देवी
शब्दानां ज्ञानरूपिणी।
ज्ञानानां चिन्मयातीता
शून्यानां शून्यसाक्षिणी॥'

'यस्याः परतरं नास्ति
सैषा दुर्गा प्रकीर्तिता।'

'अखण्डमण्डलाकारं
व्याप्तं येन चराचरम्।
तत्पदं दर्शितं येन
तस्मै श्रीगुरवे नमः॥'

---

**स्तोत्रं कस्य न तुष्टये ?**

ह्या जगतांत प्राणिमात्रास सुख मिळावें व दुःख मुळींच नसावें अशी इच्छा असते. दुःखप्राचुर्यामुळें सर्व दुःखमय म्हटलें जातें. हें दुःख सर्व सृष्टींत संपूर्णपणें व्यापून भरल्यामुळें मनुष्य गांजून जाऊन दयाघन परमेश्वराची स्तुति-स्तोत्रपाठांनीं आळवणी करून करुणा भाकतो. त्या स्तुतीनें परमेश्वर संतुष्ट झाल्यानें जीवाची दुःखनिवृत्ति होऊन त्याला सुखप्राप्ति होते. ह्या श्रद्धेनें अतिपवित्र व महात्मे असलेल्या पूर्वाचार्यांनीं जगद्धितार्थ प्रासादिक वाणीनें स्तुतिस्तोत्रपर वर्णनांनीं परमेश्वराच्या स्तुतिसामर्थ्याचें गुणगान केलें आहे. तेव्हां देवतेच्या भक्तानें केलेलें स्तुतिपर कवन म्हणजे स्तोत्र, अशी साधारणपणें स्तोत्राची व्याख्या करतां येईल. भक्तीच्या उद्रेकांत स्तोत्राची निष्पत्ति होते. हल्लीं ज्यांना आपण स्तोत्रें समजतों तशीं स्तोत्रें वैदिक काळीं नसावींत असें वाटतें. वेदांत देवतांची स्तुति आहे. पण आपण हल्लीं मानतो त्या भक्तीचा अंश त्यांत फार कमी आहे. मुख्य जी दहा उपनिषदें आहेत त्यांत भक्तीचा ओलावा सांपडणें कठीणच आहे. थोडीशी ओढाताण करून अर्थ केल्यास उपनिषदांतून भक्तीच्या मुळाचा शोध लावतां येईल. उपनिषदांत ब्रह्माचें सगुणत्व सांगून त्याची उपासना सांगितली आहे आणि उपासना म्हणजे भक्तिविशेष म्हणतां येईल. सर्व कर्मे ईश्वरार्पण करणें ही भक्ति. या रूपाच्या भक्तिविशेषाचें स्पष्ट वर्णन आपल्याला प्रथम महाभारतांत सांपडतें. पाञ्चरात्रागमोक्त भक्तीचें मूळ शान्तिपर्वांतील नारायणीय उपाख्यानांत आढळतें. पण या भक्तिमार्गाचें एक अंग म्हणून स्तोत्रें रचावयास सुरवात झाली असें म्हणतां येईलसें वाटत नाहीं. महाभारतांत दोन ठिकाणीं देवीस्तुति आहे. शान्तिपर्वात प्रसिद्ध भीष्मराजस्तव आहे. पुढें अनुशासनपर्वात एक शिवसहस्रनाम आहे. पण आपण सध्यां जी नवविधा अथवा प्रेमलक्षणा भक्ति मानतों तिच्या अनुषंगानें या स्तुतीची रचना झाली होती असें ठाम सांगतां येणें अवघड आहे. भारतानंतरच्या काळांत शाण्डिल्यभक्तिसूत्रें, नारदभक्तिसूत्रें इत्यादि सूत्र-साहित्याची निर्मिति झाली. पुढें बुद्ध व महावीर यांच्या शिकवणुकींत आरंभीं जरी भक्तीला फारसा वाव नव्हता, तरी बुद्धोत्तरकाळीं मूर्तिपूजा व योग यांचा प्रचार जास्ती प्रमाणांत सुरू झाला. मूर्तिपूजा व भक्ति यांचा घनिष्ठ संबंध आपल्याला सहज समजण्यासारखा आहे. तेव्हां मूर्तिपूजेबरोबर भक्तिमार्गाची वाढ होणें साहजिक होतें आणि म्हणून बुद्धोत्तरकाळापासून भक्तिमार्गीय

साहित्याची निर्मिति होऊं लागली. पण स्तोत्ररूपानें जें भक्तिमार्गीय साहित्य हल्लीं विस्तृत प्रमाणांत उपलब्ध आहे त्याची सुरुवात फार उशिरानें झाली असें म्हणावें लागतें.

आद्य शंकराचार्य हे जसे अद्वैत तत्त्वज्ञानाचे आद्य प्रस्थापक, तसेंच ते स्तोत्रसाहित्याचेहि आद्य प्रवर्तक होत असें म्हणतां येईल कीं नाहीं तें संशयास्पद आहे. नवव्या शतकांत ते झाले असें मानलें तर, ह्या आद्यप्रवर्तकत्वाचा मान त्यांना देतां येत नाहीं. मध्यां इतर देवतांच्या स्तोत्रांविषयीं न सांगतां फक्त देवीस्तोत्रांबद्दल सांगावयाचें म्हटलें तर नवव्या शतकाच्या पूर्वीचीं कांहीं स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. प्रथम बाणभट्टाचें 'चण्डीशतक' घ्यावें लागेल. त्याचा सासरा मयूरकवि यानें 'सूर्यशतक' रचिलें, त्या स्पर्धेनें बाणानें चण्डीशतक केलें. बाणाचा काल सातव्या शतकाचा पूर्वार्ध समजतात. ज्यांचा समय नक्की सांगतां येत नाहीं, अशीं आणखी दोन स्तोत्रें आहेत. एक मूककविकृत 'पञ्चशती' व दुसरी 'लघुपञ्चस्तवी'. पञ्चशतींत कवीनें कांचीच्या कामाक्षीदेवीची स्तुति केली आहे. लघुपञ्चस्तवींत त्रिपुरसिद्धान्तानुसार देवीची स्तुति केली आहे.

आद्य शंकराचार्यांच्या नांवावर पुष्कळ स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. त्यांनीं अनेक देवतांची स्तुति केली आहे. तीं सगळीं स्तोत्रें त्यांचीच आहेत असें म्हणतां येत नाहीं. देवीविषयक स्तोत्रांपुरतें बोलावयाचें म्हटलें तर पहिली गोष्ट एकदम दिसून येते ती ही कीं, ते शास्त्रसंप्रदायी त्रिपुरोपासक होते. त्यांनीं स्थापन केलेल्या मठांतून श्रीचक्रार्चन परंपरेनें अद्यापिहि चालू आहे. एका तीर्थाचें ठिकाणीं त्यांनीं श्रीचक्रोद्धार केला अशी आख्यायिका आहे. म्हणून त्रिपुराविषयक स्तोत्रें त्यांनीं रचिलीं असण्याचा संभव आहे त्रिपुरसुंदरीवेदपादस्तोत्र, त्रिपुरसुंदरीमानसपूजास्तोत्र आणि देवीचतुःषष्ट्युपचारपूजास्तोत्र ही मोठीं स्तोत्रें असून शिवाय लहानलहान कांहीं स्तोत्रें आहेत.

१ ते ४२ श्लोक आहेत. दुसऱ्या भागांत ४३ ते १०१ श्लोक असून भगवती त्रिपुरसुंदरीच्या किरीटापासून चरणापर्यंतचें सुरेख वर्णन आहे. कांहीं टीकाकारांच्या मतें पहिल्या भागास 'आनंदलहरी' व दुसऱ्या भागास 'सौंदर्यलहरी' अशीं नामें आहेत. कांहींजण दोन्हीं भागांस मिळून 'आनंदलहरी' म्हणतात, तर कांहींजण 'सौंदर्यलहरी' म्हणतात.

सौंदर्यलहरीस्तोत्र हे आद्य शंकराचार्यप्रणीत आहे असा सांप्रदायिक प्रवाद आहे. त्याचें विवेचन व स्पष्टीकरण पुढें येईलच. हे स्तोत्र शक्तिसंप्रदायाचें आहे. हा शक्तिमार्ग वेदविरोधी नाहीं. शक्तिमार्ग व वेदोक्तधर्म हे परस्परविरोधी आहेत ही चुकीची कल्पना आहे. उलट हे दोन्ही मार्ग एकमेकांना पूरक आहेत. ह्याचें विवेचन करण्यासाठीं वेदप्रतिपाद्य धर्माचें स्वरूप समजून घेणें प्रथम जरूरीचें आहे.

'वेदोऽखिलो धर्ममूलम्।' असें धर्मसूत्र सांगतें. यावरून वेद हे धर्माचें प्रतिपादन करतात हे स्पष्ट आहे. धर्माची व्याख्या महाभारतांत खालीलप्रमाणें आली आहे–

'धारणाद्धर्म इत्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः।
यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः॥'

प्रजेचें धारण, पोषण व व्यवहार ज्यायोगें चांगले होतात तो धर्म होय. षड्दर्शनांतील वैशेषिकदर्शन हें व्यक्तिगत व पूर्वमीमांसा हें दर्शन सामूहिक स्वरूपाचें असल्यानें त्यांनीं अनुक्रमें व्यक्तिधर्मपर व कुलधर्मपर धर्माच्या व्याख्या केल्या आहेत. त्या अशा–

'यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः।' वैशेषिकदर्शन.
'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः।' पूर्वमीमांसादर्शन.

या दुसऱ्या व्याख्येंत चोदना म्हणजे वैदिक धर्माच्या आधारभूत ग्रंथांनीं म्हणजे ब्राह्मणादि ग्रंथांनीं सांगितलेल्या विविध प्रकारचीं कर्में करण्याच्या आज्ञा. उदाहरणार्थ–'अहरहः स्नात्वा सन्ध्यामुपासीत' इत्यादि.

पहिल्या व्याख्येनुरूप व्यक्तीचा अभ्युदय व निःश्रेयस ज्यायोगें साधतो तो धर्म होय. अभ्युदय म्हणजे जिवाची ऐहिक व पारलौकिक सुखस्थिति व निःश्रेयस म्हणजे पारमार्थिक मोक्षस्थिति. आपल्या अभ्युदयास ऋग्, यजुस् व साम या वेदत्रयीनें प्रतिपादिलेल्या धर्मानें वर्तन ठेवले पाहिजे.

इष्ट व पूर्त म्हणजे काय तें शखलिखित खालीलप्रमाणें देतात—

'एकाग्निकर्म हवन त्रेतायां य च हूयते।
अन्तर्वेद्यां च यद्दानं इष्टमित्यभिधीयते॥
वापीकूपतडागानि देवतायतनानि च।
अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते॥'

अपरार्कटीका–महाभारतांतून.

'अग्निहोत्र तपः सत्यं वेदानां चैव पालनम्।
आतिथ्य वैश्वदेवश्च इष्टमित्यभिधीयते॥' लिखितस्मृति.

इष्ट म्हणजे वैदिक विधीप्रमाणें यज्ञयागादि कर्मांतील हवन आणि पूर्त म्हणजे दान वगैरे. यावरून असें स्पष्ट होतें कीं, इष्ट म्हणजे वैदिकधर्माप्रमाणें आचरण व पूर्त म्हणजे सामाजिक दान वगैरे करणें. सारांश इष्टापूर्त म्हणजे वैदिक व सामाजिक धर्माचें आचरण होय.

पराशरमाधवांतील एका वचनानें धर्माचीं श्रौत व स्मार्त अशीं दोन अंगें दिसून येतात.

(१) श्रुतिमूलकधर्म वैयष्टिक.

(२) स्मृतिमूलकधर्म सामष्टिक.

त्यालाच प्रजाधारणपर धर्म म्हणतात. तें वचन पुढीलप्रमाणें —

अग्न्याधानादिपूर्वकोऽधीतप्रत्यक्षो वेदमूलो दर्शपूर्णमासादिः श्रौतः। अनुमितपरोक्षशाखामूलः शौचाचमनादिः स्मार्तः।

कांहीं ग्रथात धर्माचे तीन, पांच व सहा असेहि प्रकार सागितले आहेत. श्रौत व स्मार्त धर्मांत शिष्टाचाराचा समावेश करून धर्माचा तिसरा प्रकार सागितला आहे या तिसऱ्या प्रकारांत वर्णाश्रमधर्म, निमित्तधर्म, साधारण-

अभ्युदय म्हणजे जीवात्म्याची ऐहिक व परलोकांतील उन्नति. इहलोकांत जीवात्मा हा देहधारी असतो. म्हणून देहाच्या सुखोपभोगाची प्राप्ति देह असेपर्यंत करण्याची जीवात्म्याला इच्छा असते. ही सुखोपभोगाची प्राप्ति म्हणजेच इहलोकांतील उन्नति. हा अभ्युदयाचा एक भाग आहे.

देह पडल्यानंतर जीवात्मा परलोकांत म्हणजे अंतरिक्षांत किंवा द्युलोकांत–स्वर्गांत जातो असें वैदिक मत आहे. अन्य धर्मांप्रमाणें परलोक न मानणारे कांहीं लोक आहेत. अर्वाचीन संशोधनानुसार देह सुटल्यानंतरहि जीवात्मा नष्ट न होतां अदृश्यरूपानें अस्तित्वांत राहतो अशासंबंधीं अनेक दाखले आधुनिक शास्त्रज्ञांनीं प्रसिद्धिले आहेत. जीवात्म्याच्या अधिक पुण्याईनें तो जीवात्मा द्युलोकांत जातो आणि पुण्यकर्म कमी असेल तर तो अंतरिक्षलोकांत जातो. पुराणान्तरीं अनेक पुण्यात्मे स्वर्गलोकीं गेल्याचे दाखले आहेत. पण स्वर्गलोकीं न जाणारे कमी पुण्यवान् लोक कोणत्या लोकीं जातात? ते कमी पुण्यवान् लोक ज्या लोकांत जातात त्यास अंतरिक्षलोक असें नांव शास्त्रांत आहे. जीवात्मा देहधारी असतांना पृथ्वीतलावर (इहलोकीं) व देह सुटल्यानंतर अंतरिक्ष किंवा द्युलोकांत जो अभ्युदय करून सुखप्राप्ति करून देतो तो धर्म.

वैदिक धर्मांत इहामुत्रफलभोग विचार आहे. इहलोकांत म्हणजे पृथ्वीवर जीवात्मा देहधारी असतांना आणि अमुत्र म्हणजे अंतरिक्षांत किंवा द्युलोकांत जीवात्म्याच्या देहपतनानंतर, म्हणजे पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग या तिन्हीं लोकांतील सुखप्राप्तीच्या कारणांचा विचार वैदिक धर्मांत आहे. अन्य धर्मांत मात्र असा विचार नाहीं. जो धर्म आचरल्यानें तिन्हीं लोकीं सुखप्राप्ति होते तोच खरा धर्म व त्याचेंच नांव अभ्युदय. हे तत्त्व वैदिक धर्माखेरीज इतर कोठल्याहि धर्मांत नाहीं. वैदिक धर्माचें हें वैशिष्ट्य आहे.

आधुनिक संशोधकांची धडपड मानवांस सुख मिळण्यासाठीं चालू आहे. पण प्रत्यक्षांत मात्र विपरीत परिणाम दृष्टीस पडतो. म्हणजे संशोधकांनीं शोधिलेल्या साधनांचा उपयोग सुखप्राप्तीसाठीं होत नसून उलट त्यामुळें मानवांचें जीवन दुःखी होत चालले आहे. वैयक्तिक, सामाजिक व राष्ट्रीय सुखसमृद्धि त्यायोगें न होतां मत्सर, हेवेदावे व दुही मात्र वाढलेली दिसून येते.

आपला अभ्युदय म्हणजे वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक व जन्मभूमिविषयक अशा चारहि प्रकारची सुखप्राप्ति करून घेणें हा होय. मानव जन्मास आल्यानंतर स्वतःस सुख मिळावें, तसेंच मोठा झाल्यावर आईवडिलांना सुख मिळावें, आणखी थोडा मोठा झाल्यावर भाऊबहीण व आप्तेष्ट यांना सुख मिळावें, शिक्षण व कामधंदा मिळून सर्वांना सुख मिळावें, तसेंच लग्न व्हावें ही इच्छा झाल्यावर लग्न होऊन पत्नीपासूनचें सुख मिळावें, पुढें पुत्रकन्यादि संततिसौख्य मिळावें, तसेंच ज्या पृथ्वीतलावर तो राहतो त्यावरील म्हणजे आपल्या जन्मभूमीवरील-कर्मभूमीवरील नियमित व विपुल पर्जन्यवृष्टि, मुबलक धान्योत्पादन, धनोत्पादक कार्यसमृद्धि इत्यादिकांची पूर्ति होऊन सुखप्राप्ति व्हावी हा ऐहिक अभ्युदय होय.

इहलोकांत देह असेतोंपर्यंत जीवात्मा कर्म करतो. पण जीवात्मा परलोकांत म्हणजे अंतरिक्षांत वा द्युलोकांत गेल्यावर त्याला देह नसल्यानें कर्म करतां येत नाहीं. 'परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः' ह्या न्यायानें इहलोकीं केलेली कर्मेंच परलोकांत त्या जीवाच्या सुखदुःखाला कारणीभूत होतात. म्हणून इहलोकीं धर्माचरण करून जीवाला परलोकांत जें सुख मिळतें तो पारलौकिक अभ्युदय होय. अशा प्रकारें पृथ्वी, अंतरिक्ष व द्युलोक ह्या तिन्हीं लोकांमध्यें जीवात्म्यास जी सुखप्राप्ति होते त्याला अभ्युदय हें नांव आहे.

हा त्रिविध अभ्युदय होण्यास वैदिक धर्मानें घालून दिलेल्या मार्गाचें आचरण करणें आवश्यक आहे. इहलोकीं जरी सत्कर्में केलीं, धर्माचरण केलें तरी त्याला सुखप्राप्ति होतेंच असें नाहीं. रामकृष्णादि अवतारी पुरुषांवरहि वनवास, बंदिवास इत्यादि संकटपरंपरा कोसळल्या होत्या. तसेंच अंतरिक्षांत किंवा द्युलोकांतहि संपूर्णतया सुख मिळतेंच असें नाहीं. कारण केवळ आत्यंतिक सुख कोठेंहि मिळत नाहीं. वेदोक्त कर्माचरणानें प्राप्त होणाऱ्या अभ्युदयाचें सुंदर वर्णन मुण्डकोपनिषदांतील दुसऱ्या खंडांत आहे—

'एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः
सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति ।
प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य
एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥'

यज्ञात दिलेल्या आहुति यजमानाला सूर्यकिरणाच्या साधानें ब्रह्मलोकाला नेतात पण हीं सुकृत फार काल टिकणारीं नसतात सत्कर्मानें मानवाला जरी अंतरिक्षात किंवा द्युलोकात स्थान मिळेल तरी 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' या गीतोक्तवचनानुसार पुण्याचा क्षय झाल्यानंतर–सत्कर्मांच्या फलाचा उपभोग घेतल्यानंतर ते पुन पृथ्वीतलावर जन्म घेतात. जन्ममरणाच्या फेऱ्यातून त्याची सुटका होत नाहीं जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्तता होणें म्हणजेच आत्यंतिक सुख होय त्रिविध अभ्युदयाहून हें भिन्न आहे

'अवश्यभाविभावाना प्रतीकारो भवेद यदि ।
तदा दुःखैर्न लिप्येरन् नलरामयुधिष्ठिरा ॥'

या सूक्त्यनुसार दुःख अपरिहार्यच आहे 'कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके' ह्या न्यायानें 'कर्म तसें फल' मिळून सुखप्राप्ति व दुःखनिवृत्ति होते

'बुद्धिर्ज्ञानमसंमोह क्षमा सत्य दम शम ।
सुख दुःख भवोऽभावो भय चाभयमेव च ॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दान यशोऽयश ।
भवन्ति भावा भूताना मत्त एव पृथग्विधा ॥'

ह्या गीतोक्तवचनानुसार मानवाच्या माग सुखदुःख, यशापयश, भयाभय इत्यादि गोष्टी लागून त्यातून त्याची सुटका होणें कठीण आहे तरीसुद्धा मानवान सद्धर्मानें वागून सदाचरण करावें, कारण त्यामुळें थोडीफार सुखप्राप्ति होण्याची शक्यता असते वरील गीतोक्तवचनाप्रमाणें मानवाचें जीवित सुखदुःखसमिश्रच निर्माण केलेल दिसत अशा परिस्थितींत सुखदुःखमय जीवनात कस आचरण कल्यानें जास्तीत जास्त सुखप्राप्ति होईल याचा विचार मानवान केला पाहिजे आणि शक्य तितक सुख कसें मिळवावें हें वैदिक धर्मच सागतो वैदिक धर्मात सुखसाधनास कारणीभूत त्रिविध पुरुषार्थ आहेत व ते म्हणजे धर्म, अर्थ व काम चौथा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष पैकीं धर्म, अर्थ व काम ह्याचा व्यक्ति, कुटुंब, समाज व जन्मभूमि-कर्मभूमि, याच्याशीं निकट संबध इहलोकात असून मोक्ष म्हणजे आत्यंतिक सुख होय वरील चतुर्विध पुरुषार्थांपैकी, धर्म, अर्थ व काम याचा प्रथम विचार करू

पुरुष ज्याची इच्छा करतो तो पुरुषार्थ होय. अर्थ व काम ( कनक व कांता ) ह्या दोन गोष्टींची मनुष्य प्रामुख्यानें इच्छा करतो व त्या गोष्टी ज्यायोगें मिळतात तो धर्म होय. म्हणजे धर्म हा अर्थ, व काम ह्यांस कारणीभूत आहे.

'अर्थ्यते इति अर्थः' ज्याची इच्छा केली जाते तो अर्थ. अर्थ हा व्यापक अर्थानें पुरुषार्थ आहे. बालपणीं विद्यादिकांची इच्छा, तरुणपणीं काम म्हणजे विषयांची इच्छा, द्रव्य, अधिकार, स्थावरादि ह्या सर्वांचा अर्थामध्यें अंतर्भाव होतो. ह्यायोगें विषयवासनेची व कामाची पूर्ति होऊं शकते. असे काम व अर्थ कसें साध्य करून घ्यावेत म्हणजे कोणत्या मार्गानें ते मिळवावेत हें जो सांगतो तो धर्म होय. ऐहिक सुख म्हणजे काय व तें सुख कसें मिळवावें हें सांगणारा केवळ वैदिक धर्मच आहे. व्यक्तीचा विकास, तसेंच ती व्यक्ति ज्या कुटुंबांत असते त्या कुटुंबाच्या विकास, अशा अनेक कुटुंबसमूहांनीं बनलेल्या समाजाचा विकास आणि असा समाज ज्या भूमीवर असतो त्या भूमीची सुसंपन्नता, या सर्वांस कारणीभूत असणारा आपला वैदिक धर्म आहे.

परंतु कर्मचित लोक अक्षय नाहींत. मुण्डकोपनिषदांतील खालील श्लोकांवरून हें स्पष्ट होतें—

'यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्<br>
तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥<br>
इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं<br>
नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः ।<br>
नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वे-<br>
मं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥'

परंतु ही गोष्ट केवळ सांगण्यानें पटणारी नाहीं. अनादि संसारसमुद्रांत सुखदुःखांच्या लाटांत अनेक जन्मीं गटंगळ्या खातां खातां भगवदिच्छेनें पूर्वपुण्याचा उदय होऊन दुःखत्रयाभिघाताची इच्छा उत्पन्न होते आणि मग जिवास कर्माचा व जगताचा वीट येतो, निःश्रेयसाच्या मार्गाकडे मनाची प्रवृत्ति होऊं लागते व आत्यंतिक सुखप्राप्तीची इच्छा उत्पन्न होते. जिज्ञासु वृत्तीनें अनेक जन्म धर्माचरण केल्यानें जीवात्म्यास ज्ञानप्राप्ति होते. ह्या ज्ञानप्राप्तीचें साध्य निःश्रेयस होय.

बौद्ध, जैन, मुसलमान, यहुदी किंवा ख्रिस्ती यांच्या धर्मांत वैदिक धर्मासारखा इहपरलोकींच्या सुखाचा विचार नाहीं. जग हें सर्व क्षणिक व दुःखमय आहे असें बौद्ध धर्म सांगतो. तसेंच इतर धर्मांतहि संसारसुखप्राप्तीचा विचार न करता केवळ ईश्वरकृपा संपादण्याचा उपाय सांगितला आहे. ईश्वरकृपा होण्यास संसार सोडला पाहिजे असें त्यांचें मत आहे. म्हणूनच ज्यांनी संसार सोडला आहे असे संन्यासी, परिव्राजक, फकीर इत्यादि लोकांना ते धार्मिक समजून फार मान देतात. पण वैदिक धर्मांत संसारात राहूनहि सत्कर्म करून अभ्युदय करून घेणाऱ्यांना संन्याशापेक्षां सुद्धां अधिक मान असतो. भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनास हाच उपदेश केला आहे.

'कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय. ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥
न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥
नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥
यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः ।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥
न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥
यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥
उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥'

जनकादिकांनीं निष्काम कर्मानेंच सिद्धि मिळविली आहे म्हणून ज्ञानी पुरुषानें सर्व मानवाला सन्मार्गास लावून त्याचा नाश न होऊं देणें संग्रह म्हणजे त्यांचें धारण, पोषण व पालन करावें तसेंच कर्मांना प्रारंभ केला नाहीं म्हणजे त्याला नैष्कर्म्य प्राप्त होतें असें नाहीं आणि कर्माचा त्याग केला म्हणजे सिद्धि मिळते असेंहि नाहीं. यासाठीं नियत म्हणजे वर्णाश्रम धर्मप्रमाणें विहित असलेलें कर्म तूं कर असा भगवान् अर्जुनाला उपदेश करतात. कारण कर्म

न करण्यापेक्षां कर्म करणें हें अधिक चांगलें होय. शेरीज मनुष्यानें कर्म न केलें तर त्याचा योगक्षेमसुद्धां चालणें कठीण आहे.

यज्ञासाठीं जें कर्म केलें जातें त्याखेरीज इतर कर्मानें सर्वजण बांधलेले आहेत. म्हणून यज्ञार्थ कर्मदेखील मनुष्यानें आसक्ति सोडून करावें. पुढील श्लोकांत भगवान् अर्जुनाला सांगतात कीं, त्यांना म्हणून तिन्हीं लोकीं कांहींहि कर्तव्य उरलेलें नाहीं किंवा एखादी गोष्ट प्राप्त करून घेण्याची राहिली नाहीं, तरीसुद्धां ते कर्म करीतच आहेत. ह्याचें कारण ते असें सांगतात कीं, त्यांनीं जर कांहीं कर्म केलें नाहीं तर इतरेजन त्यांच्याच मार्गाचें अनुकरण करतील. आणि असें जर झालें तर सर्व लोक नष्ट होतील, चोहोंकडे संकर माजेल आणि सर्व प्रजाजनांचा नाश होईल.

' सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ '

आणि म्हणून लोकसंग्रह करूं इच्छिणाऱ्यांनीं व्यावहारिक कर्मांत आसक्त झालेलें अज्ञानी लोक ज्याप्रमाणें वागतात त्याप्रमाणें आसक्ति सोडून वागलें पाहिजे, असा श्रीकृष्ण अर्जुनास उपदेश करतात. शेवटीं ते असें सांगतात कीं, ज्ञानी माणसानें आपण स्वतः कर्म करून लोकांना तीं करावयास लावावें ( जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ). याप्रमाणें विचार करून पूर्वी होऊन गेलेल्या मुमुक्षूंनीं आपापलीं कर्मे केलीं आहेत आणि म्हणून ' तूं आपलें विहित कर्म करावेंस ' असें श्रीकृष्ण पुढील श्लोकांत अर्जुनास सांगतात.

' एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ '

वर उद्धृत केलेल्या भगवद्गीतेंतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें भगवान् कृष्ण स्वतः कर्म करतातच, पण कर्म न करणाऱ्यांनाहि कटाक्षानें कर्म करण्याचा आग्रह प्रतिपादून कर्माची महती सांगतात आणि म्हणूनच ते अर्जुनाला कर्म करण्यास सांगतात, त्याग किंवा संन्यास करण्यास सांगत नाहींत. अर्जुन लढाईपासून म्हणजे प्राप्त कर्तव्यधर्मापासून परावृत्त होऊन गुरुबंधुजनादिकांना मारण्यापेक्षां संन्यास घेणें बरें असें समजून शस्त्र खालीं ठेवण्यास तयार झाला तेव्हां श्रीकृष्णांनीं त्यास कर्माची व प्राप्त कर्तव्यधर्माची महती पटवून देऊन संन्यासापासून परावृत्त करून त्याला कर्मप्रवण केलें. सारांश

कर्मप्रवृत्ति हेंच गीतेच उद्देश्य आहे अशा प्रकारें आपला वेदोक्त धर्म कर्म-मार्गावर भर देतो आणि धर्मकर्म केल्यानेंच इष्टप्राप्ति होतें असें तो सागतो

'कृष्णो भोगी शुकस्त्यागी नृपौ जनकराघवौ।
वसिष्ठ कर्मकर्ता च षडेते ब्रह्मवादिन ॥'

वरील श्लोकात कर्माची महतीच गायिली आहे

येथपर्यंत आपण वेदोक्त धर्माच महत्त्व व श्रेष्ठत्व सागितल आता ह्या धर्माच स्वरूप पाहणें उद्बोधक होईल

व्यक्ति व समाज याना ज सुख मिळत त केवळ पृथ्वीवरील आधि-भौतिक साधनानाच नव्हे तर अतरिक्ष व द्युलोक यातील आधिदैविक साधनाचीहि त्यास जोड मिळवावी लागते अतरिक्षातील मरुत, इन्द्र इत्यादि देवताना जर वृष्टि करून भूमीवर पर्जन्य पाडला नाहीं तर पृथ्वी सुजला, सुफला होणार नाहीं आणि अन्नधान्यसमृद्धि होणार नाहीं तसच द्युलोकातील आदित्य, चद्रमा इत्यादि देवताच्या कृपाप्रसादानेंच वायु वाहतो, मेघराना मुळें पर्जन्य पडत, धान्यसमृद्धि होत आणि पृथ्वीवर सुखसपन्नता नान्ते याप्रमाणें पृथ्वीवर पृथ्वी, अतरिक्ष व द्युलोक या तिन्हीं लोकातील देवताची कृपा पाहिजे अतरिक्षावर द्युलोकाचा प्रभाव असतो म्हणून सूर्य, मरुत् इन्द्र, अग्नि, इत्यादि देवताच्या कृपेनेंच आपण सुखी होतों म्हणून अग्नि, मरुत, सूर्य, इत्यादि देवताना सतुष्ट करणें जरूर असत

'अग्नौ प्रास्ताहुति सम्यगादित्यमुपतिष्ठते।
आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्न तत प्रजा ॥'

या वचनानुसार मनुष्यान अग्नीमध्य यज्ञयागादि हवन करून आदित्य लोकातील देवता सतुष्ट केल्या म्हणजे आदित्यामुळें पाऊस पडतो, पर्जन्या मुळें अन्नसमृद्धि होते व त्यायोग प्रजाभिवृद्धि होते यज्ञीय कर्म ह वेदोक्त कर्म असून ऋग्वद, यजुर्वद व सामवद या वदत्रयीनें पृथ्वी, अतरिक्ष व द्युलोक यात असणाऱ्या देवताची उपासना सागितली आह अग्नि, वायु, सूर्य, इन्द्र इत्यादि ह्या त्या मुख्य देवता होत

'अयं यज्ञः समसद्धविष्मान् ऋचा साम्ना यजुषा देवताभिः ।' असा यज्ञ आहे.

'वेदा हि यज्ञार्थमभिप्रवृत्ताः।' या वचनानुसार वेदत्रयींतील मंत्रांनी यज्ञ करून देवता प्रसन्न कराव्यात.

'सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥'

पूर्वी ब्रह्मदेवानें यज्ञासह प्रजा उत्पन्न करून तो त्यांना म्हणाला की, 'यज्ञाच्या योगानें तुम्ही वृद्धि पावा. ही तुमची कामधेनु म्हणजे इच्छित पूर्ण करणारी होवो'.

देवांनीं यज्ञाचे हवन केलें आणि तेंच पहिलें धर्मस्थापन होय असें वर उद्धृत केलेल्या पुरुषसूक्तांतील ऋचांत सांगितलें आहे. यज्ञाच्या योगानें ते देव स्वर्गाप्रत गेले. देवांनीं यज्ञ केला तो अग्नीच्या योगानेंच केला व अग्निसाध्य कर्मेंच अत्यंत फलदायी होतात. या विधानाच्या पुष्ट्यर्थ खालील उतारा पाहा—

'अग्नौ पृथिव्यां प्रतितिष्ठ वायावन्तरिक्षे सूर्ये दिवि याॅ स्वस्तिमग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा आपोऽनुसंचरन्ति ताॅ स्वस्तिमनुचर।'

'नमो रुद्रेभ्यो ये पृथिव्यां येऽन्तरिक्षे ये दिवि येषामन्नं वातो वर्षमिषवस्तेभ्यो दश प्राचीर्दश दक्षिणा दश प्रतीचीर्दशोदीचीर्दशोर्ध्वास्तेभ्यो नमस्ते नो मृडयन्तु ते य द्विष्मो यश्च नो द्वेष्टि तं वो जम्भे दधाति।' तैत्तिरीयसंहिता.

जे पृथ्वीवर, अंतरिक्षांत व द्युलोकांत वास करतात व अनुक्रमें अन्न, वारा व पाऊस हे ज्यांचे बाण आहेत अशा त्या रुद्रांस नमस्कार असो. पूर्वेस, दक्षिणेस, पश्चिमेस उत्तरेस आणि वर दहा बोटें करून म्हणजे हात जोडून त्या रुद्रांना नमस्कार असो. ते रुद्र आम्हांस सुख देवोत. रुद्रांस नमस्कार करणारे आम्ही द्वेष करतो व जो आमचा द्वेष करतो त्या शत्रूस मी तुमच्या पसरलेल्या जबड्यांत ठेवतो.

ज्यानें द्युलोकाला पर्जन्यवृष्टि करण्यास समर्थ केलें व प्राणिमात्राचा भार वाहण्यासाठीं पृथ्वीला स्थिर करून ठेवली आहे, त्याचप्रमाणें ज्यानें स्वर्गलोक जागच्या जागीं थोपवून धरला, ज्यानें सूर्यास आकाशांत धरून ठेवलें व जो अंतरिक्षांत वृष्टिरूपी जलाचा निर्माता आहे त्या प्रजापतीस आम्ही हविर्द्रव्य अर्पण करतों.

> ' यस्य द्यौरुर्वी पृथिवी च मही
> यस्याद् उर्वन्तरिक्षम् ।
> यस्यासौ सूरो विततो महित्वा
> कस्मै देवाय हविषा विधेम ॥' ऋग्वेद

ज्याच्या सामर्थ्यानें आकाश, अंतरिक्ष व पृथ्वी हे तीनहि लोक विस्तृत होतात व ज्याच्या प्रभावानें सूर्य आपणाकडे व सर्व दिशेस प्रकाश पसरवितो, त्या प्रभूची आम्ही प्रार्थना करतों.

ह्या व अशा अनेक मत्रांनीं द्युलोक, अंतरिक्ष व पृथ्वी या तीनहि लोकावरील देवतांची प्रार्थना केल्यानें व त्यांस संतुष्ट केल्यानें पृथ्वीवर सुख-समृद्धि मिळते हे सिद्ध होतें.

वेदात कर्मकांड आहे हें खर, पण कर्मकांडाचा उद्देश नुसतें हवन करणें असे नसून देवतांना संतुष्ट करून सुख मिळविणें हा आहे. हा उद्देश जे सर्वसामान्य लोक कर्मकांडास नांवें ठेवतात त्यांच्या ध्यानात येत नाहीं. मनुष्यानें कर्म का करावयाचें ह्याचे सुंदर विवेचन गीतेंत पुढीलप्रमाणें केलें आहे—

'यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥' भगवद्गीता

परब्रह्माचा 'ॐ तत्सत्' अशा तीन तऱ्हेनें शास्त्रांत निर्देश केला जातो. यानेंच पूर्वी ब्राह्मण, वेद व यज्ञ उत्पन्न केले आहेत. ब्रह्मवादी लोकांची यज्ञ, दान तप आणि इतर शास्त्रोक्त कर्मे नेहमी ॐ असा उच्चार करून प्रवृत्त होत असतात. 'तत्' या शब्दानें फलाची अपेक्षा न ठेवतां यज्ञ, तप व दान वगैरे क्रिया मोक्षार्थी लोक करीत असतात हें दर्शविलें आहे. अस्तित्व व साधुत्व या अर्थी सत् हा शब्द योजिला जातो, तसेंच चांगल्या कर्मासहि सत् शब्द लावण्यांत येतो. यज्ञ, तप आणि दान यांच्या ठिकाणीं स्थिर भावना असणें यालाहि सत् म्हणतात आणि यांच्यासाठीं जें कर्म करावयाचें त्या कर्मासहि सत् हेंच नांव आहे.

यावरून हें स्पष्ट होतें कीं यज्ञ, तप व दान हीं धर्मांचीं प्रमुख अंगें आहेत. म्हणूनच शेवटच्या श्लोकांत सांगितलें आहे कीं, यज्ञ, दान, तप आणि कर्म याचा मनुष्यानें त्याग करू नये तीं कर्मे केलींच पाहिजेत. यांच्या योगें त्याची चित्तशुद्धि होते.

'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणैर्वा जायते ।
यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः स्वाध्यायेन ऋषिभ्य' ॥'

अशी तैत्तिरीयश्रुति आहे. जन्मलेल्या मनुष्यास देवऋण, पितृऋण व ऋषिऋण फेडावयाचीं असतात. तीं ऋणें वर उद्धृत केलेल्या गीतावचनानुसार यज्ञ, दान व तप ही पावन असल्यामुळें त्यायोगें फेडावयाचीं असतात यज्ञानें देवऋण, दानानें पितृऋण व तपानें ऋषिऋण फेडावयाचें आहे. म्हणजेच यज्ञानें द्युलोकांतील देवता, दानानें अंतरिक्षांतील देवता व तपानें पृथ्वीवरील देवता संतुष्ट करून मानवानें जन्मजात ऋणांतून मुक्त व्हावयाचें आहे

'अहं भूमिमददामार्यायाहं वृष्टिं दाशुषे मर्त्याय ।
अहमपो अनय वावशाना मम देवासो अनुकेतमायन् ॥'

या वेदमन्त्रांत असें सांगितलें आहे कीं, दान केल्यामुळें अंतरिक्षांतील देवता संतुष्ट होऊन त्या पर्जन्यवृष्टि करतात, तप हें भूमीवर सुख मिळविण्याचें साधन आहे, यज्ञानें द्युलोकांतील देवता संतुष्ट होतात सारांश पृथ्वी, अंतरिक्ष व द्युलोक या तिन्हीं लोकांतील देवतांना संतुष्ट करून मानवास सुख मिळविण्याचीं साधनें म्हणजे यज्ञ, दान व तप हीच होत

आधिदैविक सुख मिळविण्यास ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या वेदत्रयीनें कर्म करावयाचें व ह्या तिन्हीं लोकांतील देवतांना संतुष्ट करावयाचें हें स्पष्ट होतें. पण आधिभौतिक दुःखनिवृत्तीसाठीं म्हणजे आजार-अपघातादि दुःखें, वनस्पति-श्वापदादि हिंस्र प्राण्यांमुळें होणारीं दुःखें, शत्रूंकडून होणारीं आणि जारणमारणादि विरोधी कृत्यें व दोष यांमुळें वातावरणांतील होणारीं दुःखें, इत्यादि निवारण करण्यास आपणांस अथर्ववेदाची आवश्यकता आहे. अथर्ववेदांतील मंत्रांनीं आधिभौतिक दुःख निवारण होऊन सुखप्राप्ति होते. अशा प्रकारें आपलें वेदचतुष्टय हें मानवास सर्व प्रकारच्या सुखप्राप्तीचीं साधनें सांगतें. आधुनिक संशोधकांच्या मतें अथर्ववेद जरी ऋग्वेदादि वेदांपेक्षां अर्वाचीन आहे, तरी त्याची उपयुक्तता मात्र अमान्य करतां येत नाहीं.

येथपर्यंत मानवाच्या अभ्युदयाचा विचार झाला. आधिदैविक व आधिभौतिक सुखप्राप्तीसाठीं वेदचतुष्टयांची उपपत्ति आहे. परंतु आध्यात्मिक सुखासाठीं उपनिषदांचाच अभ्यास करावयास हवा. वेदांनीं कर्मकांडाचा विचार केला आहे, तर उपनिषदांनीं ज्ञानकांडाचा विचार केला आहे. अनेक जन्म कर्मे केल्यानंतर आणि आधिभौतिक व आधिदैविक सुख भोगल्यानंतर आध्यात्मिक सुखाची इच्छा होते व तें ज्ञान मिळविण्याची जिज्ञासा होते. शम, दम, तितिक्षा व वैराग्य या साधनचतुष्टय संपत्तिप्राप्तीनंतरच ही ज्ञानजिज्ञासा ब्रह्मजिज्ञासा निर्माण होते. ' अथातो ब्रह्मजिज्ञासा ' हें ब्रह्मसूत्रांतील पहिलें सूत्र होय. अथ म्हणजे नतर. ह्याचा अर्थ 'अनेक जन्म कर्म करून ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार प्राप्त झाल्यानंतर ' असा आहे. रामकृष्णादि अवतारी पुरुषांनाहि अनेक जन्म घ्यावे लागले. भगवान् श्रीकृष्णानें स्वतःबद्दलहि गीतेंत असें म्हटलें आहे कीं–

' बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।
बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ॥ '

वरील श्लोकांत भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात कीं, 'तुझे व माझे अनेक जन्म व्यतीत झाले आहेत. मी ते सर्व जाणतो, पण तूं जाणत नाहींस. अनेक जन्म घेऊन अधिकारी झाल्यानंतर मानव उच्च गतीला पोहोंचतो व

शेवटीं माझ्याप्रत येतो.' ह्या वचनावरून हेंच सिद्ध होतें कीं, अनेक जन्मांचीं आवर्तनें झाल्यानतरच ब्रह्मजिज्ञासा होते.

धर्माचा प्रथम हेतु अभ्युदय हा असून तो मानवाची वैयक्तिक, सामाजिक व भौतिक उन्नति मान्य करून घेण्याचीं साधनें सांगतो. अशा प्रकारें साधना करताना अनेक जन्म गेल्यानतर सर्व विश्वोत्पत्तीचें मूलकारण काय असावें तें जाणून घेण्याची इच्छा होते तीच ब्रह्मजिज्ञासा होय. 'जन्माद्यस्य यत' ' या ब्रह्मसूत्रावरून ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय ज्यापासून होतात तें ब्रह्म होय हें स्पष्ट होतें. ह्या मूलकारणाचें सम्यग्ज्ञान प्राप्त करून घेणें हा धर्माचा दुसरा हेतु आहे. उपनिषदांतून अनेक रूपानीं ब्रह्माचें आविष्करण सांगितले आहे.

'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति । अग्निं यम मातरिश्वानमाहुः । इन्द्रो मित्रं वरुणमग्निमाहुः स सुपर्णो गरुत्मान् ।' इत्यादि अनेक नांवांनी जरी ब्रह्माचा नामनिर्देश केला असला तरी मूलकारण मात्र 'एकं सत्' असेंच आहे व त्यासच ब्रह्म असें म्हणतात. उपनिषदातील तद्विषयक महावाक्यें पुढीलप्रमाणें आहेत—

'सर्वं खल्विदं ब्रह्म'। 'अयमात्मा ब्रह्म'। 'तत्त्वमसि'। आणि 'सर्व ब्रह्म।'

विश्वाच्या ह्या मूलकारणापासून पंचमहाभूतादि कार्यें कशीं उत्पन्न होतात व तीं उत्पन्न झालेलीं कार्यें मूलकारणभूतच कशीं असतात हें अनेक उपनिषदांतून अनेक ठिकाणीं सांगितले आहे बृहदारण्यकोपनिषदांतील दुसऱ्या अध्यायाच्या पचम ब्राह्मणांत याविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख आहे—

'इयं पृथिवी सर्वेषां भूतानां मध्वस्यै पृथिव्यै सर्वाणि भूतानि मधु यश्चा-यमस्यां पृथिव्यां तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं शारीरस्तेजो-मयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स

योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदं सर्वम् ।

ही पृथिवी सर्व भूतांचें मधुकार्य आहे, या पृथिवीचें सर्व भूतें मधुकार्य आहे. जो हा या पृथ्वीमध्यें तेजोमय, अमृतमय पुरुष आहे आणि जो हा अध्यात्म शारीर तेजोमय अमृतमय पुरुष आहे तो सर्व भूतांचें मधु आहे व सर्व भूतें त्याचें मधु आहे. हाच तो 'योऽयमात्मा' या वाक्यानें निर्दर्शित केलेला आत्मा आहे हें ब्रह्म आहे.

आधिदैविक सुख मिळविण्यास ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या वेदत्रयीनें कर्म करावयाचें व ह्या तिन्हीं लोकांतील देवतांना संतुष्ट करावयाचें हें स्पष्ट होतें. पण आधिभौतिक दुःखनिवृत्तीसाठीं म्हणजे आजार-अपघातादि दुःखें, वनस्पति-श्वापदादि हिंस्र प्राण्यांमुळें होणारीं दुःखें, शत्रूंकडून होणारीं आणि जारणमारणादि विरोधीं कृत्यें व दोष यांमुळें वातावरणांतील होणारीं दुःखें, इत्यादि निवारण करण्यास आपणांस अथर्ववेदाची आवश्यकता आहे. अथर्ववेदांतील मंत्रांनीं आधिभौतिक दुःख निवारण होऊन सुखप्राप्ति होते. अशा प्रकारें आपलें वेदचतुष्टय हें मानवास सर्व प्रकारच्या सुखप्राप्तीचीं साधनें सांगतें. आधुनिक संशोधकांच्या मतें अथर्ववेद जरी ऋग्वेदादि वेदांपेक्षां अर्वाचीन आहे, तरी त्याची उपयुक्तता मात्र अमान्य करतां येत नाहीं.

येथपर्यंत मानवाच्या अभ्युदयाचा विचार झाला. आधिदैविक व आधिभौतिक सुखप्राप्तीसाठीं वेदचतुष्टयांची उपपत्ति आहे. परंतु आध्यात्मिक सुखासाठीं उपनिषदांचाच अभ्यास करावयास हवा. वेदांनीं कर्मकांडाचा विचार केला आहे, तर उपनिषदांनीं ज्ञानकांडाचा विचार केला आहे. अनेक जन्म कर्मे केल्यानंतर आणि आधिभौतिक व आधिदैविक सुख भोगल्यानंतर आध्यात्मिक सुखाची इच्छा होते व तें ज्ञान मिळविण्याची जिज्ञासा होते. शम, दम, तितिक्षा व वैराग्य या साधनचतुष्टय-संपत्तिप्राप्तीनंतरच ही ज्ञानजिज्ञासा-ब्रह्मजिज्ञासा निर्माण होते. ' अथातो ब्रह्मजिज्ञासा ' हें ब्रह्मसूत्रांतील पहिलें सूत्र होय. अथ म्हणजे नंतर. ह्याचा अर्थ 'अनेक जन्म कर्म करून ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार प्राप्त झाल्यानंतर ' असा आहे. रामकृष्णादि अवतारी पुरुषांनाहि अनेक जन्म घ्यावे लागले. भगवान् श्रीकृष्णानें स्वतःबद्दलहि गीतेंत असें म्हटलें आहे कीं—

' बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।
बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ॥ '

वरील श्लोकांत भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास सांगतात कीं, ' तुझे व माझे अनेक जन्म व्यतीत झाले आहेत. मी ते सर्व जाणतो, पण तूं जाणत नाहीस. अनेक जन्म घेऊन अधिकारी झाल्यानंतर मानव उच्च गतीला पोहोंचतो व

शेवटीं माझ्याप्रत येतो.' ह्या वचनावरून हेंच सिद्ध होतें कीं, अनेक जन्मांचीं आवर्तनें झाल्यानंतरच ब्रह्मजिज्ञासा होते

धर्माचा प्रथम हेतु अभ्युदय हा असून तो मानवाची वैयक्तिक, सामाजिक व भौतिक उन्नति साध्य करून घेण्याचीं साधनं सांगतो अशा प्रकारे साधना करताना अनेक जन्म गेल्यानंतर सर्व विश्वोत्पत्तीचें मूलकारण काय असावें तें जाणून घेण्याची इच्छा होते. तीच ब्रह्मजिज्ञासा होय. 'जन्माद्यस्य यत' या ब्रह्मसूत्रावरून ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय ज्यापासून होतात तें ब्रह्म होय हें स्पष्ट होतें ह्या मूलकारणाचें सम्यग्ज्ञान प्राप्त करून घेणें हा धर्माचा दुसरा हेतु आहे उपनिषदांतून अनेक रूपांनीं ब्रह्माचें आविष्करण सांगितलें आहे

'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति । अग्निं यमं मातरिश्वानमाहुः । इन्द्रो मित्रं वरुणमग्निमाहुः स सुपर्णो गरुत्मान् ।' इत्यादि अनेक नांवांनीं जरी ब्रह्माचा नामनिर्देश केला असला तरी मूलकारण मात्र 'एकं सत्' असेंच आहे व त्यासच ब्रह्म असे म्हणतात उपनिषदांतील तद्विषयक महावाक्यें पुढीलप्रमाणें आहेत—

'सर्वं खल्विदं ब्रह्म'। 'अयमात्मा ब्रह्म'। 'तत्त्वमसि'। आणि 'सर्वं ब्रह्म।'

विश्वाच्या ह्या मूलकारणापासून पंचमहाभूतादि कार्यें कशीं उत्पन्न होतात व तीं उत्पन्न झालेलीं कार्यें मूलकारणभूतच कशीं असतात हें अनेक उपनिषदांतून अनेक ठिकाणीं सांगितलें आहे बृहदारण्यकोपनिषदांतील दुसऱ्या अध्यायाच्या पंचम ब्राह्मणांत याविषयी पुढीलप्रमाणें उल्लेख आहे—

'इयं पृथिवी सर्वेषां भूतानां मध्वस्यै पृथिव्यै सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्यां पृथिव्यां तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं शारीरस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स

योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदं सर्वम् ।

ही पृथिवी सर्व भूतांचें मधुकार्य आहे, या पृथिवीचें सर्व भूतें मधुकार्य आहे जो हा या पृथ्वीमध्यें तेजोमय, अमृतमय पुरुष आहे आणि जो हा अध्यात्म शारीर तेजोमय अमृतमय पुरुष आहे तो सर्व भूतांचें मधु आहे व सर्व भूतें त्याचें मधु आहे हाच तो 'योऽयमात्मा' या वाक्यानें निर्दिष्ट केलेला आत्मा आहे हें ब्रह्म आहे.

त्याचप्रमाणें—

'इमा आपः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
अयमग्निः सर्वेषां भूतानां मधु ..इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
अयं वायुः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
.....................................
अयमाकाशः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।'

हीं पृथिव्यादि पंच महाभूतें ब्रह्मस्वरूप आहेत. तसेंच

'अयमादित्यः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
अयं चन्द्रः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
इयं विद्युत्सर्वेषां भूतानां मधु.. इदं ब्रह्मेदं सर्वम् ।
अयं स्तनयित्नुः सर्वेषां भूतानां मधु...इदं ब्रह्मेदं सर्वम् ।'

इत्यादि आधिदैविक स्वरूपहि ब्रह्माचींच आहेत.

त्याचप्रमाणें 'स ऐक्षत एकोऽहं बहु स्यां प्रजायेय तेजोबन्नानि सृष्ट्वा नामरूपे व्याकरवाणि ।' या छान्दोग्योपनिषदांतील उताऱ्यावरूनहि ब्रह्म हेंच सर्वांचें मूलकारण आहे हें सिद्ध होतें.

उपनिषदांवरून जीवात्म्यास ब्रह्मज्ञानाची अशा प्रकारें प्राप्ति होते. या स्थितीलाच उपनिषदांत कैवल्य असें म्हटले आहे. 'ज्ञानादेव तु कैवल्यं' असें उपनिषद्वाक्य आहे. हें कैवल्य म्हणजेच निःश्रेयस होय.

ह्याप्रमाणें थोडक्यांत वैदिक धर्माच्या विशिष्ट स्वरूपाचें विवेचन येथपर्यंत केलें आहे.

राहिलीं आहेत हें सिद्ध करून देणें सोपें आहे. वैदिक मंत्रांचे प्रयोग व विधि यांत आगमोक्त तन्त्र पुष्कळच आहे. आपली नेहमींची संध्या व गायत्री यांच्यांत तन्त्रोक्त भाग किती आहे याची कल्पना फार थोड्या लोकांना आहे. आगमांत ज्या उपास्य देवता वर्णिल्या आहेत त्या सर्वांचीं बीजें वेदांत आढळतात. उदाहरणार्थ, देवीउपासना सगळ्या वेदांतून व्यापून राहिली आहे असें म्हटलें तरी चालेल. उषा, अदिति, उमा, सरस्वती इत्यादि अनेक रूपांनीं देवीचें माहात्म्य, सर्वव्यापकत्व व सर्वकर्तृत्व वेदोपनिषदांत वर्णिलें आहे म्हणूनच ललितासहस्रनामांत भगवतीला 'वेदजननी' व 'वर्णाश्रमविधायिनी' म्हटलें आहे. हिचेंच श्वेताश्वतरोपनिषदांत महेश्वराची स्वाभाविकी ज्ञानबलक्रियादि विविधा शक्ति असें वर्णन आहे. मुण्डकोपनिषदांतील परा विद्या किंवा ब्रह्मविद्या ती हीच. याप्रमाणें विचार करतां देवी-आगम व वेद यांच्यांत विरोध कल्पिण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें विष्णु-आगम, शैवागम आणि वेद यांच्यातहि वरीलप्रमाणेंच भेद नाहीं हें दाखवितां येईल.

शाक्तमार्ग हा वैदिक धर्माप्रमाणेंच अभ्युदय व निःश्रेयस हीं प्राप्त करून देण्याचें साधन आहे. वैदिक तत्त्वज्ञानांत केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत इत्यादि मतभेद आहेत. शाक्ततत्त्वज्ञानांतहि हे सर्व प्रकार दिसून येतात. या मार्गांत जी त्रिपुरोपासना आहे ती पूर्ण अद्वैतनिष्ठ आहे. पूर्णाद्वैत हा त्रैपुरसिद्धान्त. श्रीशंकराचार्यांच्या भाष्यत्रयींत ज्या अद्वैताचें प्रतिपादन आहे तें या पूर्णाद्वैताशीं पूर्णतया जमतें.

शाक्त-उपासनेंत मुख्य दोन उपास्यें आहेत—शिव आणि शक्ति. उपास्य-द्वैतामुळें अद्वैतसिद्धांताला कांहींहि बाध येत नाहीं. कारण 'शक्तिशक्तिमतोरभेदः' हें मुख्य तत्त्व आहे. म्हणून शाक्तमार्गांत शिवोपासना आणि शक्तिउपासना ह्या दोहोंचा अंतर्भाव होतो.

शाक्तउपास्य शिव-शक्ति म्हणजे औपनिषद् सगुण ब्रह्म होय. श्रीशंकराचार्य म्हणतात कीं, सगुण ब्रह्म उपास्य व निर्गुण ब्रह्म ज्ञेय आहे. सगुणांतून निर्गुणांत जावयाचें असतें. शाक्त संप्रदायचाहि अगदीं हाच सिद्धान्त आहे उपासनेंत द्वैत असतें, पण उपासनेची पूर्णता अद्वैतसिद्धींत होते.

अन्तिम अद्वैतज्ञान एक, पण उपान्त्य उपासना अनेक. उपनिषदांत वेगवेगळ्या उपासना सांगितलेल्या आढळतात—प्रणवोपासना, शाण्डिल्यविद्या,

पश्चाग्नि-उपासना इत्यादि. असे उपासनाभेद शाक्तमार्गांतहि आहेत. शिव-शक्तीच्या उपासनांचे प्रकार पुष्कळ आहेत. उपासनेचीं रूपें अनेक आहेत. मूर्ति, यन्त्र, बाण इत्यादि बाह्यवस्तूंची पूजाअर्चा हा एक उपासनाप्रकार. सप्तशतीसारख्या ग्रंथांचीं पुरश्चरणें करणें, होमहवन करणें, न्यास वगैरे करणें, वगैरे बाह्यविधि हा दुसरा प्रकार. हें उपासनेचें स्थूल रूप होय. याहून श्रेष्ठ आन्तरउपासना. तें सूक्ष्म रूप. ही आन्तरउपासनाहि विविध प्रकारची आहे बीजाक्षरें, मन्त्र इत्यादिकांचा मानसिक जप, नामजप, लययोग, कुण्डलिनीयोग वगैरे योगाचे प्रकार—या सर्वांचा आन्तरउपासनेंत अन्तर्भाव होतो.

त्याचप्रमाणें शाक्तमार्ग म्हणजे अद्वैतप्रापक योगमार्ग होय. नुकतेच उपासनेचे जे प्रकार सांगितले ते योगाच्या अगोदरच्या पायऱ्यांसारखे आहेत. शेवटची पायरी जी समाधी ती योगसाध्य आहे असें शाक्तसंप्रदाय मानतो.

वरील विवेचन फार त्रोटक आहे तथापि त्यावरून खात्री होईल कीं, शाक्तसंप्रदाय म्हणजे वेदविरोधी मत व मार्ग अशी जी सर्वसामान्य समजूत आहे ती मुळींच बरोबर नाहीं.

> 'यत्रास्ति भोगो न हि तत्र मोक्षो
> यत्रास्ति मोक्षो न हि तत्र भोगः।
> श्रीसुन्दरीपूजनतत्पराणां
> भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ॥'

शक्तींचें वर्णन त्या त्या देवतांच्या नांवानें केलें आहे. त्या देवता ह्या आधिभौतिक व आधिदैविक सृष्टीमध्यें विविध कार्यें करणाऱ्या आहेत. म्हणूनच उपरिनिर्दिष्ट केल्याप्रमाणें आधिभौतिक व आधिदैविक उन्नतीसाठीं त्यांची आराधना करणें जरूर पडते. 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते।' या विधानावरून इन्द्रास स्वतःचें विशिष्ट रूप नसलें तरी मायाशक्तीच्या योगानें तो विविध रूपें धारण करतो असें दिसतें. देवतांचीं जीं वर्णनें वेदांत दिलीं आहेत त्यांवरून त्या देवता मूर्तिरूप होत्या असें वाटण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, देवतांच्या वर्णनांतील तुविग्रीव (म्हणजे मोठ्या कंठाचा), वपोदर, (म्हणजे मोठ्या पोटाचा), सुबाहु (म्हणजे चांगल्या हातांचा), तसेंच नीलग्रीव व शितिकंठ (म्हणजे निळ्या रंगाच्या कंठाचा बृहच्छरीरयुवा (म्हणजे धिप्पाड शरीराचा व तरुण) इत्यादि विशेषणांवरून त्या देवता मूर्तिरूप असाव्यात असें वाटण्याचा संभव आहे. पण तसें नसून हीं सर्व वर्णनें आलंकारिक आहेत. अथर्ववेदांतील तक्मा म्हणजे ज्वर ह्याच्या वर्णनांत त्याचें शरीर, त्याची आई, बहिण इत्यादिकांचें वर्णन आहे. पण हें मूर्तिरूपाचें वर्णन नसून तें रूपक आहे हें उघड आहे.

वेदांत अग्नीचें वर्णन पुढीलप्रमाणें आलें आहे—

'सप्तहस्तश्चतुःशृङ्गः सप्तजिव्हो द्विशीर्षकः।
त्रिपाद प्रसन्नवदनः सुखासीनः शुचिस्मितः॥
स्वाहां तु दक्षिणे पार्श्वे देवीं वामे स्वधां तथा।
बिभ्रद् दक्षिणहस्ते तु शक्तिमन्नं स्रुचं स्रुवम्॥
तोमरं व्यजनं वामे घृतपात्रं च धारयन्।
आत्माभिमुखमासीनं एवंरूपो हुताशनः॥'

परंतु अग्नीचें हें वर्णन आलंकारिक आहे.

यावरून निःसंदिग्धपणें असें म्हणतां येईल कीं, वेदानुयायी आर्यांमध्यें गृहांत किंवा मंदिरांत मूर्तिपूजा करण्याची पद्धति नव्हती.

मग प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, वेदानुयायी आर्यांनीं मूर्तिपूजेचा स्वीकार केव्हां केला? मूर्तिपूजा ही कोठून, केव्हां व कशी आली?

बहुतेक सर्व विद्वानांचें मत असें आहे कीं, वेदांत मूर्तिपूजा नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें इंद्रादि देवतांचें जें वर्णन वेदांत आहे तें आलंकारिक आहे. पण पुढील ब्राह्मणग्रंथांत मूर्तिरूपानें देवतांचें वर्णन कांहीं ठिकाणीं केलेलें आहे. उदाहरणार्थ, होता यक्षत् पेशस्वतीः। तिस्रो देवीर्हिरण्मयीः। भारतीर्बृहतीर्मही:। (तै. ब्राह्मण २ ६ · १७ ). या उताऱ्यांत भारती, इडा व सरस्वती या तीन देवतांचें होत्यानें पूजन करावें असें सांगितलें आहे. या तीनहि देवता 'हिरण्मयी' ह्या शब्दानें वर्णिल्या आहेत. यावरून असें अनुमान करणें शक्य आहे कीं, देवतांच्या मूर्ति त्या काळीं सोन्याच्या बनवीत असत. ब्राह्मणग्रंथ हे वेदकालानंतरचे असल्यामुळें प्रस्तुत वचनानें वेदकाळीं मूर्तिपूजा होती हें सिद्ध होत नाहीं. अथर्ववेदांत 'भूदेवाः' हा शब्द आहे. पण सायणाचार्यांच्या मतें त्याचा अर्थ 'राक्षस' असा आहे. आपस्तंबगृह्यसूत्रांत सांगितलें आहे कीं, ईशान, त्याची पत्नी व पुत्र जयंत ह्यांच्या मूर्तींची पूजा करावी ( २०·१·३ ). लौगाक्षिगृह्यसूत्र, गौतमगृह्यसूत्र इत्यादि अनेक सूत्रग्रंथांत देवतांच्या मूर्तींचे उल्लेख आहेत. बौधायनगृह्यसूत्र ( २·२·१३ ) यामध्यें सांगितलें आहे कीं, उपनिष्क्रमण करून म्हणजे घराबाहेर जाऊन पुत्रानें मूर्तिपूजा करून ब्राह्मणभोजन करवून त्यांचा आशीर्वाद घ्यावा. मानवगृह्यसूत्रांतहि मूर्तीविषयीं विपुल वर्णन आहे. हीं सर्व सूत्रें खिस्तपूर्व ७०० वर्षापूर्वींची आहेत.

पाणिनीच्या सूत्रांत मूर्तिपूजेचा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे.

'जीविकार्थे चापण्ये' (५ ३·९९ )

यावरील पातंजलभाष्य असें आहे—

'अपण्ये इत्युच्यते, तत्रेदं न सिध्यति–शिवः स्कन्द विशाख इति। किं कारणम्। मौर्यैः हिरण्यार्थिभिरर्चाः प्रकल्पिताः भवेत्तासु न स्यात्। यास्त्वेताः संप्रतिपूजार्थास्तासु भविष्यति।'

'वासुदेवार्जुनाभ्यां वुन्' (पाणिनि ४ ३ ९८) या वचनाचा सारांशरूपानें पुढील आशय आहे—

एखादा मनुष्य मूर्तीची पूजा करून उपजीविका करतो व तिची विक्री करीत नाहीं त्यास ज्या देवाची तो पूजा करतो त्याचें नांव देतात. उदाहरणार्थ, शिवाची उपासना करून त्या मूर्तीची विक्री न करणाऱ्यास

'शिव' म्हणतात. हीच गोष्ट 'स्कंद', 'विशाख' इत्यादि देवतामूर्तिपूजकांना लागू आहे. तसेंच पाणिनि वासुदेवभक्तांस 'वासुदेवक' व अर्जुनाच्या भक्तांस 'अर्जुनक' असें म्हणतात. वरील सूत्रावरील भाष्यांत पतंजलि म्हणतात कीं, वासुदेव, अर्जुन इत्यादि क्षत्रियांचीं नांवें नसून देवतांचीं नांवें आहेत. ह्यावरून पाणिनि व पतंजलि ह्यांच्या काळीं वासुदेव, अर्जुन इत्यादि देवी अवतार मानले जात असून त्यांच्या मूर्ति करून पूजा केली जात असावी.

अर्थशास्त्रकर्ते कौटिल्य चाणक्य यांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, राजधानीच्या मध्यभागीं पुढील निर्दिष्ट केलेल्या देवतांचीं मंदिरें बांधावीत. त्या देवता येणेंप्रमाणें—अपराजित, अप्रतिहत, जयंत, वैजयंत, शिव, अश्विनी, वैश्रवण, लक्ष्मी आणि मदिरा.

वरील विवेचनावरून पाणिनीच्या पूर्वीहि आपल्यांत मूर्तिपूजा होती हें सिद्ध होतें. अर्वाचीन संशोधक पाणिनीचा काल ख्रिस्तपूर्व चौथें शतक मानतात. पण अर्वाचीन व विशेषतः पाश्चात्त्य संशोधक यांची अशी वृत्ति असते कीं, भारतीय संस्कृतींतील प्रत्येक गोष्टीला शक्यतों अलीकडील काळांत आणावयाचें. पण ही वस्तुस्थिति इतिहासावरून सिद्ध होत नाहीं. पाणिनीचा काल ख्रिस्तपूर्व सातव्या शतकापूर्वीहि असावा असें आधुनिक भारतीय संशोधकांचें मत आहे. यावरून ख्रिस्तपूर्व सातव्या शतकापूर्वीहि मूर्तिपूजा प्रचलित असावी असें अनुमान निघतें.

ह्याविषयीं निरुक्तकार यास्काचार्यांचें विधान विशेषत्वानें लक्षांत घेण्यासारखें आहे. निरुक्त ७ ६–७ ह्या ठिकाणीं वेदोक्तमंत्रांत देवतामूर्तीचा उल्लेख आहे किंवा नाहीं याची त्यांनी ऐतिहासिकदृष्ट्या चर्चा केली आहे. ते म्हणतात कीं, देवतांच्या आकारधारणेविषयीं तीन मतें आहेत. तीं अशीं—

(१) देव मनुष्याकृतियुक्त आहेत.

(२) देव मनुष्याकृतियुक्त नाहींत.

(३) देव मूलतः आकृतिरहित आहेत. पण भिन्न भिन्न कर्मे करण्यास ते भिन्न भिन्न आकृति धारण करतात. पाहा—

'अथाकारचिन्तनं देवतानां । पुरुषविधाः स्युरित्येकम् । अपुरुषविधाः स्युरित्यपरम् । अपि वा उभयविधः स्युरपि वा । अपि वा अपुरुषविधानामेव सतामेते कर्मात्मानः स्युः ।'

ही एक प्रकारची अवतारकल्पनाच होय. देव म्हणजे विश्वांतील कोणी अमानुषी शक्ति. ती शक्ति मूलतः देहधारी म्हणजे सावयव नाहीं, पण निरुक्तकारांनीं म्हटल्याप्रमाणें, ती शक्ति कांहीं विशिष्ट कारणासाठीं देह धारण करते. उदाहरणार्थ, कार्यानुरूप व भक्तांच्या श्रद्धा व इच्छा यांनुसार विविध रूपानें तो प्रकट होतो विष्णु देहधारी नाहीं तरी दशावतार कल्पनेनें तो दृग्गोचर होतो. प्रह्लादासाठीं नरसिंहरूपानें विष्णु अवतरला. तसेंच पुंडलिकासाठीं विष्णु विठ्ठलरूपानें विटेवर उभा राहिला. 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते' ह्या वैदिक वचनाचा हाच अर्थ अभिप्रेत असावा. प्रस्तुत उताऱ्यांत माया म्हणजे शक्ति असा अर्थ आहे.

आर्यवैदिकेतर लोकांमध्यें अतिप्राचीन काळापासून मूर्तिपूजा चालत आलेली आहे, याबद्दलचे विपुल पुरावे आज उपलब्ध झाले आहेत सध्यां ज्ञात असलेल्या संस्कृतींत इजित व सुमेर येथील संस्कृति अत्यंत प्राचीन समजल्या जातात. नंतरच्या बॅबिलोनियन, असीरियन, क्रीटन, खाल्डियन, हिब्रू, फोनीशियन इत्यादि होत. सर्वांत अलीकडील संस्कृति म्हणजे ग्रीक, रोमन व खिस्ती. या सर्व पाश्चात्त्य देशांत मातृपूजेचा सार्वजनीन प्रचार होता भगतसंढा-खेरीज वरील देशांत मूर्तिपूजा यावरून चालू असल्याचें दिसून येतें. सिलोन, जपान, जावा, सुमात्रा, ऑस्ट्रिया इत्यादि देशांत श्रीगणेशमूर्ति आकारभिन्नत्वानें विपुल मिळाल्या असून मोहेंजोदारो, हाडप्पा येथील प्राचीन अवशेषांच्या उत्खननांत शिवशक्तीच्या मूर्तिहि आढळल्या आहेत गणेश व शिवशक्ति यांच्या मूर्ति जागोजाग दिसतात विष्णु, लक्ष्मी, देवी, स्कन्द इत्यादिकांच्या मूर्ति बिलकुल आढळत नाहींत. तरी मूर्तिपूजा त्याऱ्यात प्रचलित होती हें निःसंशयपणें सर्व संशोधक कबूल करतात मोहेंजोदारो, हाडप्पा येथील संस्कृतीचा काल खिस्तपूर्व पाच हजार वर्षांचा मानतात. हिंदुस्थानांत पूर्वेकडे आसाम व बंगाल आणि दक्षिणेकडे द्रविड व आन्ध्र या भागांत जे आर्येतर राहात होते त्याच्यातहि काली इत्यादि दैवतांची पूजा होती. पण वैदिक आर्यांनीं मूर्तिपूजेचा स्वीकार केला नव्हता. देहधारी नसलेल्या पण अतिमानुषी शक्तीचें वेदमंत्रांनीं यजन पूजन इत्यादि गोष्टी करून त्यांस संतुष्ट करण्याचें उद्दिष्ट होतें पण कालांतराने वैदिकधर्मी आर्य हळूहळू पूर्वेकडे व दक्षिणेकडे वसाहत करूं लागले जसजसा यज्ञप्रक्रियेचा लोप होत गेला व त्या त्या प्रांतांतील आर्येतर धर्मातील लोकांचा संसर्ग होत गेला,

तसतसा आर्यांनीं त्यांच्या धर्मांतील कांहीं तत्त्वांचा स्वीकार करून त्यांची वैदिक धर्माशीं सांगड घातली. अशा प्रकारें वैदिक धर्मीयांनी आर्येतरांच्या मूर्तिपूजेचा स्वीकार केला. पण मूर्तिपूजेचा स्वीकार केला तरी, त्यांनीं आपली मोक्षाची मूलभूत कल्पना बदललेली नाहीं. आध्यात्मिक व आधिदैविक सुखसाधनांशीं वैदिक कर्मकांड प्रारंभीच्या कालांत जसें होतें तसें पुढें शुद्ध राहिलें. मूर्तिपूजेचा संबंध जोडून दिला.

आपण शुद्ध राहून जर वैदिक कर्मकांडाची प्रक्रिया केली तरच त्याचें योग्य फल मिळतें. अशुद्ध स्थितींत जर ती प्रक्रिया केली तर अनिष्ट व विपरीत फल मिळतें कोणतेंहि कार्य घडून येण्यास पांच कारणें आहेत. तीं खालीं उद्धृत केलेल्या गीतेंतील श्लोकांवरून कळून येतात–

'अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥
पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥
अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥
शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥'

कर्म तीन प्रकारचें आहे–शरीरानें, वाचेनें व मनानें केलेलें कर्म. तसेंच कर्माचें फलहि तीन प्रकारचें आहे–अनिष्ट फल, इष्ट फल आणि कांहीं इष्ट व कांहीं अनिष्ट असें मिश्रफल त्रिविध कर्मांपैकीं कोणत्याहि प्रकारचें कर्म असलें तरी तें घडून येण्यास पांच कारणें आहेत. अधिष्ठान (स्थल), कर्ता, करण (साहित्य, साधन), चेष्टा (व्यापार) व दैव हीं तीं पांच कारणें होत. पैकीं पहिलीं चार मानवाधीन आहेत व पांचवें मानवाच्या स्वाधीन नसतें. धर्ममूलक अर्थप्राप्तीसाठीं व कामपूर्तीसाठीं ह्या पांचहि कारणांची शुद्धि असावी लागते म्हणजेच स्थलशुद्धि, देहशुद्धि–आचार-विचार-उच्चारादि शुद्धि, साहित्यशुद्धि व कर्मशुद्धि असल्याशिवाय मानवाचा अभ्युदय होणार नाहीं. पातंजलभाष्यांत वरील चार शुद्धींशिवाय पांचवी कालशुद्धि सांगितली आहे.

देहशुद्धि तीन प्रकारची आहे. १ आचारशुद्धि, २ विचारशुद्धि, ३ उच्चारशुद्धि.

आचारशुद्धि म्हणजे काय याची कल्पना आपल्याला शान्तिपर्वातील पुढील उताऱ्यावरून येते—

'आनृशंस्यमहिंसा च प्रमादः संविभागिता।
श्राद्धकर्मातिथेयं च सत्यमक्रोध एव च ॥
स्वेषु दारेषु संतोषः शौचं नित्यानसूयता।
आत्मज्ञानं तितिक्षा च धर्माः साधारणा नृप ॥

सामान्यतः जो आचार किंवा मानवी प्रवृत्ति धर्ममूलक आहे त्यायोगें कांहीं बाध येत नाहीं. पण अमर्याद किंवा स्वेच्छेनें केलेल्या आहार-विहारादि क्रिया अधर्मास कारणीभूत होतात

'न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने।'
'प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला॥'

या मनूक्त वचनांत आचारावर नियंत्रण घालून त्यास धर्माच्या चौकटींत बसविलें आहे.

मनुष्याच्या अभ्युदयास म्हणजे वैयक्तिक, सामाजिक व प्रादेशिक उत्कर्षास अर्थ व काम याची जरुरी असते कामसूत्रांत धर्म, अर्थ व काम यांच्या व्याख्या स्पष्ट केल्या आहेत—

'अलौकिकत्वाद्दृष्टार्थत्वादप्रवृत्तानां यज्ञादीनां शास्त्रात्प्रवर्तनम्। लौकिकत्वाद् दृष्टार्थत्वाच्च प्रवृत्तेभ्यश्च मांसभक्षणादिभ्यः शास्त्रादेव निवारणं धर्मः। तं श्रुतेर्धर्मज्ञसमवायाच्च प्रतिपद्येत। विद्याभूमिहिरण्यपशुधान्यभाण्डोपस्करमित्रादीनामर्जनमर्जितस्य विवर्धनमर्थः। तमध्यक्षप्रचाराद्वार्तासमयविद्भ्यो वणिग्भ्यश्चेति। श्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणानामात्मसंयुक्तेन मनसाधिष्ठितानां स्वेषु स्वेषु विषयेष्वानुकूल्यतः प्रवृत्तिः कामः स्पर्शविशेषविषये त्वस्याभिमानिकसुखानुविद्धा फलवत्यर्थप्रतीतिः प्राधान्यात्कामः। तं कामसूत्रान्नागरिकजनसमवायाच्च प्रतिपद्येत। तेषां समवाये पूर्वः पूर्वो गरीयान्। अर्थश्च राज्ञः। तन्मूलकत्वाल्लोकयात्रायाः। वेश्यायाश्च। इति त्रिवर्गप्रतिपत्तिः। (१ २।८-१७).

यावरून स्पष्ट होईल कीं, वैयक्तिक व सामाजिक अभ्युदयास अर्थप्राप्ति व कामपूर्ति यांची आवश्यकता आहे. पण या दोहोंची प्राप्ति शास्त्रप्रमाणें आचार पाळून केली पाहिजे.

'यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥'

या गीतोक्त वचनाप्रमाणें धर्मास अनुसरून अर्थप्राप्ति करावी. हल्लींची भ्रष्टाचारमूलक लांचलुचपत, भेसळ इत्यादि अधम मार्गांनीं केलेली अर्थप्राप्ति सुखास कारणीभूत न होतां अंतिम नाशास कारणीभूत होते. तसेंच अनैतिक व अशास्त्रीय मार्गांनीं केलेली कामपूर्ति सर्वांच्याच नाशास कारणीभूत होते. सारांश धर्ममूलक अर्थकाम हें अभ्युदयाचें मुलभूत कारण आहे.

आतांपर्यंत आचार व विचार शुद्धीचें विवेचन केलें. धर्ममूलक अर्थप्राप्तीसाठीं व कामपूर्तीसाठीं उच्चारशुद्धीचेंहि अत्यंत महत्त्व आहे. आपल्या वैदिक धर्मप्रक्रियेंत उच्चारशुद्धीची खास जरुरी आहे. आधिदैविक शक्तींच्या कृपाप्रसादासाठीं वैदिक मंत्रांची आवश्यकता आहे. वैदिक मंत्रांत हे जें सामर्थ्य आहे तें त्यांच्या प्रत्येक अक्षरांत, वर्णांत म्हणजे शुद्ध वर्णोच्चारांत आहे. उदाहरणार्थ, 'अग्निमीळे पुरोहितं' इत्यादि मंत्रांत 'अग्निमीळे' याच्याऐवजीं 'वह्निमीळे' म्हणून चालावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें त्यांतील उदात्त, अनुदात्त व स्वरित हे जे आघात आहेत ते तसेंच म्हटले पाहिजेत तसे जर म्हटले नाहींत तर इष्ट फलप्राप्ति होत नाहींच, उलट अनिष्ट फल मिळतें. उच्चारशुद्धीचें महत्त्व किती आहे हें पातंजलभाष्यांतील खालीं दिलेल्या कथेच्या उल्लेखावरून कळून येतें—

'एकः शब्दः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तः स तमर्थमाह ।
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥'

काळाच्या ओघांत पुढें वैदिक कर्मकांडाचा, व आचार-विचार उच्चार शुद्धीचा लोप होत गेला. बाह्य कर्माचाराचें मात्र अवडंबर माजलें. कर्माचार करूनहि तें योग्य पद्धतीनें न केल्यामुळें मानवाची इच्छापूर्ति होईनाशी झाली. त्यायोगें वैदिक कर्मकांडावरील लोकांची श्रद्धा ढळत चालली. ही परिस्थिति पाणिनिपूर्वकालापासून होत गेली. अशा परिस्थितींत मानवकल्याणाचा दुसरा एखादा मार्ग शोधावा असें लोककल्याणाची तळमळ

असलेल्या सत्पुरुषांना वाटल्यावरून त्यांनीं जनतेंत मूर्तिपूजा रूढ केली असावी. कर्मकांड हें कष्टसाध्य होतें त्याऐवजीं अधिक सुकर अशी मूर्तिपूजा प्रचलित झाली.

कालक्रमानें मूर्तिपूजेच्या विधिविधानांतहि अनिष्ट परिवर्तन घडलें यास पाणिनीचा व पतंजलीचा आधार आहे. त्यांत मूर्तीचा जो बाजार करतो त्यास व वेतन घेऊन पूजाअर्चा करणाऱ्या पूजकासहि अशुद्ध मानलें आहे. मूर्तिभंजक, मंदिरभंजक, व मूर्तिसन्निध मूत्रपुरीषादि अशौच करणारासहि पापी ठरविला आहे. मूर्तीस अर्पण केलेला नैवेद्य विकणारासहि पापी म्हटलें आहे.

मौर्यकालापासून मूर्तिपूजेसंबंधी अपवित्रता सुरू झाली असावी असें दिसतें. कारण ' मौर्यैर्हिरण्यार्थिभिरर्चाः प्रकल्पिताः ' असें महाभाष्यांत वचन आहे. मौर्यांनीं धनप्राप्तीसाठीं मूर्तिपूजेचा व मूर्तिविक्रयाचा उपयोग केला.

## कुंडलिनीविचार

प्रथमतः आपण कुंडलिनीयोगासंबंधी सौंदर्यलहरींत काय वर्णन आलें आहे तें पाहू—

'महीं मूलाधारे कमपि मणिपूरे हुतवहं' (श्लोक ९) या श्लोकांत मूलाधार, मणिपूर, स्वाधिष्ठान, अनाहत, विशुद्धि व आज्ञा हीं षट्चक्रें आणि पृथिवी, अप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें आणि मन यांचा उल्लेख आहे. या सर्वांच्या वर सहस्रदलकमल असून त्यात शिवशक्ति ही कुंडलिनीच्या रूपानें राहते, असें त्यात वर्णन आहे.

पुढें 'सुधाधारासारैश्चरणयुगलान्तर्विगलितैः' (श्लोक १०) या श्लोकांत सहस्रदलकमलांतून कुंडलिनी ही मूलाधार चक्रापर्यंत येऊन सापाप्रमाणें आपल्या शरीराची साडेतीन वेटोळीं करून कुंडाकार विद्यामध्यें निद्रित होते असें सांगितलें आहे.

नंतर 'तटिल्लेखातन्वीं तपनशशिवैश्वानरमयीं' (श्लोक २१) या श्लोकांत षट्चक्रांच्याहि वर असलेल्या सहस्रदलकमळाचा उल्लेख 'महापद्माटवी' या शब्दानें केला आहे.

शेवटीं श्लोक ३७ ते ४२ पर्यंतच्या सहा श्लोकांत आज्ञाचक्रापासून मूलाधारचक्रापर्यंतचें वर्णन असून, प्रत्येक चक्रांत भगवती कोणत्या रूपानें परिणत झाली तें रूप, त्या त्या चक्रांत शिवशक्तीनें कोणतीं रूपें धारण

केलीं तीं रूपें आणि त्या त्या रूपांत भगवतीचें ध्यान केलें म्हणजे भगवती-पासून कोणत्या सिद्धि प्राप्त होतात यांचें वर्णन आहे. यावरील स्पष्टीकरण त्या त्या श्लोकावरील भाषांतरामध्यें व टीपेमध्यें विशेषत्वानें केलेलेंच आहे.

सौंदर्यलहरीमध्यें जें कुंडलिनीचें वर्णन आहे तें शरीरान्तर्गत असणाऱ्या दैवी शक्तीस उद्देशून आहे. कांहींच्या मतें कुंडलिनी हेंच जीवात्मशक्तीचें रूप आहे आणि त्या रूपानेंच जीवात्मशक्ति आरोहण व अवरोहण करते. पण कांहींच्या मतें जीवात्मशक्तीच्या आरोहणअवरोहणाचा मार्ग म्हणजेच ही कुंडलिनी होय. दोन्हीं मतांप्रमाणें सर्वांत खालच्या मूलाधारचक्रांत ती शक्ति सुषुप्तावस्थेंत असते. यौगिक प्रक्रियेनें तिला जागृत केले कीं, ती क्रमाक्रमानें सहाहि चक्रांचें भेदन करून सहस्रदलकमलांत जाते व शिवाशीं एकरूप होते. अर्वाचीन काळांतील योग व शैव उपनिषदांत कुंडलिनीचें जें वर्णन आहे, त्या वर्णनांतील कांहीं पारिभाषिक शब्द सौंदर्यलहरींतील वर्णनांत आले आहेत. उदाहरणार्थ, षट्चक्रांचीं नांवें व त्यांनीं दर्शविलेलीं विश्वान्तर्गत पंचमहाभूतादि तत्त्वें हीं होत. तसेंच एका श्लोकांत वर्णिलें आहे कीं, कुंडलिनी ही मूलाधारचक्ररूपी गुहेंत निद्रित होते. पण यांतील वर्णन हें व्यक्तिगत कुंडलिनीशीं जमत नाहीं. योगचूडामणि, सौभाग्यलक्ष्मी, योगकुण्डलिनी इत्यादि उपनिषदांत शरीरान्तर्गत कुंडलिनीच्या स्थानासंबंधीं बराच मतभेद दिसतो ( ब्राउन, प्रस्तावना पृ. २२ पाहा ). तसेंच मूलाधारचक्रांत ही कुंडलिनी साडेतीन वेटोळीं घेऊन निद्रित होते असें हीं उपनिषदें सांगत नाहींत अर्वाचीन कांहीं तंत्रग्रंथांत सांगितलें आहे कीं, शिव हा लिंगरूप असून, त्याभोंवतीं साडेतीन वेटोळीं घालून कुंडलिनी निद्रित असते. तसेंच ह्या तंत्रग्रंथांत षट्चक्रें व त्यांचीं स्थानेंहि सारखीं नाहींत. या सर्व बाबतींत सौंदर्यलहरींतील वर्णन अगदींच निराळें आहे.

योगिनीहृदयाच्या दीपकनामक टीकेंत स्वच्छन्दसंग्रहांतील जे श्लोक उद्धृत केले आहेत त्यांत भिन्न भिन्न चक्रांतील स्वरव्यंजनांनीं प्रारंभ होणाऱ्या नांवांच्या देवता निर्दिष्ट केल्या आहेत. ते श्लोक खालीलप्रमाणें—

'अमृता प्रथमा देवी द्वितीयाकर्षिणी मता ।
इन्द्राणी तु तृतीया स्यादीशानी तु चतुर्थिका ॥

पञ्चमी स्यादुमा देवी षष्ठी चैवोर्ध्वकेशिनी।
सप्तमी ऋद्धिदा प्रोक्ता रूपा चाष्टमिका मता॥
रुका नवमिका प्रोक्ता रूपा स्याद्दशमी मता।
एकादशी यथा चैकपादा द्वादशिका शिवे॥
ऐश्वर्याभिरता पश्चादोङ्कारी तु त्रयोदशी।
चतुर्दशी चौषधात्मा पञ्चाधिकदशाम्बिका॥
षोडशी त्वक्षरा देवी प्रोक्ताः षोडश शक्तयः।
कालरात्रिश्च खातीता गायत्री च ततः परम्॥
घण्टाधारी च डार्णात्मा चण्डा छाया जयापि च।
झङ्कारी ज्ञानरूपा च टङ्कहस्ता ततः परम्॥
ठङ्कारी द्वादश ह्येता द्वादशारे समर्चयेत्।
डाकिनीं चैव ढङ्कारीं णामिनीं तामसीं तथा॥
स्थाण्वीं दाक्षायणीं चैव धात्रीं नन्दां च पार्वतीम्।
फट्कारीं दशपत्रेषु पूर्वादीशान्तिकं यजेत्॥
वन्धिनीं भद्रकालीं च महामायां यशस्विनीम्।
रक्तां लम्बोष्ठिकां चैव पूजयेत् क्रमशः प्रिये॥
चतुष्पत्रे च देवेशि वरदां च श्रियं तथा।
षण्डां सरस्वतीं चैव पूजयेत् क्रमशः शिवे॥
क्षमां हासवतीं चैव पूजयेच्च द्विपत्रयोः।
एताभिः शक्तिभिर्युक्ता धातव्याश्च सुरेश्वरि॥'

(३) मणिपूरचक्रांतील देवतांची नांवें —

१ डाकिनी, २ ढङ्कारी, ३ णामिनी, ४ तामसी, ५ स्थाण्वी, ६ दाक्षायणी, ७ धात्री, ८ नन्दा, ९ पार्वती व १० फट्कारी.

(४) स्वाधिष्ठानचक्रांतील देवतांचीं नांवें —

१ बन्धिनी, २ भद्रकाली, ३ महामाया, ४ यशस्विनी, ५ रक्ता व ६ लम्बोष्ठिका.

(५) मूलाधारचक्रांतील देवतांचीं नांवें —

१ वरदा, २ श्री, ३ षण्ढा व ४ सरस्वती.

(६) आज्ञाचक्रांतील देवतांचीं नांवें —

१ क्षमा व २ हासवती.

सहस्त्रदलकमलचक्रांत अपासून क्षपर्यंत सर्व वर्णांनीं युक्त देवता आहेत.

ह्या षट्चक्रांत भगवती त्रिपुरसुंदरी डाकिन्यादि रूपांनीं राहून त्या चक्रांच्या दलामध्येंहि भिन्न भिन्न नामरूप धारण करून राहते. आपल्या पन्नास स्वरव्यंजनादि वर्णमालेंतील सर्व अक्षरांना 'मातृका' असें म्हणतात. म्हणजे सर्व वर्ण भगवतीरूपच आहेत असे वामकेश्वरतंत्रांतील नित्याषोडशिकार्णवावरील भास्करराय टीकेंतील पुढील श्लोकांत सूचित केलें आहे—

'गणेशग्रहनक्षत्रयोगिनीराशिरूपिणीम्।
देवीं मन्त्रमयीं नौमि मातृकां पीठरूपिणीम्।'

भगवती त्रिपुरसुंदरीचें परिणतरूप म्हणजे हे समग्र विश्व होय म्हणजे विश्वांतील प्रत्येक वस्तु भगवतीचेंच रूप मानलें पाहिजे. म्हणून वर्णमाला हीसुद्धां भगवतीचेंच रूप होय. ह्या वर्णमालेलाच मातृका म्हणतात. देवी भगवतीचा मातृका ह्या नांवाचा उल्लेख प्रस्तुत श्लोकांत आहे म्हणून वर्णमाला हेंहि भगवतीचें रूप आहे. षट्चक्रांतील देवतांच्या नांवांनींहि हेंच दर्शविलें आहे.

आनंदलहरीच्या शेवटच्या सहा श्लोकांत या षट्चक्रांतील देवता व त्यांचें ध्यान केल्यानें मिळणारें फल सांगितलें आहे. ह्या वर्णनाचा प्रारंभ आज्ञाचक्रापासून केला आहे. ह्या आज्ञाचक्रामध्यें कोटिचंद्रसूर्यापेक्षां तेजस्वी असा परशंभु पार्श्वभागीं असलेल्या परचित् नांवाच्या शक्तीनें युक्त असतो.

त्याच भक्तिपूर्वक ध्यान केलें म्हणजे सूर्यचंद्रसुद्धा जेथें पोहोंचत नाहींत अशा भालोक नामान्या लोकामध्ये उपासक राहतो पुढील श्लोकात (श्लोक २८) विशुद्धिचक्रातील देवताच वर्णन आहे या चक्रात शुद्ध स्फटिकाप्रमाणें तेजस्वी शिव व शिवा राहतात त्याचे ध्यान केल्यानें अंतःकरणातील अज्ञानरूपी अंधकार नष्ट होतो व उपासकाला हें विश्व चंद्रकिरणाप्रमाणें सौम्य स्वरूपात दिसत यापुढ अनाहतचक्राच वर्णन आहे (श्लोक ९) हें वायूच स्थान आहे भगवती ही हंसद्वंद्वाच्या रूपानें वास करते उपासकान त्याच ध्यान केल म्हणजे त्याला अठराहि विद्या पूर्णपणें प्राप्त होतात व त्याच्यातील सर्व दोष नष्ट होतात हें वर्णन व्यक्तिगत कुंडलिनीयोगाशीं मुळींच सुसंगत नाहीं यानंतर स्वाधिष्ठानचक्राचें वर्णन आहे (श्लोक ४०) ते अग्नीच स्थान आहे व्यक्तिगत कुंडलिनीयोगात अनाहतचक्राखालीं मणिपूरचक्र आहे व त्याच्या खाली स्वाधिष्ठानचक्र आहे सौंदर्यलहरीस्तोत्रातील वर्णनात मात्र दोहोंची उलटापालट झाली आहे म्हणजे या स्तोत्राप्रमाणें अनाहतचक्राखालीं स्वाधिष्ठानचक्र व त्याखालीं मणिपूरचक्र आहे स्तोत्रातील क्रम वैदिक परंपरेशी जुळणारा म्हणून योग्य व सयुक्तिक वाटतो कारण वैदिक परंपरेत जीवात्म्याच स्थान नाभि आहे तसेच जीवात्म्याचा प्रतिनिधि अग्नि त्यास स्वाधिष्ठान हें स्थान योग्य आहे 'यज्ञो वै भुवनस्य नाभिः' असें श्रुतिवचन आहे यज्ञ हा अग्नीचें अधिष्ठान असून अग्नि हा देवतांना हविर्द्रव्य पोहोंचवितो याला पोषक खालील श्रुतिवचनें आहेत—

'अग्निं दूतं वृणीमहे । होतारं विश्ववेदसम् । अस्य यज्ञस्य सुक्रतुम्'॥ 'अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।' हा अग्नि देवाचा पुरोहित असून यज्ञाचा ऋत्विज आहे श्रीसूक्तातील पुढील दोन मन्त्रात चंद्र व सूर्य ह्यांना अग्नीचें प्रतीक मानलं आहे अंतरिक्ष व द्युलोक यांच्या देवता अनुक्रमें चंद्र व सूर्य आहेत म्हणजे अग्नि हा पृथ्वी, अन्तरिक्ष व द्युलोक यातील देवतांचा प्रतिनिधि आहे आणि तो तृप्त झाला म्हणजे सर्व देवता तृप्त होतात व त्या मनुष्यास सुखी करतात

'आर्द्रां पुष्करिणीं पुष्टिं सुवर्णां हेममालिनीम् ।
सूर्यां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो म आवह ॥

आर्द्रां यःकरिणीं यष्टिं पिङ्गलां पद्ममालिनीम् ।
चन्द्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो म आवह ॥

ता म आवह जातवेदो लक्ष्मीमनपगामिनीम् ।
यस्या हिरण्य प्रभूत गावो दास्योऽश्वान् विन्देय पुरुषानहम्॥ '

या मन्त्रांत तर जातवेद हे अग्नीचें नावच आहे अशा प्रकारची विश्वाची किंवा त्रिलोकीची देवता नाभिस्थानीं असणें हेच योग्य आहे आणि त्या स्थानास 'स्व-अधिष्ठान' म्हटले आहे तेंहि योग्यच आहे. वाणीचें जिला आरंभीं 'परा' म्हणतात तिचे, मूळस्थान नाभीच आहे असे वर्णोत्पत्ति सांगताना पाणिनीयशिक्षाग्रथात सांगितलें आहे ह्या वर्णमालेस 'मातृका' म्हणतात व मातृका म्हणजे माता ही भगवती आहे, असे नित्याषोडशिकार्णव ग्रथात सांगितलें आहे, हे आपण वर पाहिलेच आहे अशा प्रकारें वर्णमाला रूपानें व विश्वरूपानें परिणत झालेल्या भगवतीच स्थान नाभि आहे ब्रह्मानें निर्माण केलेली पहिली देवता अग्नि आहे अशा प्रकारें सर्वांचें मूलस्थान नाभि असणें हेच युक्त आहे व त्याचें 'स्वाधिष्ठान' हे नावहि योग्य आहे ह्या स्वाधिष्ठानचक्रात शिवशक्ति सरत व समया ह्या रूपानीं राहतात त्याची उपासना केल्यानें उपासकास शाति मिळते या स्वाधिष्ठानचक्राखालीं मणिपूरचक्र आहे. तेथें शिवशक्ति मेघ व विद्युत् या रूपानीं राहतात त्याची उपासना केली की, विद्युत्शक्ति ही विश्वातील अधकार नष्ट करते व मेघरूपी शिव रुद्रानें तप्त केलेल्या त्रिभुवनाला शाति देतो ' तेजोऽपश्चानि सृष्ट्वा ' या उपनिषद्वाक्यात सांगितल्याप्रमाणें तेजानतर जल येणें ह स्वाभाविकच असल्यामुळें अग्निस्थानाखालील स्थानात म्हणजे स्वाधिष्ठानचक्राखालील मणिपूरचक्रात जलस्थान असणें युक्त आहे श्लोकातील मेघ शब्दानें जलशब्द सूचित केला आहे शेवटीं मूलाधारचक्रात ताडवनृत्य करणारा शिव व लास्य करणारी शक्ति ह्या रूपानी शिवशक्ति असतात मूलाधारचक्र म्हणजे विश्वाचें मूल शिवानें ताडवनृत्य करून पाणिनीचीं १४ सूत्रें निर्माण केलीं व कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें शिवानें पृथिव्यादि प्रत्यक्ष दिसणाऱ्या अष्टमूर्ति धारण केल्या अशा प्रकारच शिवशक्तीचें अष्टमूर्तित्व पुढील देवीपच स्तवीस्तोत्रात सांगितलें आहे—

अशा प्रकारें अष्टमूर्तीचें वर्णन आहे. तरीपण प्रस्तुत स्तोत्रांत 'मनस्त्वं व्योमस्त्वं' या श्लोकांत फक्त सहा तत्त्वांचा–मूर्तींचा निर्देश केला आहे भगवती ही ह्या सहा तत्त्वांच्या रूपानें परिणत झाली आहे असें या श्लोकांत म्हटलें आहे. सहाच तत्त्वांचा कां निर्देश केला आहे ह्याचे कारण भगवतीचा षट्चक्रांशीं संबंध जोडल्यामुळें फक्त ह्या सहा तत्त्वांचाच निर्देश केला असावा असें अनुमान करतां येईल अशा प्रकारें विश्वाचें मूलकारण शिवशक्ति ह्या मूलाधारचक्रांत आहेत म्हणून त्या चक्राचें मूलाधार हें नांव यथार्थ आहे.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल की, *व्यक्तिगत कुंडलिनीयोगांतील* कांहीं पारिभाषिक संज्ञा जरी प्रस्तुत स्तोत्रांत निर्दिष्ट केल्या आहेत, *तरीपण तेवढ्यानें व्यक्तिगत कुंडलिनीचें हें वर्णन आहे असें म्हणणें* योग्य नाहीं. बहुतेक टीकाकारांनीं स्तोत्रातील चक्रवर्णनाचें व्यक्तिगत *कुंडलिनीच्या चक्रांशीं साम्य दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो* समाधानकारक नाहीं. प्रो. ब्राऊन ह्यांच्या मतें हें वर्णन वैयक्तिक *कुंडलिनीशीं गैरलागू आहे. इतर कोणत्याहि टीकाकारांनीं हा विरोध* दर्शविला नाहीं.

कुंडलिनीयोगाविषयीं इतकें विस्तृत लिहिण्याचें कारण असें कीं, त्याचा संबंध स्तोत्रक र्याच्या कालनिर्णयाशीं येतो. ह्या स्तोत्राचें कर्तृत्व आद्य शंकराचार्यांचें नसावें ह्या मताच्या पुष्ट्यर्थ कुंडलिनीयोगाच्या संबधांत पुढील दोन कारणें स्पष्ट आहेत—

(१) आद्य शंकराचार्यांनीं केलेल्या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात व त्यांनीं केलेल्या उपनिषदांवरील भाष्यात कुंडलिनीयोगाचा मुळींच उल्लेख नाहीं. उलटपक्षीं त्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्यात उपनिषद्विरोधी जीं दर्शनें आहेत त्यांत पतंजलीच्या योगदर्शनाचहि खंडन केलें आहे पण योगशास्त्रसमत कुंडलिनी योग प्रस्तुत स्तोत्रांत गौरविला आहे. मग तो आद्य शंकराचार्यांना कसा समत असेल? म्हणून ह्या स्तोत्राचे कर्ते आद्य शंकराचार्य नसले पाहिजेत हें स्पष्ट आहे. शिवाय,

(२) दुसरें असें कीं, पतंजलिप्रणीत जीं योगसूत्रें प्रचलित आहेत त्यात कुंडलिनीयोगाचें बिलकुल वर्णन नाहीं. कुंडलिनीयोग हा योगशास्त्रांत केव्हां शिरला हा स्वतंत्र विषय असून तो येथें अप्रस्तुत आहे, म्हणून त्याचें विवेचन

येथें केले नाहीं. पण पतंजलीच्या काळानंतर केव्हांतरी त्याचा योगशास्त्रांत समावेश केला असावा. तो नक्की काल कोणता हें जरी ठरवितां येत नसलें, तरीपण आद्य शंकराचार्यांच्या कालानंतर तो केव्हांतरी असावा. या कारणानें सौंदर्यलहरीचें कर्तृत्व आद्य शंकराचार्यांना देणें योग्य होणार नाहीं.

तसेंच वैयक्तिक कुंडलिनीयोगाशीं सौंदर्यलहरींतील कुंडलिनीशीं तीन गोष्टींत फरक आहे तो असा—

(१) कुंडलिनीयोगांतील प्रत्येक चक्राचें कमलाकार वर्णन असून त्यांचीं विशिष्ट संख्यायुक्त दलें सांगून त्या प्रत्येक कमलाचे विशिष्ट वर्ण सांगितले आहेत. वर्णमालेतील पन्नासहि वर्ण षट्चक्रदलांत विभागून दिले आहेत. प्रस्तुत स्तोत्रांतील चक्रांत तें सांगितलें नाहीं.

(२) वर्णमालेंतील वर्ण निर्दिष्ट नसले तरी विशिष्ट संख्येनें प्रत्येक तत्त्वांत भगवतीचें चरणमयूख ( किरण ) 'क्षितौ षट्पञ्चाशत्' इ. ह्या श्लोकांत सांगितले आहेत. वर्णांची संख्या ५० आहे तर किरणांची संख्या ३६० आहे.

(३) चक्रांत देवतांसंबंधीं विभिन्नता आहे. स्तोत्रांतील षट्चक्रवर्णनांत शिवशक्ति ज्या भिन्न भिन्न देवतारूपांनीं अवतीर्ण होतात, त्या त्या देवतांचीं नावें पूर्वीं उद्धृत केली आहेतच. वैयक्तिक कुंडलिनीमार्गांतील जीं सहा चक्रें आहेत, त्यांच्याहि देवता सांगितल्या आहेत त्या स्तोत्रांतील देवताहून भिन्न आहेत, इतकेंच नव्हें पण भिन्न भिन्न संप्रदायामध्यें त्या त्या देवतांचीं नांवेंहि भिन्न भिन्न आहेत. उदाहरणार्थ, पुढील दोन संप्रदायांचें प्रकार पाहा—

(१) एका संप्रदायाप्रमाणें चतुर्दल मूलाधारांत गणपति, षड्दल स्वाधिष्ठानांत ब्रह्मा, दशदल मणिपुरांत विष्णु, द्वादशदल अनाहतचक्रांत रुद्र, षोडशदल विशुद्धिचक्रांत जीवात्मा, द्विदल आज्ञाचक्रांत परमात्मा व सहस्र दलकमलचक्रांत श्रीगुरु ह्या देवता आहेत.

(२) दुसरा प्रकार ललितासहस्रनामांत दिसतो. विशुद्धिचक्रांत भगवती त्रिपुरसुंदरी एकमुखी, रक्तवर्णा, पायसान्नप्रिया, त्वग्धातूंत राहणारी, अमृतादि सोळा शक्तींनीं वेष्टित असलेली डाकिनी हें नांव धारण करून राहते. अमृतादि सोळा शक्ति म्हणजे सोळा आद्य स्वरांनीं सुरू होणाऱ्या नांवाच्या होत. ह्या सोळा शक्तींचीं नांवें आपण पाहिलींच आहेत.

अनाहतचक्रांत भगवती श्यामवर्णा, द्विमुखी, रक्तधातूंत राहणारी, स्निग्ध अन्न प्रिय असलेली, राकिणीरूप धारण करणारी, कालरात्री इत्यादि बारा शक्तींनीं वेष्टित असते. अनाहतचक्र हें द्वादशदलकमल आहे. प्रत्येक दलांत एक एक देवता आहे. त्या देवतांच्या नांवांचीं आद्याक्षरें कपासून ठपर्यंत बारा वर्णांचीं आहेत.

मणिपूर हें दशदलकमल आहे. त्यांत भगवती त्रिमुखी रक्तवर्णा व मांसधातूंत राहणारी असून गुडान्नप्रिया आहे. ती लाकिणी हें नांव धारण करणारी असून डाकिनी इत्यादि दहा शक्तींनीं वेष्टित आहे. त्यांच्या नांवांचीं आद्याक्षरें डपासून फपर्यंत दहा वर्णांची आहेत.

स्वाधिष्ठानचक्रांत भगवती चतुर्मुखी, पीतवर्णा, मेदधातूंत राहणारी, दध्यन्नप्रिया असून काकिणी हें नांव धारण करणारी आहे. हें स्वाधिष्ठानचक्र षड्दलकमल आहे. त्यांत बन्दिनी इत्यादि सहा देवता असून त्यांच्या नांवांचीं आद्याक्षरें बपासून लपर्यंतच्या सहा वर्णांचीं आहेत.

*मूलाधारचक्रांत भगवती* पंचमुखी असून धूम्रवर्णा, *अस्थिधातूंत* राहणारी, मुद्गौदनप्रिया ( मुगाचे पदार्थ प्रिय असणारी ) व शाकिनी हें नांव धारण करणारी आहे ती वरदादि चार शक्तींनीं वेष्टित आहे. हें मूलाधारचक्र चतुर्दलकमल आहे व त्यांत व,श,ष,स, ह्या वर्णांनीं आरंभ होणाऱ्या नांवांच्या देवता आहेत.

आज्ञाचक्रांत भगवती षण्मुखी असून शुक्लवर्णाची, *मज्जाधातूंत* राहणारी व हरिद्रान्नप्रिया आहे. ती हाकिनीरूपानें या चक्रांत राहते. हें आज्ञाचक्र द्विदलकमल असून त्यांत ह आणि क्ष या दोन वर्णांनीं आरंभ होणाऱ्या नांवांच्या देवता आहेत.

पुढें ब्रह्मरन्ध्रांत सहस्रदलकमल आहे. यांत भगवती सर्वतोमुखी आहे. ती शुक्लवर्णाची असून याकिनीरूपानें येथें राहते ती शुक्रधातूंत राहणारी असून सर्वौदनप्रिया–सर्व प्रकारचें अन्न आवडणारी आहे. अपासून क्षपर्यंतच्या आद्याक्षरांनीं युक्त असलेल्या देवतांनीं ती वेष्टित आहे

ह्याप्रमाणें वर जे दोन प्रकार सांगितले त्यांतील व सौंदर्यलहरींतील षट्चक्राच्या देवता वगैरे संबंधीची विभिन्नता स्पष्टपणें दिसून येते. सौंदर्यलहरींत सांगितलेलें ज्या संप्रदायाचें वर्णन आहे त्याचा आधारभूत ग्रंथ कोणता ह्याबद्दलचा उल्लेख कोणत्याहि टीकाकारानें केला नाहीं.

सौंदर्यलहरींतील आठव्या व नवव्या श्लोकांत मणिद्वीपामध्यें राहणाऱ्या भगवतीचा उल्लेख प्रथम असून लगेच पुढील दहाव्या श्लोकांत भगवती ही शिवाशीं एकरूप होऊन सहस्रदलकमलांत राहते असा उल्लेख आहे. म्हणजेच कुंडलिनी हें भगवतीचें रूप आहे असें स्तोत्रकाराला म्हणावयाचें आहे. योगशास्त्रांतील कुंडलिनी ही चिद्रूपिणी असल्याचें कोठेंहि वर्णन नाहीं. तसेंच श्लोक ३६ मध्यें सांगितलें आहे कीं, मन, आकाश, वायु, अग्नि, जळ व पृथ्वी ह्या सहा रूपांनी भगवती स्वतःला परिणत करते. परिणत झाल्यानंतरहि ती चिदानंदरूपानें शिवाशीं एकरूप होऊन राहते योगशास्त्रांतील कुंडलिनीचें परिणाम म्हणजे हीं पंचमहाभूतें आहेत असें सांगितलें नाहीं. कारण ती कुंडलिनी भगवतीरूप मानली नाहीं. मूलाधारापासून विशुद्धिपर्यंतचीं पांच चक्रें हीं पृथिव्यादि पंचमहाभूतांचीं स्थानें आहेत असें सांगितलें आहे, पण हीं पंचमहाभूतें कुंडलिनीचें परिणाम आहेत असें सांगितलें नाहीं. श्लोक १४ मध्यें पंचमहाभूतांचे किरण व त्यांची संख्या सांगितली आहे. पृथ्वीतत्त्वांत ५६ किरण, जलतत्त्वांत ५२, अग्नितत्त्वांत ६२, वायुतत्त्वांत ५४, आकाशतत्त्वांत ७२ व मनस्तत्त्वांत ६४ किरण असून एकूण ३६० किरण आहेत श्लोकांत शेवटीं म्हटलें आहे कीं, ह्या सर्व तत्त्वांच्या व किरणांच्या वर भगवतीचें चरणकमल आहेत. हें प्रचलित कुंडलिनीयोगांत मुळींच सांगितलें नाहीं.

सौंदर्यलहरींतील कुंडलिनीयोगाचें इतकें विस्तृत वर्णन देण्याचें कारण इतकेंच कीं, त्यायोगे स्तोत्राचा कालनिर्णय करतां यावा. योगशास्त्राचा आधारभूत ग्रंथ म्हणजे पातंजलयोगसूत्रें हा होय. त्यांत कुंडलिनीयोगाचें बिलकुल वर्णन नाही. शिवाय स्तोत्रांतील योगासंबंधीची माहितीहि योगशास्त्रांत नाहीं. स्तोत्रांतील कुंडलिनीचें वर्णन परिणत अवस्थेंतील आहे. म्हणून योगशास्त्र फार प्रगत झाल्यानंतरच हें स्तोत्र झालें असलें पाहिजे. आद्य शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रांवरील आपल्या भाष्यांत योगमार्गाचें खंडन केलें आहे. तेथें त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, सांख्य व योग ह्या दर्शनांत उपनिषद्ग्रामध्यें न सांगितलेला भाग हा खंडनाचा विषय आहे जेथें त्या दर्शनाचा उपनिषदुक्त ज्ञानाशीं विरोध नाहीं तेथें हें खंडन लागू नाहीं. इतकेंच नव्हे तर आतांपर्यंत स्तोत्रांत वर्णन केलेलें कुंडलिनीचें वर्णन उपनिषदुक्त नाहीं. तसेंच ह्या कुंडलिनीयोगाचें अधिष्ठान म्हणून जें तत्त्वज्ञान सांगितलें आहे तें उपनिषदुक्त ज्ञानाशीं विरोधी आहे. ह्या विरोधाचें स्पष्टीकरण स्तोत्रांतील

तत्त्वज्ञानाचें विवरण करतेंवेळीं केलें आहेच. पण येथें सांगण्याचा मुख्य मुद्दा म्हणजे उपनिषदांना प्रमाणभूत मानणारे आद्य शंकराचार्य ह्या स्तोत्राचे कर्ते नसले पाहिजेत हें स्पष्ट होतें.

## सौंदर्यलहरी स्तोत्राचें कर्तृत्व व कालनिर्णय

सौंदर्यलहरी हें स्तोत्र ब्रह्मसूत्रभाष्यकार जगद्गुरु श्रीमदाद्यशंकराचार्य-प्रणीत असावें असा सार्वत्रिक प्रवाद आहे. वल्लभदेवाच्या 'सुभाषितावली' नांवाच्या सुभाषितसंग्रहांत सौंदर्यलहरींतील ' जपो जल्पः शिल्पं सकलमपि मुद्राविरचना '... हा श्लोक श्रीशंकराचार्यांच्या नांवें उद्धृत केला आहे. हें स्तोत्र इतकें लोकप्रिय आहे कीं, त्यावर सुमारें ३६-३८ टीका आहेत. इतक्या टीका इतर ग्रंथांवर क्वचितच आढळतील बहुशः नाहींतच. विविध टीकांची विपुलता ही मूल ग्रंथाची लोकप्रियता दर्शविते. प्रस्तुत स्तोत्राचे बरेच टीकाकार त्याचें कर्तृत्व आद्य शंकराचार्यांकडे देतात. उदाहरणार्थ, सौभाग्यवर्धिनीटीकेचा कर्ता कैवल्याश्रम म्हणतो कीं—

'श्रीशंकराचार्यकृते स्तवेऽस्मिन् टीकां चिकीर्षोर्मम मन्दबुद्धेः।
विद्वृपकस्येव वचोऽस्तु युष्मद्धासाय सन्तोऽस्मि तथापि धन्यः॥

भगवान् परमकारुणिकः शंकरावतारः शंकराचार्यः शिवशक्त्योरभेदं ज्ञापयितुं सकलप्रपञ्चसाक्षिण्याः ब्रह्माविनाभूतचिच्छक्तेः स्तुतिद्वारा मातृकादि-मन्त्रानुद्धरति ।'

लक्ष्मीधर आपल्या टीकेंत म्हणतो—

'इह खलु शंकरभगवत्पूज्यपादाः समयमततत्त्ववेदिनः समयाख्यां चन्द्रकलां श्लोकशतेन प्रस्तुवन्ति शिवः शक्त्या' इत्यादि असेंच दुसरेहि कांहीं टीकाकार सौंदर्यलहरीचे कर्ते आद्य श्रीशंकराचार्यच मानतात.

जल्हणाच्या 'सूक्तिमुक्तावली' नांवाच्या सुभाषितसंग्रहांत राजशेखराच्या नांवानें पुढील श्लोक उद्धृत केला आहे—

' स्थिता माध्वीकपाकत्वान्निसर्गमधुरापि हि ।
किमपि स्वदते वाणी केषांचिद्र यदि शाङ्करी ॥ '

हें वचन ॲव्हॅलॉनच्या आनंदलहरीच्या इंग्रजी भाषांतरित पुस्तकांतील पृष्ठ ६ वर उल्लेखिलें आहे.

अशा प्रकारें पुष्कळांच्या मतें सौंदर्यलहरी स्तोत्र हें आद्य शंकराचार्यांनीं रचिलें आहे.

अमेरिकेंत हारवर्ड युनिव्हर्सिटीनें पांचसहा वर्षांपूर्वी सौंदर्यलहरीची इंग्रजी भाषांतरासहित एक प्रत छापली आहे. ह्या स्तोत्राचें भाषांतर व संपादन प्रो. नॉर्मन ब्राऊन ह्यानें केलें आहे. ह्या ग्रंथाचें खास वैशिष्ट्य असें कीं, प्रत्येक श्लोकाचें हस्तलिखित व भगवतीच्या वर्णनपर चित्राचें छायाचित्र छापलें आहे. त्यांनें प्रस्तावनेंत म्हटलें आहे कीं, श्रीशंकराचार्यांच्या ह्या स्तोत्राचें कर्तृत्व शंकास्पद आहे ( पृष्ठ २९ ) आणि माझ्याहि मतें तेंच युक्त आहे. प्रो. ब्राऊनचीं कारणें अगोदर सांगून त्याच्या पुष्ट्यर्थ माझी कारणमीमांसा नंतर देत आहे. प्रो. ब्राऊन याचा युक्तिवाद खालीलप्रमाणें—

प्रो. ब्राऊन म्हणतो कीं, 'सुधाविद्योतनी' नामक सौंदर्यलहरीवरील टीकेचें हस्तलिखित त्यास आढळलें आहे. (तें हस्तलिखित मलाहि उपलब्ध झालें आहे. ) ही टीका सौंदर्यलहरीच्या पहिल्या ४१ श्लोकांवरच आहे. त्या टीकाकारानें नांव अरिजित् किंवा अरिच्छित् असें आहे. तो टीकाकार आपल्या टीकेंत म्हणतो कीं, ' ही सौंदर्यलहरी किंवा आनंदलहरी माझा पिता प्रवरसेन ह्यानें लिहिली आहे. तो द्रविड देशाचा राजा होता व त्याचें नांव द्रविड असें होतें.' ह्यासंबंधीं विस्तृत विवेचन श्लोक ७७ वरील टीकेंत केलेंच आहे. यावरून द्रविडशिशु म्हणजे शंकराचार्यांसिरीज अन्य कोणी असावेत असे उल्लेख आहेत. द्रविडशिशु म्हणजे अरिजित्चे वडील प्रवरसेन असावेत, तर कांहींच्या मतें ज्ञानसंबंधनामक द्रविड कवि आहे असें तेथें म्हटलें आहे. इतरांच्या मतें द्रविडशिशु म्हणजे आद्य शंकराचार्य होत. पण हें मत बरोबर नाहीं. द्रविड देशाच्या प्राचीन इतिहासांत लेखकाला सदर राजाचा नामोल्लेख आढळत नाहीं. द्रविडशिशूबद्दल 'द्रविडशिशुरास्वाद्य तव यत्। कवीनां प्रौढानां अजनि कमनीयः कवयिता।' अशी आत्मस्तुति आद्य शंकराचार्य स्वतः करतील हें असंभवनीय वाटतें. म्हणून हा द्रविडशिशु आद्य शंकराचार्य नसून इतर कोणी असावेत असे वाटतें. तसेंच सदर उल्लेख द्रविडशिशूबद्दल जरी असला तरी त्यावरून ग्रंथकर्त्याबद्दल कांहीं हा उल्लेख होत नाहीं.

कदा काले मातः...'ह्या श्लोक ९१ मध्यें

'प्रकृत्या मूकानामपि कविताकारणतया
कदा धत्ते वाणी मुखकमलताम्बूलरसताम्।'

मुक्यासहि वाक्शक्ति भगवती देते असें वर्णन आहे. या श्लोकाच्या आधारें मूककवि नांवाच्या एका द्रविड कवीचा उल्लेख प्रस्तुत श्लोकांत आहे असें कोहीं मानतात. द्रविड देशांतहि एक मूककवि नामक कवि होऊन गेला आहे. (श्लोक ९१ वरील विवेचनांत त्यासंबंधीं माहिती दिलीच आहे.) कांहींच्या मतें हा मूककवि म्हणजेच श्रीमान् आद्य शंकराचार्य होत. पण शंकराचार्य स्वतः रचिलेल्या स्तोत्रांत स्वतःसंबंधीं असें वर्णन करतील हें सभवनीय नाहीं.

हा मूककवि व दुसरा द्रविडशिशु हे दोघे द्रविड देशांतील असून आद्य शंकराचार्य हे केरळ देशांतील आहेत. हे दोन्ही भिन्न प्रांत आहेत. म्हणून सौंदर्यलहरीचे कर्ते आद्य शंकराचार्य असावेत हें पटत नाहीं.

मूककवि आपल्या पचशतीनामक स्तोत्रांत कांचीपुरस्थ कामाक्षीदेवीचें वर्णन करतो. त्यांतील श्लोक १ मध्यें कांचीपुराचा उल्लेख आहे. श्लोक २०२ मध्यें कंपानदीच्या तीरीं तें शहर होतें असेंहि तो म्हणतो. देवीचा नामनिर्देश श्लोक २०१ मध्यें 'कामाक्षी' या नांवानें केला आहे. श्लोक २०४ मध्यें तो म्हणतो—

'कामाक्षीति समस्तसज्जननुता कल्याणदात्री नृणां
कारुण्याकुलमानमा भगवती कम्पातटे जृम्भते॥'

श्लोक २११ मध्यें पुढील वर्णन आहे—

'राकाचन्द्रसमानकान्तिवदना नाकाधिराजस्तुता
मूकानामपि कुर्वती सुरधुनीनीकाशवाग्वैभवम्।
श्रीकाञ्चीनगरीविहाररसिका शोकापहन्त्री सता-
मेका पुण्यपरम्परा पशुपतेराकारिणी राजते॥'

सौंदर्यलहरीचे कर्ते मूकपंचशतीच्या कर्त्याहून भिन्न आहेत हें स्पष्ट आहे. आणि सौंदर्यलहरीचे कर्ते आद्य शंकराचार्य होत हेंहि ह्यावरून स्पष्ट होत नाहीं. वर निर्देशिलेल्या दोन द्रविड कवींच्या उल्लेखांवरून सौंदर्यलहरीचे कर्ते कोणी द्रविडदेशीय असावेत असें वाटतें. आद्य शंकराचार्य हे केरळदेशीय होते हें वर आलेंच आहे. सारांश सौंदर्यलहरीचे कर्ते हे आद्य शंकराचार्यांहून भिन्न असावेत असें वाटतें.

सौंदर्यलहरीच्या अनेक टीकाकारांनी आपल्या टीकेंत 'श्रीमद् भगवत्पादपूज्य' असा शंकराचार्यासंबंधीं आदरार्थी शब्दप्रयोग केलेला आहे. त्यावरून श्रीमद् आद्य शंकराचार्य हेच सौंदर्यलहरीचे कर्ते आहेत असें त्यांना अभिप्रेत असावें. कांहीं टीकाकार 'परमहंस परिव्राजकाचार्य' हें विशेषण शंकराचार्यांना लावतात, तर कांहीं टीकाकार 'श्रीमद् गोविन्दभगवत्पादपूज्य' हें विशेषण लावतात. यांत श्रीमद् आद्य शंकराचार्यांच्या गुरूंचा उल्लेख आहे. कांहीं टीकाकार शंकराचार्यांच्या परमगुरूंचा म्हणजे 'गौडपादाचार्यांचा' उल्लेख शंकराचार्य यांच्या नांवाशीं करतात. दुसरे कांहीं टीकाकार 'द्रविडविषयमण्डन' हें विशेषण आद्य शंकराचार्यांना लावतात. ह्या सर्व टीकाकारांच्या मतानें श्रीमद् आद्य शंकराचार्यच सौंदर्यलहरीचे कर्ते आहेत असा निष्कर्ष निघतो. परंतु कित्येक टीकाकार मात्र केवळ 'शंकराचार्य' असाच उल्लेख करतात. पूज्यतादर्शक किंवा गुरुपरंपरेचा निर्देश करणारा उल्लेख करीत नाहींत. कांहीं टीकाकार फक्त सौंदर्यलहरी किंवा आनंदलहरी अशाच नांवाचा उल्लेख करतात. ग्रंथकर्त्याच्या नांवाचा उल्लेख करीत नाहींत. अरिजित् नामक टीकाकार आपल्या प्रवरसेननामक पित्याचा ग्रंथकर्ता म्हणून उल्लेख करतो हें पूर्वी आपण पाहिलेंच आहे. या सर्व कारणांमुळें सौंदर्यलहरी हें स्तोत्र श्रीमद् आद्य शंकराचार्यांचेंच आहे असें निर्विवादपणें व निश्चयपूर्वक म्हणतां येत नाहीं. नाहींतर टीकाकारांत ग्रंथकर्त्याविषयीं विभिन्न मतें आढळून आलीं नसतीं.

श्रीमद् आद्य शंकराचार्य यांचे परमगुरु गौडपादाचार्य होत असा शंकराचार्यांच्या पांचहि मठांतील मठाम्नायांतील गुरुपरंपरानामावलींत उल्लेख आहे. पण ह्या गौडपादाचार्यांचा काल व त्यांचें परमगुरुत्व यांविषयीं अलीकडील संशोधकांच्या संशोधनामुळें संशय उत्पन्न झाला आहे. 'गौडपाद' या नांवाचे एकाहून अधिक आचार्य झाल्याचें संशोधनान्तीं

दिसून आले आहे. कारण गौडपादाचार्यांच्या नावें पुढील ग्रंथांचा नामोल्लेख प्रसिद्ध आहे—

(१) माण्डूक्योपनिषदावरील (अध्याय ४) कारिका.
(२) ईश्वरकृष्णप्रणीत साख्यसूत्रावरील भाष्य.
(३) शक्तिउपासनेवरील कांहीं ग्रंथ—
 (अ) सुभगोदय नांवाचे देवीस्तुतिपर काव्य.
 (ब) सप्तशतीवरील टीका.
 (क) श्रीविद्यारत्नसूत्राणि.

हे सर्व ग्रंथ आद्य शंकराचार्यांचे परमगुरु गौडपादाचार्य यांच्या नावें जरी प्रसिद्ध आहेत तरी तें सर्व त्यांचेच आहेत याविषयीं संशय आहे.

*विधुशेखर भट्टाचार्य यांनीं गौडपादाचार्यांच्या माण्डूक्योपनिषदावरील* कारिका प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांनीं या ग्रंथास लिहिलेल्या इंग्रजी प्रस्तावनेंत पुराव्यानिशीं सिद्ध केले आहे कीं, यांतील कित्येक कारिका त्यांच्यापूर्वीच्या बौद्ध ग्रंथांतून उद्धृत केल्या आहेत, तर कित्येक कारिका त्यांच्या पूर्वीच्या बौद्ध ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथात प्रमाणभूत म्हणून आधारासाठीं उद्धृत केल्या आहेत ह्या प्रमाणावरून गौडपादाचार्य हे इ. स. ५०० च्या सुमारास झाले असावेत असे भट्टाचार्य मानतात. आद्य शंकराचार्यांचा सामान्यतः काल नवव्या शतकाच्या प्रारंभीचा (इ स. ७८८ ते ८२०) *मानतात आणि गौडपादाचार्यांचा काल पांचव्या शतकांतील आहे* म्हणजे आद्य शंकराचार्य व त्यांचे परमगुरु गौडपादाचार्य याच्यात तीनशें वर्षांचें प्रदीर्घ अंतर पडतें तेव्हां हें सभवनीय आहे काय? यावरून उपनिषत्कारिकाकार गौडपादाचार्य हे आद्य शकराचार्य याचे परमगुरु नसावेत या मताला दुसरें पोषक कारण असें कीं, आद्य शकराचार्य हे अद्वैतमतानुयायी होते, तर उपनिषत्कारिकाकार गौडपादाचार्य हे बौद्धमतानुयायी दिसतात. म्हणूनहि हे गौडपादाचार्य आद्य शंकराचार्यांचे परमगुरु नसावेत.

ईश्वरकृष्णप्रणीत सांख्यकारिकावरील एक भाष्य गौडपादाचार्यांनीं लिहिलें आहे हा ग्रथ प्रसिद्ध झालेला आहे सांख्यमतानुयायी गौडपादाचार्य हे अद्वैतमतानुयायी शंकराचार्यांचे परमगुरु सभवत नाहींत सुभगोदयस्तोत्र, श्रीविद्यासूत्राणि व सप्तशतीवरील टीका इत्यादि ग्रथ गौडपादाचार्यांचें नांवानें

असून हे गौडपादाचार्य शाक्तसंप्रदायाचे आहेत. आद्य शंकराचार्य हे ब्रह्मसूत्रभाष्यकार असून अद्वैतमतानुयायी आहेत. तेव्हां शाक्तसंप्रदायाचे गौडपादाचार्य हे अद्वैतमताच्या शंकराचार्यांचे परमगुरु असणें संभवनीय नाहीं. यावरून असें अनुमान निघतें कीं, गौडपादाचार्य व शंकराचार्य हे गुरुशिष्यपरंपरासंबंधाचे नसावेत.

येथपर्यंतचें विवेचन गौडपादाचार्यासंबंधीं झालें. विधुशेखर भट्टाचार्यांच्या मतें इ. स. पांचव्या शतकांतील काल हा उपनिषत्कारिकाकर्त्याचा होय. सांख्यकारिकाभाष्यकर्ते व सुभगोदयादिस्तोत्रकर्ते हे दोन गौडपादाचार्य भिन्न आहेत. स्तोत्रकर्त्यांच्या कालाविषयीं अनिश्चिति आहे. ह्या दोहोंपैकी सांख्यकारिकाभाष्यकार यांच्या कालाचा ऊहापोह येथें अप्रस्तुत असल्यानें त्यासंबंधीं येथें विवेचन केलें नाहीं. सांख्यकारिकाचे कर्ते ईश्वरकृष्ण यांचा काल इ. स. तिसरें किंवा चौथें शतक मानतात. म्हणून त्यावर भाष्य करणारे गौडपादाचार्य हे अर्थात् त्यानंतरच्या कालांत होऊन गेले असले पाहिजेत. त्यांच्या कालनिर्णयासंबंधीचें विवेचन मी येथें केलें नाहीं. सुभगोदय इत्यादि देवीस्तुतिपर व देवीउपासनापर ग्रंथ लिहिणारे हे तिसरे गौडपादाचार्य होत. ह्यांचें सुभगोदय हें स्तोत्रकाव्य, सौंदर्यलहरीसारखेंच पण लहान म्हणजे ५२ श्लोकांचें आहे. या स्तोत्रांत प्रथम शिवशक्तींचें ऐक्य दाखवून पुढें त्रिपुरसुंदरीचें मंत्र व तिच्याशीं श्रीचक्राचें ऐक्य दाखविलें आहे. हे ऐक्य दाखवितांना कुंडलिनीचें वर्णन करून तिची भगवतीशीं एकरूपता दाखविली आहे. हें सर्व करतांना ग्रंथकर्त्यानें समयमार्गाची स्तुति केली आहे व शेवटीं कौलमार्गाचें माहात्म्य वर्णन करून स्तोत्रसमाप्ति केली आहे. सुभगोदयकर्ते गौडपादाचार्यांच्या वेळीं कौलमार्ग पुष्कळच प्रचलित होता हें यावरून दिसतें. कौलमार्गाची मान्यता बऱ्याच कालावधीनंतर झाली आहे आणि तो अवैदिक असल्याचें सौंदर्यलहरीचे एक टीकाकार लक्ष्मीधर यानें आपल्या टीकेंत नमूद केलें आहे. यावरून कौलमार्गाच्या स्तुतिस्तोत्राचे उद्गाते गौडपादाचार्य हे लक्ष्मीधर टीकेनंतर झाले असले पाहिजेत. लक्ष्मीधराचा काल इ. स. पंधराव्या किंवा सोळाव्या शतकांतील असावा असें पुढें सांगितलेंच आहे. ह्यावरून सुभगोदयकर्ते गौडपादाचार्य हे इ. स. सोळाव्या शतकापूर्वीचे असावेत. सौंदर्यलहरीमध्यें कुल शब्द आलेला आहे, तरी त्यांत कुलमार्गाचें वर्णन नाहीं. म्हणून कुलमार्गस्तुतिकर्ते गौडपाद हे सौंदर्यलहरीकर्ते आचार्यांच्या परंपरेतील

नसावेत. सप्तशतीवर टीका लिहिणारे गौडपादाचार्य हे चौथे गौडपादाचार्य असून ते ह्याहून प्राचीन असावेत. कारण चंडीपाठ तथा सप्तशती हें रूपत्रयात्मक भगवतीचें माहात्म्य बरेंच प्राचीन आहे. प्राचीन लेखसंशोधक देवदत्त भांडारकर यांनीं सिद्ध केलें आहे कीं, राजपुतान्यांतील इ. स. सहाव्या शतकांतील एका शिलालेखांत सप्तशतीतील दोन श्लोक उद्धृत केले आहेत. यावरून सप्तशतीचें प्राचीनत्व सिद्ध होतें. पण तेवढ्यावरून सप्तशतीवर टीका करणारांचें प्राचीनत्व कांहीं सिद्ध होत नाहीं. तरीपण हे टीकाकार उपरोक्त तीन गौडपादाचार्यांहून अधिक प्राचीन असण्याचा संभव आहे, एवढेंच मला येथें दर्शवावयाचें आहे.

श्रीविद्यासूत्रांचे कर्ते हे पांचवे गौडपादाचार्य होत. यांच्याबद्दलचें विवेचन पूर्वी आलेंच आहे.

सौंदर्यलहरीकर्ते शंकराचार्य हे आद्य शंकराचार्य नाहींत याविषयीं थोडें विवेचन वर आलेंच आहे. त्यासंबंधीं अधिक तपशीलवार कारणें पुढें देत आहे—

सौंदर्यलहरीवरील सर्वांत प्राचीन टीकाकार लक्ष्मीधर आहे असें सर्वजण मानतात. इतर ज्या उपलब्ध टीका आहेत, त्या लक्ष्मीधरानंतरच्या आहेत. कांहीं टीका तर अगदींच अर्वाचीन म्हणजे दोनशें वर्षांपूर्वी झालेल्या आहेत. आद्य शंकराचार्यांचा काल सर्वसामान्यपणें नवव्या शतकारंभीचा आहे व लक्ष्मीधराचा काल पंधराव्या-सोळाव्या शतकांतील आहे. म्हणजे आद्य शंकराचार्य व लक्ष्मीधर यांच्या कालामध्यें पांचशें-सहाशें वर्षांचें अंतर आहे. सौंदर्यलहरीचे कर्ते आद्य शंकराचार्य मानल्यास त्यांचें हें स्तोत्र प्रथम सटीक करणारा लक्ष्मीधर पांचशें-सहाशें वर्षांनंतर झाला असल्यामुळें सौंदर्यलहरी हें स्तोत्र सहाशें वर्षे टीकेशिवाय राहिलें असें अनुमान काढावें लागतें. पण हें स्तोत्र इतकें लोकप्रिय होतें कीं, त्याच्या हस्तलिखित प्रती सर्व प्रांतांत विखुरलेल्या आढळतात. तेव्हां इतकी लोकप्रियता मिळविलेलें हें स्तोत्र सहाशें वर्षे टीकेशिवाय राहणें असंभवनीय वाटतें. म्हणून हें स्तोत्र आद्य शंकराचार्यांचें नसावें असें मानावें लागतें.

लक्ष्मीधराचा काल सामान्यतः पंधरावें-सोळावें शतक मानतात. कै. डॉ. पी. के. गोडे (भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिट्यूट) यांनीं

लक्ष्मीधराचा काल सोळाव्या शतकांतील पूर्वार्ध मानला आहे. याप्रमाणें पाहतां आद्य शंकराचार्य व लक्ष्मीधर यांच्यामध्यें पांचशें–सहाशें वर्षे अंतर राहतेंच.

बऱ्याच विद्वानांनीं मान्य केलेला आद्य शंकराचार्यांचा काल म्हणजे इ. स. च्या नवव्या शतकाचा प्रारंभ (इ. स. ७८८ ते ८२० ) हा आहे. न्यायमूर्ति तेलंग व लोकमान्य टिळक यांना हें मान्य नाहीं. तेलंगांच्या मतें सहावें शतक व टिळकांच्या मतें सातवें शतक आहे. हा काळ किंवा सामान्यतः मान्य असलेला काल आद्य शंकराचार्यांचा घेतला तरीसुद्धां त्या दोहोंमध्यें बऱ्याच शतकांचें अंतर पडतें हें उघड आहे.

सौंदर्यलहरींतील 'समानीतः पद्भ्यां मणिमुकुर...' हा श्लोक मल्याळ आणि दाक्षिणात्य देशांतील प्रतींत उद्धृत केला नाहीं असें ॲव्हॅलॉनकृत आनंदलहरीच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. ('नायं श्लोकः शंकराचार्याणां साम्प्रदायिकः, मलयालदेशीयानां पुस्तकेषु यतो नास्ति, नापि दाक्षिणात्य पुस्तकेषु') यावरून टीकाकारास हें दर्शवावयाचें आहे कीं, सौंदर्यलहरीकर्ते हे केरळदेशीय नसावेत म्हणजे आद्य शंकराचार्य नसावेत.

लक्ष्मीधरानें आपल्या टीकेंत एके ठिकाणीं 'विस्तरस्तु सुभगोदये शारीरके ज्ञातव्यः।' असें म्हटलें आहे. यावरून असें दिसतें कीं, लक्ष्मीधराच्या मतें सुभगोदयावर शंकराचार्यांनीं एक टीका लिहिली असावी. म्हणजे येथें लक्ष्मीधर आद्य शंकराचार्यांना सुभगोदयटीकाकार मानतो, तर दुसरा एक लेखक सुभगोदयाचें कर्तृत्वच आद्य शंकराचार्यांना देतो. त्रिपुरोपनिषद्भाष्य लिहिणारा रामानंद नांवाचा कोणी एक लेखक आहे (ॲव्हॅलॉन, प्रस्तावना पृ. ७). त्यानें भाष्याच्या प्रारंभीं पुढील श्लोक दिला आहे—

'श्रीशंकराचार्यकृतान् प्रबन्धान्
सौभाग्यविद्यासुभगोदयादीन्।
पुनः पुनः साधु विचिन्त्य बुद्ध्या
तदध्वना भाष्यमिदं करोमि॥'

यावरून असें अनुमान निघतें कीं, रामानंदानें सुभगोदयाचें कर्तृत्व आद्य शंकराचार्यांना दिलें आहे. पण लक्ष्मीधराच्या मतें सुभगोदयावरील टीका आद्य शंकराचार्यांनीं लिहिली आहे.

श्रीविद्यार्णवाचा प्रथम श्वास ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे. श्रीविद्योपासकांच्या गुरुपंक्ति सांगतांना ग्रंथकारानें आपली गुरुपरंपरा दिली आहे. तिच्यांत कपिलाचार्य प्रथम असून शंकराचार्य एकाहत्तरावे आहेत. आपण समजत आलों आहोंत कीं, गौडपादाचार्य हे शंकराचार्यांचे परमगुरु व गोविंद हे गुरु. पण श्रीविद्यार्णवग्रंथकारानें गौडपादानंतर पांच आचार्यांचीं नांवें देऊन सहावे शंकराचार्य सांगितले आहेत. यावरून गौडपादाचार्य आद्य शंकराचार्यांचे परमगुरु नसावे असें अनुमान निघतें.

इतका सर्व ऊहापोह गौडपादाचार्यांसंबंधीं असल्यामुळें तो प्रस्तुत प्रकरणीं कित्येकांना अयोग्य वाटेल. पण गौडपादाचार्यांच्या नांवाशीं आद्य शंकराचार्यांचा संबंध जोडला जातो म्हणून आद्य शंकराचार्यांच्या कालनिर्णयाबाबतींत गौडपादाचार्यांचा काल विचारांत घेणें आवश्यक आहे.

प्रो. ब्राऊन यानें यापुढें दुसऱ्या एका मुद्द्याचें दिग्दर्शन केलें आहे व *तोहि मुद्दा प्रस्तुत स्तोत्रकर्त्याच्या कालनिर्णयास अत्यंत उपयुक्त आहे.* तो म्हणतो कीं, प्रस्तुत स्तोत्रांत अशा दोन गोष्टींचा उल्लेख आहे कीं, त्या दोन गोष्टींमुळें सौंदर्यलहरीचें कर्तृत्व आद्य शंकराचार्यांना देतां येत नाहीं. त्या दोन गोष्टी अशा आहेत—

'तवाधारे मूले' (श्लोक ४१) श्लोकांत शिवास 'नवरसमहाताण्डवनट' म्हटलें आहे. तसेंच कवीनां संदर्भस्तबक' (श्लोक ५१) या श्लोकांत भगवतीच्या कटाक्षवर्णनाच्या संबंधांत 'नवरसास्वादतरलौ' असें वर्णन आलें आहे. ह्या दोन्हीं ठिकाणीं नऊ रस सांगितले आहेत. पण संशोधकांनीं शोधल्याप्रमाणें प्राचीन काळीं रस आठच होते. ते शृंगार, वीर, करुण, हास्य, अद्भुत, भयानक, रौद्र व बीभत्स हे होत. पण पुढें कालान्तरानें शांतरस त्यांत मिळवून नऊ रस झाले. मद्रास विद्यापीठाचे संशोधक डॉ. व्ही. राघवन् यांच्या मतें इ. स. नवव्या शतकापर्यंत रसांची संख्या आठच होती. नवव्या *शतकानंतर शांतरसाची भर पडून ती नऊ झाली. प्रस्तुत श्लोकांत* नऊ रसांचे संदर्भ असल्यानें सौंदर्यलहरीचे कर्ते नवव्या शतकानंतरचे असावेत असें अनुमान निघतें.

'असौ नासावंश...' । ( श्लोक ६२ ) या श्लोकांत नासिकालंकाराचें वर्णन आहे. डॉ. गोडे यांच्या संशोधनानें असें सिद्ध झालें आहे कीं, नासिकालंकरणाची पद्धति इ. स. च्या दहाव्या शतकानंतर आली आहे. यावरून सौंदर्यलहरीचें कर्ते दहाव्या शतकानंतरचे असावेत, असें अनुमान निघतें.

प्रो. ब्राऊनच्या आधारभूत ह्या दोन गोष्टींशिवाय इतर दोन गोष्टी मला आढळल्या त्या अशा—

'गले रेखास्तिस्रो गतिगमकगीतैकनिपुणे' ( श्लोक ७० ) या श्लोकांत गति, गमक, गीत व ग्राम हे संगीतशास्त्रांतील चार पारिभाषिक शब्द आहेत. संगीतशास्त्रज्ञांच्या मतें हे शब्द दहाव्या शतकानंतरचे आहेत. प्राचीन काळीं ही परिभाषा नव्हती. श्लोकांतील हे पारिभाषिक शब्द सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहोंचलेले दिसतात. सामान्य जनतेंत पारिभाषिक शब्दादि गोष्टींचा प्रसार होण्यास कांहीं कालावधि आवश्यक असतो. यावरून प्रस्तुत स्तोत्र दहाव्या शतकाच्या कांही कालावधीनंतर झालें असावें.

'विशाला कल्याणी स्फुटरुचिरयोध्या कुवलयैः।' ( श्लोक ५० ) या श्लोकांत भगवतीच्या दृष्टीला 'कृपाधाराधारा'' असें विशेषण दिलें आहे. यांत श्लेषार्थानें राजपुतानामधील धारानगरीचा उल्लेख आहे. ही धारानगरी मुंज व भोजराज यांच्यामुळें प्रसिद्धीस पावली. मुंज व भोज या राजांचा काल दहावें–अकरावें शतक आहे. म्हणजे धारानगरीचा उल्लेख असलेलें हें स्तोत्र दहाव्या–अकराव्या शतकानंतरचें असलें पाहिजे. म्हणून प्रस्तुत स्तोत्राचे कर्ते आद्य शंकराचार्य नसले पाहिजेत.

सौंदर्यलहरीस्तोत्र हें शक्तिउपासनापर आहे. आद्य शंकराचार्यप्रणीत ब्रह्मसूत्रभाष्य व उपनिषद्भाष्य यांत शक्तिउपासनेचा मुळींच उल्लेख नाहीं. तसेंच सौंदर्यलहरींतील जगदुत्पत्तीचें वर्णन व तत्त्वज्ञान हें उपनिषद्भाष्यांतील जगदुत्पत्तीच्या वर्णनाहून व तत्त्वज्ञानाहून भिन्न आहे. शाक्ततत्त्वज्ञानांच्या विवेचनांत हे आलेंच आहे.

'मनस्त्वं व्योम त्वं मरुदसि मरुत्सारथिरसि ।' ( श्लोक ३६ ) या श्लोकांत पंचमहाभूतें व मन हें भगवतीचें परिणामरूप आहे, म्हणजेच जगताचें मूलकारण शक्ति आहे असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें— .

'श्रुतीनां मूर्धानो दधति तव यौ शेखरतया' ( श्लोक ८५ ) या श्लोकांत भगवतीच्या चरणांपाशीं श्रुतीला स्थान दिलें आहे, म्हणजे श्रुतीला भगवतीच्या

मानानें गौणत्व दिलें आहे. पण आद्य शंकराचार्य हे कट्टर श्रुतिप्रामाण्यवादी होते. उपनिषदादिभाष्यांत त्यांनीं पचमहाभूतें हीं ब्रह्मापासून उत्पन्न झालीं आहेत असें प्रतिपादन केलें आहे. तैत्तिरीयसंहितेंत हीं पंचमहाभूतें इंद्राचीं रूपें आहेत असें सांगितलें आहे. यावरून स्तोत्रांतील वर्णन हें उपनिषदादिभाष्यवर्णनाहून व तत्त्वज्ञानाहून भिन्न असल्यामुळें प्रस्तुत स्तोत्र हें श्रुतिप्रामाण्यवादी आद्य शकराचार्यांचें नसावें.

सौंदर्यलहरींत मूर्तिपूजा, यंत्र, मत्र ह्यांविषयींची संपूर्ण माहिती दिली आहे. पण ह्यांचा उल्लेख शकराचार्यांच्या कोणत्याहि ग्रथांत आढळत नाहीं. तसेंच शक्तिउपासनेचें फळ म्हणजे उपासक देवीच्या चरणसान्निध्यांत सदैव राहतो असें सौंदर्यलहरींत प्रतिपादिलें आहे. पण आद्य शंकराचार्यांच्या मतें *उपनिषदांतील तत्त्वज्ञान आत्मसात् करणारा–अहं ब्रह्मास्मि ही वृत्ति अनुभवणारा सायुज्यमुक्तिप्रत जातो व तदाकार होऊन तो अभेदरूपानें राहतो* म्हणजे सौंदर्यलहरींत वर्णन केलेला भक्त द्वैतांत असतो तर आद्य शकराचार्यांच्या मताप्रमाणें ब्रह्मानुभवसाक्षात्कारी अद्वैत अनुभवतो तसेंच सौंदर्यलहरीप्रमाणें जगताचें मूलकारण शिवशक्ति आहे, तर उपनिषदांप्रमाणें 'ब्रह्माद्यस्य यतः' ह्या सूत्रानुसार ब्रह्म हे जगताचें आदिकारण आहे. हा दोहोंतील तत्त्वज्ञानात भेद आहे. म्हणून श्रुतिप्रामाण्यवादी आद्य शकराचार्यांनीं हें स्तोत्र केलें नसावें असें अनुमान निघतें.

कै. डॉ. गोडेप्रभृति विद्वानांच्या सशोधनावरून व माझ्या उपरोक्त मुद्द्यांच्या विवेचनावरून असें अनुमान निघतें कीं, सौंदर्यलहरी हें स्तोत्र अकराव्या शतकानतर झालें असावें नक्की कोणत्या काळात झालें असावें हें जरी खात्रीपूर्वक सागतां येत नसलें तरी चौदाव्या पधराव्या शतकांत *झालेल्या लक्ष्मीधरटीकेच्या आधीं शें-दोनशें वर्षें ह्या स्तोत्राची निर्मिति झाली असली पाहिजे. यावरून हें स्तोत्र आद्य शकराचार्यांचे नसावें हें स्पष्ट होतें.* पण ज्याअर्थीं सौंदर्यलहरींत मूककवि व द्रविडशिशूचा उल्लेख आहे त्याअर्थीं द्रविड देशांतील काचीपीठावरील अकराव्या शतकानतरच्या कोणीतरी शकराचार्यांनीं हें स्तोत्र केलें असावें असें अनुमान निघतें.

### सौंदर्यलहरी—विषयविवेचन

सौंदर्यलहरी हें स्तोत्र शभर श्लोकाचें असून त्याचे दोन भाग दिसून येतात. पहिला भाग १ ते ४२ श्लोकाचा असून देवीच्या उपासनेचा आहे.

  

दुसरा भाग ४२ ते १०० श्लोकांचा असून देवीच्या रूपरंगादि वर्णनाचा आहे. पहिल्या भागास कांहीं टीकाकार 'आनंदलहरी' व दुसऱ्या भागास 'सौंदर्यलहरी' अशीं नांवें देतात, तर इतर कांहीं टीकाकार सर्व श्लोकांना–दोन्हीं भागांस मिळून 'सौंदर्यलहरी' असें म्हणतात. पहिल्या भागास 'आनंदलहरी' व दुसऱ्या भागास 'सौंदर्यलहरी' ह्या संज्ञा अधिक योग्य आहेत. पहिल्या उपासनापर भागात 'आनंद' हा शब्द पुष्कळ वेळां आला आहे. उदाहरणार्थ, स्थितः संबन्धो वां समरसपरानन्दपरयोः। (श्लोक ३५). त्वमेव स्वात्मानं परिणमयितुं विश्ववपुषा। चिदानन्दाकारं शिवयुवति भावेन बिभृषे ॥ (श्लोक ३६). भजन्ति त्वां धन्याः कतिचन चिदानन्दलहरीम्। (श्लोक ८). ह्या उपरोक्त श्लोकांत भगवतीस आनन्दरूपिणी, चिदानन्दाकार व आनन्दलहरी असें म्हटलें आहे. म्हणून या प्रथम भागास 'आनंदलहरी' हें नांव युक्त आहे.

द्वितीयार्धास प्रारंभ श्लोक ४२ पासून होतो आणि लगेच श्लोक ४५ मध्यें—

'तनोतु क्षेमं नस्तव वदनसौन्दर्यलहरी–
परीवाहस्रोतःसरणिरिव सीमन्तसरणिः॥'

सौंदर्यलहरी हा शब्द आल्यामुळें व ह्या भागांत देवीचें केवळ सौन्दर्यवर्णन असल्यामुळें या विभागास 'सौन्दर्यलहरी' हें नांव योग्य आहे. प्रथम भागांत 'उपासना' व द्वितीय भागांत 'सौन्दर्यवर्णन' आहे. ह्या-संबंधीच्या आख्यायिका त्या त्या श्लोकावरील टीकेंत उद्धृत केल्याच आहेत.

ह्या स्तोत्राचा प्रारंभ 'शिवः शक्त्या युक्तो' इत्यादीनें झाला आहे व स्तोत्रांतील वर्ण्य देवतेस शक्ति हें नांव दिलें आहे. ती आद्यशक्ति व विश्वोत्पत्तिकर्ती आहे. स्तोत्रांतील अनेक भिन्न नांवांनीं तिचा उल्लेख आला आहे. त्यांतील कांहीं नावें अशीं आहेत—

(१) देवी— श्लोक २८, ७३, ८१, ८९
(२) शक्ति— " १,४१
(३) अरुणा— " १६, ३४
(४) अपर्णा— " ५६

(५) पार्वती—श्लोक ८२
(६) चण्डी— " ९०
(७) उमा— " ४८, ७२
(८) भवानी— " २२
(९) सती— " २६, ९८
(१०) पराचित्- " ३७
(११) समया— " ४०, ४२
(१२) अम्बा— " ७५
(१३) मातृ— " ६६, ८५, ९१
(१४) जननी— " १७, २९, ३३, ४०, ५२, ६५, ७७, ७८
(१५) हिमगिरिनन्दिनी इत्यादि पितृनामनिदर्शक, शिवाशीं ऐक्यदर्शक व पत्नीवाचक नावेंसुद्धां अनेक आहेत.

ह्या सर्व उल्लेखांवरून एक अनुमान काढतां येतें कीं, आपल्या धर्मांतील सर्व स्त्रीदेवता ही भगवतीची भिन्न भिन्न रूपें आहेत. ब्रह्मा, विष्णु व रुद्र ह्या देवतांच्या पत्नींचीं नांवेंहि आलेलीं आहेत. त्या देवता भगवतीचीं रूपें आहेत असें जरी वर्णन नसलें तरी भगवती ही विश्वोत्पत्ति करणारी असल्यामुळें पर्यायानें तीं तिचींच रूपें आहेत असें मानणें युक्त आहे.

प्रस्तुत स्तोत्राच्या आरंभीच्या व इतरहि अनेक श्लोकांवरून दिसून येतें कीं, शिव जर शक्तीनें युक्त असेल तरच तो समर्थ होतो. म्हणजे शिवापेक्षा शक्तीस येथें प्राधान्य दिलें आहे. पण काश्मिरी शैवसंप्रदायांत शिवास प्राधान्य दिलें आहे. कांहीं टीकाग्रंथांत दोघांनाहि सारखेंच प्राधान्य दिलें असल्याचें दिसून येतें. शिव व शक्ति यांच्या कोणत्या रूपांचीं वर्णनें सौंदर्यलहरींत आहेत हीं खालीं स्पष्ट केलीं आहेत.

| श्लोक | शिव | शक्ति |
|---|---|---|
| १ | हर | — |
| २ | हर | — |
| ५ | पुररिपु | — |
| ६ | — | हिमगिरिसुता |

| | | |
|---|---|---|
| ७ | — | पुरमथितुराहोपुरुषिका |
| ८ | शिवाकार मञ्च | परमशिवपर्यङ्कनिलया |
| ९ | — | सहस्रारपद्मा |
| १० | — | कुलकुण्डे स्वपन्ती |
| ११ | श्रीचक्रवर्णनपर | श्रीचक्रवर्णनपरा |
| १२ | — | तुहिनगिरिकन्या |
| | | गिरिशसायुज्यपदवी |
| १६ | — | विरिञ्चिप्रेयसी |
| १७ | — | वाग्देवी |
| १९ | हकारार्ध | हरमहिषी |
| २२ | — | भवानी |
| २३ | — | शंभुशरीरार्ध |
| २४ | रुद्र | — |
| २५ | त्रिगुणजनित ( ब्रह्मादिदेवत्रय ) | — |
| २६ | शिवताण्डव ( संहार काले ) | — |
| २९ | शिवविषपानवर्णन | — |
| ३० | शिवदर्शने देवतागमन | — |
| ३२ | पशुपति | — |
| ३५ | — | हरार्ध |
| ३६ | — | शिवयुवती |
| ४३ | — | हिमगिरिसुता |
| ४६ | स्मरदहन | — |
| ४७ | शिवजटास्थित चन्द्रकोर | — |
| ४८ | — | उमा |
| ५२ | शिव, गिरिश, हर | — |
| ५३ | पुरां भेत्ता | हिमकन्यका |
| ५४ | रुद्र | ईशानदयिता |

| | | |
|---|---|---|
| ५५ | — | पशुपतिपराधीना |
| ५६ | — | अपर्णा |
| ५७ | — | धरणिधरराजन्यतनया |
| ५९ | — | अगराजन्यतनया |
| ६० | प्रमथपति | — |
| ६१ | — | शर्वाणी |
| ६२ | — | तुहिनगिरिवंशध्वजपटी |
| ६६ | त्रिपुरहर | — |
| ६७ | पशुपति | — |
| ६८ | शंभु | तुहिनगिरितनया |
| ६९ | पुरदमयिता | — |
| ७० | शिवपार्वतीविवाहनिर्देश | — |
| ७१ | अन्धकरिपु | — |
| ७२ | — | उमा |
| ७३ | — | स्कंदगणपतिमाता |
| ७४ | — | नगपतिपताका |
| | | स्कन्दगणपतिमाता |
| ७५ | पुरविजयी | गणपतिमाता |
| ७६ | — | तुहिनगिरिकन्या |
| ७७ | हर | — |
| ७९ | गिरिश | गिरिसुता |
| ८० | — | शैलतनया |
| ८३ | — | गिरिसुता |
| ८४ | रुद्र | गिरिसुता |
| ८५ | पशुपति | — |
| ८६ | पशुपति | — |
| ८७ | देवीभर्ता | — |

| | | |
|---|---|---|
| ८९ | पुरभिद् | शिवपार्वतीविवाह |
| ९० | — | चण्डी |
| ९३ | — | दीनकरुणा |
| ९५ | — | मुरारातेरन्तःपुर |
| ९६ | रुद्र ( पर्यङ्कासनांतील ) | — |
| ९८ | — | महादेवसती |
| ९९ | — | परब्रह्ममहिषी |
| | — | ( ब्रह्मा-विष्णु पत्नीशीं भिन्नत्व ) |
| | — | हरसहचरी, अद्रितनया |
| | — | यांशीं भिन्नत्वानें वर्णन. |
| १०० | पशुपति | — |

' शिवः शक्त्या युक्तो ' यांतील शिव हा परमशिव असून शिव-सगुण संहारकर्ता याहून भिन्न आहे. तसेंच शक्ति ही आद्यशक्ति असून देवी शिव-पत्नीहून भिन्न आहे वेदांमध्यें किंवा उपनिषदांत सांगितलेल्या सगुण ब्रह्मा-सारखेंच सौंदर्यलहरींतील शिवशक्तीचें स्वरूप आहे या शिवशक्तिस्वरूपा-विषयीं अनेकविध उल्लेख आहेत. त्यांतील कांहीं वचनें खालीं उद्धृत केलीं आहेत.

' न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः।
न तत्त्वतस्तयोर्भेदश्चन्द्रचन्द्रिकयोरिव ॥ '

या श्लोकांत शिवशक्तीचें सगुण ब्रह्मासारखें वर्णन केलें आहे जसें सगुण ब्रह्म मानलें तरी तत्पूर्वी निर्गुण ब्रह्म आहे असें मानावें लागतें, तसेंच शिवशक्ती ह्या एकरूप मानूनहि तत्पूर्वी निर्गुण ब्रह्मप्रमाणें शिवाचीहि कल्पना केली आहे. पुढील श्लोक पाहा–

' नित्यः सर्वगतः सूक्ष्मः सदानन्दो निरामयः ।
विकाररहितः साक्षी शिवो ज्ञेयः सनातनः ॥
निष्क्रियं निर्गुणं शान्तमानन्दमजयमव्ययम् ।
अजरामरमव्यक्तमज्ञेयमचलं ध्रुवम् ॥

ज्ञानात्मकं परं ब्रह्म स्वसंवेद्यं हृदि स्थितम् ।
सत्यं बुद्धेः परं नित्यं निर्मलं निष्कलं स्मृतम् ॥'

निर्गुण ब्रह्माचें सगुण ब्रह्म जसें झालें, तसेंच आदिकारण शिवाचेंच शिवशक्तिस्वरूप झालें आहे. ह्याच्या पुष्टयर्थ पुढील श्लोक पाहावेत–

'शक्तिदावृत्वमीशस्यारहितस्य तयानिशम् ।
शिवस्य शक्तता सर्वाभीष्टदावृत्वमेव च ॥
सर्वमेतत्प्रपञ्चेन सूतसंहितयोच्यते ।
.......................................
शंभोः सामर्थ्यसंपत्तिं जगदे शक्तिकल्पिताम् ।
.......................................
अनुप्रविष्टा या सापि निर्विकल्पा स्वयंप्रभा ।
सदाकारा सदानन्दा संसारच्छेदकारिणी ॥
सा शिवा परमा देवी शिवाभिन्ना शिवंकरी ।
जगत्कारणतापन्नः शिवोऽयं मुनिसत्तमाः ॥
सा तस्यापि भवेच्छक्तिस्तया हीनो निरर्थकः ।
सर्वज्ञत्वं गतो यस्तु शिवः साक्षादुपाधिना ॥
ईशितृत्वं तथा यस्तु शिवः साक्षादुपाधिना ।
सा तस्यापि भवेच्छक्तिस्तया हीनो निरर्थकः ॥
.......................................
तच्छक्तिभूतः सर्वेशो भिन्नो ब्रह्मादिमूर्तिभिः ।
कर्ता भोक्ता च संहर्ता सकलः स जगन्मयः ॥'

(नारायणीयप्रयोगसार)

अशा प्रकारच्या निर्गुण किंवा आदिशिवापासून आदिशक्ति अवतीर्ण झाली. खालीं उद्धृत केलेले उतारे या विधानास पुष्टि देतात—

'तस्माद्विनिर्गता नित्या सर्वगा विश्वसंभवा ।'

(प्रयोगसार)

'शिवेच्छया परा शक्तिः शिवतत्त्वैकतां गता ।
ततः परिस्फुरत्यादौ सर्गे तैलं तिलादिव ॥'

(वायुसंहिता)

'एवमालोक्य सर्गादौ सच्चिदानन्दरूपिणीम् ।
समस्ततत्त्वसंघातमस्फूर्त्यधिष्ठानरूपिणीम् ॥
व्यक्तां करोति नित्यां तां प्रकृतिं परमः पुमान् । '

( पञ्चरात्र )

'शिवोन्मुखी यदा शक्तिः पुंरूपा सा तदा स्मृता ।
सैव सर्गक्षमा तेन........................ .......॥'

(प्रयोगसार)

'अभिव्यक्ता पराशक्तिरविनाभावलक्षणा ।
अखण्डपरचिच्छक्तिर्व्याप्ता चिद्रूपिणी विभुः ॥
समस्ततत्त्वभावेन विवर्तेच्छासमन्विता ।
प्रयाति बिन्दुभावाच्च क्रियाप्राधान्यलक्षणम् ॥ '

जगदुत्पत्तिस्थितिविनाशास कारणीभूत असलेल्या ब्रह्मा विष्णु-रुद्रांना कोणी निर्मिलें हें प्रस्तुत स्तोत्रांत सांगितलें नाहीं. हे तीनहि देव, देवी भगवतीचें आराधन करतात व तिच्या चरणकमलाच्या रजःकणापासून ब्रह्मानें सृष्टि निर्मिली हे 'तनीयांसं पांसुं इ.' ( श्लोक २ ) या श्लोकांत सांगितले आहे. ब्रह्मा–विष्णु–शिवांच्या उत्पत्तीविषयीं अरुणामोदिनीटीकेंत पुढील श्लोक आधारभूत म्हणून उद्धृत केले आहेत —

'यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिको रुद्रो महर्षिः।
हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो देवः शुभया स्मृत्या संयुनक्तु ॥'
'स एष भगवानीशः सर्वतत्त्वादिरव्ययः ।
सर्वतत्त्वविधानज्ञः प्रधानपुरुषेश्वरः ॥'
'सोऽसृजद्दक्षिणात्पार्श्वाद्‍ ब्रह्माणं लोकसंभवम् ।
वामपार्श्वात्तथा विष्णुं लोकरक्षार्थमीश्वरः ॥
युगान्ते चैव संप्राप्ते रुद्रं प्रभुरवासृजत् । '
'अहं ब्रह्मा कपिलोऽप्यनन्तः
पुत्राः सर्वे ब्रह्मणश्चात्र वीराः ।
त्वत्तः सर्वे देवदेव प्रसूता
एवं देशः कारणात्मा त्वमीड्यः ॥'

---

॥ श्री गुं गुरुभ्यो नमः ॥

। सौन्दर्यलहरीप्रारम्भः ।

शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं
न चेदेवं देवो न खलु कुशलः स्पन्दितुमपि ।
अतस्त्वामाराध्यां हरिहरविरिञ्च्यादिभिरपि
प्रणन्तुं स्तोतुं वा कथमकृतपुण्यः प्रभवति ॥ १ ॥

श्रीशिव जर शक्तीनें युक्त म्हणजे सहित असेल तर तो प्रभाव ( सामर्थ्य ) व्याखविण्यास समर्थ होतो आणि असें जर नसेल ( तो शक्तियुक्त नसेल ) तर तो खरोखर हालचाल करण्याससुद्धां असमर्थ होतो. म्हणून हे शक्तिस्वरूपिणि देवि ! विष्णु, शंकर, ब्रह्मदेव इत्यादिकांकडूनहि पूज्य असलेल्या तुला नमस्कार करण्यास किंवा तुझें स्तवन करण्यास पुण्य पदरीं नसलेला माणूस कसा बरें समर्थ होईल ?

टीपा — सौंदर्यलहरी हें स्तोत्र श्रीमद् जगद्गुरु आद्य श्रीशंकराचार्य-प्रणीत आहे. शंकराचार्य हे आद्य अद्वैतवेदान्तमतप्रवर्तक होत. या स्तुति-स्तोत्राचे शंभर श्लोक असल्यानें यास शतश्लोकीहि म्हणण्यास हरकत नाहीं. ह्यांची दुसरीहि एक शतश्लोकी प्रसिद्ध आहे ह्या व अशाच इतर श्लोकांची व स्तोत्रांची निर्मिति श्रीमद् आद्य शंकराचार्यांची आहे असा कित्येकांचा समज आहे. ह्याविषयींचा ऊहापोह प्रस्तावनेंत आलाच आहे.

हें स्तोत्र शिखरिणीवृत्तामध्यें आहे. हें वृत्त प्रेम, भक्ति, वात्सल्य, कारुण्य वगैरेंच्या रसपरिपोषार्थ उपयोगांत आणतात असा कविसंकेत आहे. ह्या वृत्तांतील पदांच्या श्रवणानें मन हेलावून जातें ह्या वृत्तांत ' य ' गण आरंभीं आहे व या स्तोत्रांतील पहिल्या श्लोकांत ' शिव ' हा शब्द आहे. हे दोन्हीहि मंगलवाचक आहेत. ' य ' गण मंगलवाचक असल्याबद्दल सौंदर्यलहरीचे कामेश्वरसूरि या टीकाकाराच्या अरुणामोदिनी टीकेंत पुढील श्लोक उद्धृत केला आहे :

' प्रकृत्या यगणो नित्य श्रीकरः कथ्यते बुधैः ।
करोत्यर्थानादिलघुर्यगणो वारिदैवतः ॥ '

'शिवेति मङ्गल नाम' ह्या व अशाच अनेक सूक्तींत शिव हा शब्द मंगलवाचक आहे, असें उद्धृत केलें आहे. शिव आणि शक्ति हे उभय शब्दहि मांगल्यप्रद आहेत. पाहा—

'यः शिवो नामरूपाभ्यां या देवी सर्वमङ्गला।
तयोः संस्मरणात्पुंसां सर्वतो जयमङ्गलम्॥'

शिव या शब्दांत 'शि' आणि 'व' अशीं दोन अक्षरें आहेत, आणि तींहि मंगलवाचकच आहेत. पाहा—

'विद्यासु श्रुतिरुत्कृष्टा रुद्रैकादशिनी श्रुतौ।
तत्र पञ्चाक्षरी तस्यां शिव इत्यक्षरद्वयम्॥'

पुनः 'शिव' ह्या दोन अक्षरांत 'शि' ह्या शब्दानें लक्ष्मी आणि 'व' ह्या अक्षरानें अमृतत्व हे अर्थ सिद्ध होतात म्हणजे 'शिव' ह्या शब्दानें साधकास ऐहिक ऐश्वर्य व अमरत्व प्राप्त होते हे श्लोकाच्या आरंभीं श्रीमत् शंकराचार्यांनीं 'शिव' हा शब्द उपयोजून सूचित केलें आहे. ह्या शिवशक्तीनें सर्व विश्व निर्माण केले आहे. श्रुतीमध्येंहि ही शिवशक्ति म्हणजे रुद्र हाच विश्वनिर्माता होय असें वचन आहे.

'यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिको रुद्रो महर्षिः।
हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो देवः शुभया स्मृत्या सयुनक्तु॥'

हा रुद्र म्हणजेच शिव होय त्यांतच शक्तिहि अंतर्भूत आहे. कारण *'सोऽकामयत, बहु स्यां प्रजायेयेति'* इ *श्रुतिप्रमाण आहे श्रुतिवचनात* रुद्र किंवा ब्रह्म हें विश्वाचें आदिकारण म्हटलें आहे त्याचाच विस्तार आगमग्रंथादिकांत तन्त्रकारांनीं करून ब्रह्म किंवा रुद्रासच शिवशक्ति कल्पिली आहे. उपनिषदादिकांत जें निर्गुण ब्रह्म आहे तेंच स्वेच्छेनें सगुण झालें जगन्निर्मितीचें आदिकारण असलेल्या सगुण ब्रह्मास शिवशक्ति असें म्हणण्यास हरकत नाहीं यास आधारभूत श्रुतिप्रमाणें पुढीलप्रमाणें आहेत—

'अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि इ '

*या शिवशक्तिरूप सगुण ब्रह्मानें स्वतःच्या इच्छेनें संपूर्ण जगत् निर्माण* करून व त्यांत तेज, जल आणि पृथ्वी इ. उत्पन्न करून स्वतःच त्यांत प्रविष्ट होऊन 'सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा' असें रूप धारण केलें. यास आगमग्रंथांत पुढील आधार आहे—

'सृष्टिस्थितिविनाशानां हेतुभूते सनातनि।
गुणाश्रये गुणमये नारायणि नमोऽस्तु ते॥'
(मार्कंडेयपुराण, सप्तशती)

जगन्निर्मितीस जरी शक्ति ही कारणीभूत आहे तरी तिचा शिवाशीं अभेदच आहे. ह्या दोघांत भिन्नत्व मुळींच नाहीं. पाहा—

'शक्तिशक्तिमतोर्भेदं वदन्त्यपरमार्थतः।
अभेदमनुपश्यन्ति योगिनस्तत्त्वचिन्तकाः॥' (कूर्मपुराण)
'सा शिवा परमा देवी शिवाभिन्ना शिवकरी।
जगत्कारणतापन्नः शिवोऽयं मुनिसत्तमाः॥
सा तस्यापि भवेच्छक्तिस्तया हीनो निरर्थकः।'
'एषा सा साक्षिणी शक्तिः शंकरस्यापि शंकरी।
शिवाभिन्नस्तया हीनः शिवः साक्षान्निरर्थकः॥' (सूतसंहिता)
'परोऽपि शक्तिरहितः शक्तः कर्तुं न किंचन।
शक्तः स्यात्परमेशानि शक्त्या युक्तो भवेयदि॥' (चतुःशती)

आतां श्रीमद् आचार्यांनीं जें श्लोकारंभीं सांगितलें आहे कीं, शिव शक्तियुक्त असेल तेव्हांच जगाच्या उत्पत्तीस समर्थ असतो, याच्या उलट जर पाहिलें तर शक्तिवेरीज शिव बिलकूल हालचाल करण्यासहि असमर्थ असतो हा अभिप्राय श्रुतीशीं सुसंगतच आहे. ब्रह्मापासून जगत् निर्माण झालें तें ब्रह्म सगुणब्रह्म होय व सगुण म्हणजेच शक्तियुक्त होय असेंच आचार्यांनीं ब्रह्मसूत्रभाष्यांतील 'जन्माद्यस्य यतः' या सूत्रावरील व्याख्यानांत प्रतिपादिलें आहे

तैत्तिरीयोपनिषदांतील ब्रह्मानन्दवल्ली या अध्यायांत 'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नात्पुरुषः।' इ. श्रुतिवचनांत 'तस्मात्' म्हणजे त्या ब्रह्मापासूनच संपूर्ण जगत् निर्माण झालें असें म्हटलें आहे आणि तें ब्रह्म म्हणजेच सगुणब्रह्म होय, म्हणजेच शक्तियुक्त होय. ह्या व अशाच अनेक श्रुत्युक्त वचनावरून शिवशक्तिसमन्वयरूप सगुणब्रह्मच जगदुत्पत्तीस कार्यक्षम होतें असें सिद्ध होतें.

सोऽकामयत । बहु स्यां प्रजायेयेति । इदं सर्वमसृजत् । तदनुप्रविश्य । सच्चासच्चाभवत् । ह्या वचनांवरून सगुणब्रह्माची म्हणजे शिवशक्तीची कार्यत्रयी दिसून येते.

( १ ) त्यानें इच्छा केली कीं, आपण एक आहोंत तें पुष्कळ व्हावें,

( २ ) नंतर त्यानें तप करून सर्व विविध जग निर्माण केलें,

( ३ ) ह्या जगतांत जीवरूपानें तो परमात्मा ( म्हणजे सगुणब्रह्म म्हणजेच शिवशक्ति ) प्रवेश करता झाला.

जडसृष्टि व चैतन्यमय सृष्टिहि त्या ब्रह्मानेंच निर्माण केली आहे. अन्न, प्राण, मन, विज्ञान व आनन्दमय सृष्टि हीं त्यानेंच निर्माण केलीं व तें तूं जाण व तेंच ब्रह्म होय अशा आशयाची

‘ यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ।
आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन ॥ ’

तद्व विजिज्ञासस्व तद्ब्रह्मेति ’ ही तैत्तिरीयश्रुति प्रसिद्ध आहे शाक्ततत्त्व-ज्ञानांत हीच प्रक्रिया अन्यप्रकारें विशद केलेली आहे. ती अशी—

मूळ तत्त्व–निर्गुण ब्रह्म–परमशिव अनिर्वचनीय आहे. निर्गुणाचा सगुण परमात्मा झाला म्हणजे शिव हा शक्तियुक्त झाला

शाक्ततत्त्वज्ञानांत आद्यशक्तीची इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति हें शक्तित्रय आहे. ‘सोऽकामयत’ ही इच्छाशक्ति, ‘एकोऽहं बहु स्यां प्रजायेय’ ही ज्ञानशक्ति व ‘इदं सर्वमसृजत्’ ही क्रियाशक्ति त्या सगुण ब्रह्मास म्हणजे शिवशक्तींत अनुस्यूत आहे ही सर्व माहिती येथें सक्षेपानेंच सांगितली आहे. कारण सविस्तर विवेचन प्रस्तावनेंत शाक्तसंप्रदायाचा इतिहास सांगतांना केलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास वेदान्त्यांनीं पुरस्कृत केलेला मायावाद किंवा विवर्तवाद ह्या शाक्ततत्त्वज्ञानांत नाहीं. कामेश्वरसूरींनी ‘ अरुणामोदिनी ’ नामक सौन्दर्यलहरीवरील टीकेंत उद्धृत केलेलें ‘ इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते ’ हें श्रुतिवचन मायावादाच्या समर्थनार्थ असलें तरी माया म्हणजे अविद्या नव्हे असें मी प्रस्तावनेंत विवेचिलें आहे.

मायेनें ब्रह्म शबलित झालें आहे, असें वेदान्ती म्हणतात पण ‘ सोऽकामयत । बहु स्यां प्रजायेयेति । इदं सर्वमसृजत् । तदनुप्रविश्य ।

अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि।' इ० वचनांवरून ब्रह्मानें स्वतः जगताची निर्मिति केली व त्यांत जीवरूपानें स्वतः प्रविष्ट झालें असें स्वच्छ म्हटलें आहे. पृथ्वी इ. आदिभूत व प्राण इ. अध्यात्म असें पंचविध सर्व विश्व ब्रह्माचेंच स्वरूप आहे. हें ब्रह्म म्हणजेच सगुण ब्रह्म व तें शिवशक्तिरूप होय. अशा प्रकारें शाक्ततत्त्वज्ञान हें वैदिकतत्त्वज्ञानाशीं समन्वययुक्त आहे.

कामेश्वरसूरींनीं वरील श्लोकावर व्याख्यान करतांना एकूण चौदा प्रकारें अर्थविवरण केलें आहे. त्यांपैकीं वेदान्ताभिमत पहिला अर्थ दिला असून त्याचेंच विवरण मी प्रथम केलें आहे. फरक काय तो त्या वादापुरतांच आहे.

दुसरा अर्थ सांख्याभिमत आहे. त्यांनीं पुढील सांख्यकारिका त्याच्या समर्थनार्थ उद्धृत केली आहे–

'मूलप्रकृतिरविकृतिर्महदाद्याः प्रकतिविकृतयः सप्त।
षोडशकश्च विकारो न प्रकृतिर्न विकृतिः पुरुषः॥'

प्रकृति म्हणजे शक्ति व पुरुष हा शिव असा त्यांच्या म्हणण्याचा मथितार्थ होय. पण तें बरोबर नाहीं. सांख्यमताप्रमाणें पुरुष व प्रकृति हीं दोन्ही भिन्न आहेत आणि जगत् हें प्रकृतीचा विकार असून पुरुष हा प्रकृतिहि नाहीं व विकृतिहि नाहीं असें सांख्य समजतात. 'संसरति बध्यते मुच्यते च नानाश्रया प्रकृतिः' म्हणजे ससारांतील बंधमोक्ष हा सर्व प्रकृतीचाच खेळ आहे आणि पुरुषास ज्ञान झाल्यावर प्रकृति निवृत्त होते. 'पुरुषस्य तथात्मानं प्रकाश्य विनिवर्तते प्रकृतिः' ह्या वचनांत हेंच सांगितलें आहे. शाक्ततत्त्वज्ञानास हें अभिमत नाहीं.

'न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः।
उमाशंकरयोरैक्यं यः पश्यति स पश्यति॥'

तसेंच 'उमासहाय परमेश्वरं विभुम्' ह्या वचनांवरून शिवशक्तींचा अभेद स्पष्ट होतो. जेव्हां साधकास आत्मज्ञान होतें तेव्हां शिवशक्तिसमन्वयात्मक ऐक्यच तो पाहतो.

'तस्मात्सह तया शक्त्या हृदि पश्यन्ति ये शिवम्।
तेषां शाश्वतिकी सिद्धिर्नेतरेषामिति श्रुतिः॥'

असें पुराणोक्त वचन कामेश्वरसूरींनीं टीकेत उद्धृत केलें आहे. तसेंच चतुःशती ह्या शंकरस्तोत्रांतील पुढील वचनहि त्यानें उद्धृत केलें आहे—

'परोऽपि शक्तिरहितः शक्तः कर्तुं न किंचन।
शक्तः स्यात्परमेशानि शक्त्या युक्तो भवेद्यदि॥'

सारांश शिवशक्तींचें ऐक्य असून जगताच्या सृष्टिस्थितिविनाशास शिवशक्तीच हेतुभूत आहेत. सप्तशतींतहि अशाच अर्थाचा एक मंत्र आहे—

'सृष्टिस्थितिविनाशानां हेतुभूते सनातनि।
गुणाश्रये गुणमये नारायणि नमोऽस्तु ते॥'

शिव शक्तिरहित असतां ज्याप्रमाणें तो कोणतीहि हालचाल करण्यास समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें सांख्यांचा पुरुष, प्रकृतिविना कोणतेंहि कार्य करण्यास असमर्थ असतो एवढेच काय तें दोन मतांतील साम्य आहे.

यापुढें कामेश्वरसूरि तिसरा अर्थ देतात. त्यास त्यांनीं 'प्रकृतदेवतापक्षीयार्थ' असें म्हटलें आहे. त्याचें स्पष्टीकरणार्थ 'हरिहरविरिञ्च्यादिभिः विष्णुयामलरुद्रयामलब्रह्मयामलानि । आदिशब्देन भैरवयामलादिकमुच्यते। तैराराध्याम् । विष्णुयामलादिसर्वागमप्रतिपाद्यामित्यर्थः' असें उद्धृत केलें आहे. म्हणजे त्यांचा आशय असा कीं, 'आराध्यां हरिहरविरिञ्च्यादिभिरपि' हे शब्द प्रथमच्या दोन चरणांत वर्णिलेलें शिवशक्तिऐक्यच दाखवितात. तें ऐक्य कसें हें स्पष्ट करतांना कामेश्वरसूरि म्हणतात कीं, विष्णुशिवब्रह्मप्रभृतीनीं ग्रंथ रचून शिवशक्तींचें ऐक्यच वर्णिलें आहे. विष्णूनें रचलेल्या ग्रंथाचें नांव विष्णुयामल, शिवप्रणीत ग्रंथाचें नांव रुद्रयामल असून ब्रह्मप्रणीत ग्रंथाचें नांव ब्रह्मयामल होय. आदिशब्दानें भैरवादिदेवताप्रणीत ग्रंथांचीं नांवें भैरवयामलादि होत. हा देवतापर तिसराअर्थ होय.

चवथा अर्थ 'शब्दपर' आहे, असें कामेश्वरसूरि म्हणतात. त्याच्या पुष्टयर्थ चवथ्या चरणाचा आधार घेऊन हरिहरविरिंचि इत्यादि देवता फार पुण्यवान असल्यामुळें देवींचें म्हणजे शिवशक्तींचें स्तवन करतात. ह्या श्लोकांतील 'त्वां' ह्या शब्दाचा अर्थ शक्तिवाचक शिव असा होय. म्हणजे वाच्य शक्ति व वाचक शिव होय. आणि वाच्यवाचकांचा अभेद म्हणजे शिवशक्तींचें ऐक्य होय. हा चवथा अर्थ.

पांचव्या अर्थास कामेश्वरसूरि 'अर्थपर' अर्थ म्हणतात. 'शब्दार्थरूपिणी भवती' म्हणजे भवती शब्दार्थरूप आहे. त्यांत शब्द म्हणजे शिव व अर्थ म्हणजे शक्ति. वैयाकरणांचें मतें 'शब्दार्थयोर्नित्यः संबन्धः' म्हणजे शब्द व अर्थ यांचा संबंध अखंड म्हणजे कधींहि भंग न पावणारा असा असतो.

सहावा अर्थ 'शब्दोत्पत्तिनिरूपणपर' आहे, असें कामेश्वरसूरींचें म्हणणें आहे. त्यांच्या मतें ह्याचें स्पष्टीकरण खालीलप्रमाणें आहे. भगवती ही हरिहरविरिञ्चि इत्यादिकांची आराध्य देवता आहे. म्हणजे ती त्यांच्याकडून वंदिली जाणारी, वर्ण्यविषय असलेली म्हणजे उच्चार्यमाण आहे. त्यास श्रुतिवचन असें—

'चत्वारि वाक्परिमितापदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥'

ह्याचाच आशय प्रथम श्लोकाच्या चवथ्या चरणांत निर्दिष्ट केला आहे.

सातवा अर्थ 'यन्त्रपर' आहे. त्रिपुरसुन्दरीच्या यंत्राला श्रीयंत्र म्हणतात. श्रीयंत्राचा उल्लेख सौन्दर्यलहरींत अकराव्या श्लोकांत आहे. त्या यंत्रास अनुकूल असा अर्थ कामेश्वरसूरींच्या प्रस्तुत श्लोकावरील टीकेंत आहे. श्लोक अकरामध्यें आचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें श्रीचक्रांत चार शिवचक्रें व पांच शक्तिचक्रें आहेत. यास आगमतंत्रांतील पुढील श्लोकाचा आधार आहे.

'चतुर्भिः शिवरूपैश्च शक्तिरूपैश्च पञ्चभिः।
नवचक्रैश्च ससिद्धं श्रीचक्रं शिवयोर्वपुः॥'

या श्लोकांतील श्रीचक्राचें स्वरूपवर्णन अपूर्व वाटतें. याचें संपूर्ण स्वरूप पुढील श्लोकांत दिसतें—

'बिन्दुत्रिकोणवसुकोणदशारयुग्म—
मन्वश्रनागदलसंयुतषोडशारम्।
वृत्तत्रयं च धरणीसदनत्रयं च
श्रीचक्रमेतदुदितं परदेवतायाः॥'

या तंत्रवचनावरून शिवात्मक चार चक्रें शक्त्यात्मक पांच चक्रांशीं जेव्हां युक्त होतात तेव्हांच तें श्रीचक्र प्रभावशाली होऊन पूर्ण होतें. एकट्या शिवाचीं चक्रें फलदायी होत नाहींत. यंत्रांत शिवशक्ति या उभयतांच्या चक्रांची आवश्यकता आहे. आणि अशा यंत्रांच्याच उपासनेनें इष्ट देवतेची कृपा प्राप्त होऊन सफल कामना सिद्ध होतात. पाहा—

'उभयस्यास्य देवस्य विग्रहे यन्त्रकल्पना ।
विना यन्त्रेण चेत्पूजा देवता न प्रसीदति ॥'

आठवा अर्थ 'प्रणवपर' आहे प्रणव म्हणजे ॐकार हा ॐकार सर्व मन्त्राचा आद्यप्रवर्तक किंवा आदिभूत आहे पाहा—

'ॐकारो गुणबीज प्रणवस्तारो ध्रुवश्च वेदादिः ।
अस्य तु वेदादित्वात्सर्वमनूना प्रयुज्यते चादौ ॥'

ॐकार हा शब्द शक्तिरूप आहे, असं पुढील सूतसंहितेंतील वचन आहे पाहा—

'उमार्धविग्रहो देवो रुद्र सत्यादिलक्षण ।
ससारतारकस्यास्य प्रणवस्यार्थ उच्यते ॥' ( सूतसंहिता )

टीकाकाराचा हा अर्थ अपुरा वाटत असून अयथार्थहि दिसतो ॐकार हा शिवशक्तिरूप आहे हें सत्य आहे त्याचें स्पष्टीकरण प्रस्तावनेंत आलेच आहे

अ, उ, म् आणि वर बिंदु ह्यानीं ॐकार घडलेला आहे या तीन वर्णांचे सर्वव्यापित्व टीकाकारानें विस्तारानं सांगितलें आहे तें येणें प्रमाणें—

ब्रह्मा, विष्णु, महेश ह्या अनुक्रमें देवता आहेत अग्नि, वायु व सूर्य ह्या भूमि, अतरिक्ष व द्यौ यातील देवता होत गायत्री, त्रिष्टुप् व जगती हें छंद आहेत रक्त, शुक्र व कृष्ण हे वर्ण आहेत जाग्रत, स्वप्न व सुषुप्ति या या अवस्था भूमि, अतरीक्ष व स्वर्ग हीं स्थानें उदात्त, अनुदात्त व स्वरित हे स्वर ऋक्, यजुस व साम हे वेद गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय हे अग्नि प्रात, मध्याह्न व सायाह्न हे काल सत्त्व, रजस् व तमस् हे गुण सृष्टि, स्थिति व लय हें कर्म ह्या सर्वांत ॐकारमधील तीन वर्ण स्थित आहेत अशा प्रकारें ॐकाररूप शिवशक्ति सर्वव्यापी आहे हा प्रणवपर अर्थ झाला

नववा अर्थ 'मातृकापर' आहे त्यास प्रमाण असें—

'मातृका परमा देवी मन्त्रमाता महेश्वरी ।'

महेश्वरी म्हणजे शक्ति ही मातृकारूपानें मन्त्रमाता होते शिव व्यंजनरूप व शक्ति स्वररूप आहेत, हे आपणास तन्त्रशास्त्रावरून दिसून येतें पाहा—

'ककारादिक्षकारान्ता वर्णास्ते शिवरूपिणः।
समस्तव्यस्तरूपेण षट्त्रिंशत्तत्त्वविग्रहाः'
'अकारादिविसर्गान्ताः स्वराः षोडश शक्तयः।
नित्याषोडशिकात्मानः परस्परममी युताः॥'

फक्त व्यंजनानें वर्णोच्चार होत नाहीं. त्यास स्वराची आवश्यकता असते. त्याचप्रमाणें शक्तिविरहित शिव अकार्यक्षम आहे, पण तो शक्तीनें युक्त असेल तेव्हाच प्रभावी होतो. 'शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुम्' ह्याचा हा नववा अभिनव अर्थ झाला.

दहावा व अकरावा अर्थ 'त्रिपुरसुंदरीमंत्रपर' आहे टीकाकारानें दहावा अर्थ कादिविद्यापर व अकरावा अर्थ हादिविद्यापर आहे असें म्हटलें आहे. ह्या विद्या गुरुमुखगम्य असणें योग्य म्हणून त्यांचा येथें परिस्फोट करणें युक्त नव्हे.

बारावा अर्थ हा शिवाचा 'पंचाक्षरीमन्त्रपर' आहे 'नमः शिवाय' हा तो प्रसिद्ध पंचाक्षरीमंत्र होय.

तेरावा अर्थ 'गुरुपर' आहे 'गुरुविद्यादेवतानामैक्यं सभावयेद्धिया' या वचनानुसार गुरु, विद्या व देवता यांचे ऐक्य जाणावें असें आहे शिव व गुरु यांतील अभेद पुढील प्रमाणावरून दिसतो—

'भक्ताज्ञानतमोभानु मूर्ध्नि पङ्कजसस्थितम्।
सदाशिवमय नित्य श्रीगुरु प्रणमाम्यहम्॥
अनन्तमपरिच्छिन्नं तत्त्वं येन प्रकाशितम्।
सच्चिदानन्दमपरं श्रीगुरु शिवमाश्रये॥'

चवदावा अर्थ भगवती देवी चन्द्रकलारूप आहे असें सांगतो. शिव हा दर्शरूप आहे. दर्श नांवाची एक चांद्री कला आहे. ही दर्शाख्या चांद्री कला दिसत नाहीं. दुसऱ्या दिवशीं ती दिसते तेव्हां तिला दृष्टा कला म्हणतात. ही कला शक्तिरूप आहे. दर्शरूपकला जेव्हा दृष्टाख्य कलेशीं युक्त होते तेव्हां तो दृश्यमान होतो, त्याप्रमाणें शिव जेव्हां शक्तियुक्त होतो तेव्हांच तो उपासनायोग्य होतो. हा 'चंद्रकलारूप' चवदावा अर्थ झाला.

तनीयांसं पांसुं तव चरणपङ्केरुहभवं
विरिञ्चिः संचिन्वन्विरचयति लोकानविकलम् ।
वहत्येनं शौरिः कथमपि सहस्रेण शिरसां
हरः संक्षुद्यैनं भजति भसितोद्धूलनविधिम् ॥ २ ॥

( हे देवि ), ब्रह्मा, तुझ्या चरणकमलापासून उत्पन्न झालेला अत्यंत सूक्ष्म रजःकण घेऊन त्याची रचना करून प्रलयकालापर्यंत टिकणाऱ्या चतुर्दश भुवनांचें उत्पादन करतो. *विष्णु त्याला कसेंतरी आपल्या हजार* शिरांवर धारण करतो आणि शिव ( *प्रलयकाळीं* ) त्याचें चूर्ण करून आपलें भस्मोद्धलनाचें कार्य करतो.

टीपा—अशाच आशयाचा एक श्लोक ( २४ वा ) पुढें आलेला आहे. चतुर्दश भुवनें येणेंप्रमाणें– सप्त पाताल व सप्त ऊर्ध्वलोक. भूः, भुवः, सुवः, महः, जनः, तपः व सत्य हें सात ऊर्ध्वलोक आणि अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल व पाताल हे सात अधोलोक. *'लोक' याचा दुसरा अर्थ असा होऊं शकतो कीं, जीवसृष्टि व सांख्यमताप्रमाणें प्रकृत्यादि अचेतन सृष्टि.*

' शौरि ' शब्दाचा अर्थ लक्ष्मीधर या टीकाकारानें विष्णु असा दिला आहे. अमरकोशांत ' देवकीनन्दनः शौरिः ' असें स्पष्ट सांगितलें आहे. लक्ष्मीधरानें ' शौरि ' शब्दाचा दुसरा अर्थ शूराचें अपत्य बलभद्र असा केला आहे; व बलभद्र म्हणजे शेषाचा अवतार असें पुराणान्तरीं मानलें आहे. म्हणून पर्यायानें ' शौरि ' म्हणजे सहस्रशीर्षी सर्पराज असें स्पष्ट होतें. या सर्पराजाच्या आसनावर भगवान् विष्णु शयन करतात म्हणून त्यांना शेषशायी म्हणतात. म्हणून शौरि म्हणजे विष्णु असा अर्थ लक्षणावृत्तीनें होतो. यास लक्ष्मीधरानें चतुःशतीमधील पुढील श्लोक प्रमाण म्हणून उद्धृत केला आहे—

' शिंशुमारात्मना विष्णुः सप्तलोकानधःस्थितान् ।
दधे शेषतया लोकान् भूरादीनूर्ध्वतः स्थितान् ॥ '

कैवल्याश्रम ह्या टीकाकारानें दुसरा निराळाच अर्थ दिला आहे. योगशास्त्रांतील सुषुम्नानाडीमधील षट्चक्रांतील तीन चक्रांशीं निगडित तो अभिप्रेत आहे. भगवतीची चतुश्चरणात्मक कमलें तीन चक्रांत आहेत.

त्यांपैकी भ्रूमध्यांत असलेल्या द्विदल आज्ञाचक्रांत रक्त व शुक्ल अशा दोन वर्णांचे दोन चरण आहेत. हृदयांत असलेल्या द्वादशदल अनाहतचक्रामध्यें एक चरण मिश्रवर्णाचा आहे; व ब्रह्मरन्ध्रांत सहस्रदल कमलामध्यें निर्वाणरूप चतुर्थ चरण आहे. यांपैकीं आज्ञाचक्रांतील शुक्लवर्णपर चरण सत्त्वगुणप्रधान आहे, तर रक्तवर्णपर चरण रजोगुणप्रधान आहे अनाहतचक्रांतील मिश्रवर्णपर चरण तमोगुणप्रधान आहे आणि सहस्रदलांतील निर्वाणरूप चरण हा *गुणातीत आहे. याला आधारभूत श्रुतिवचन येणें प्रमाणें—*

‘ चरणं पवित्रं विततं पुराणम् । येन पूतस्तरति दुष्कृतानि ।
तेन पवित्रेण शुद्धेन पूताः । अति पाप्मानमरातिं तरेम ।
लोकस्य द्वारमर्चिमत्पवित्रम् । ज्योतिष्मद् भ्राजमानं महस्वत् ।
चरणं नो लोके सुधितां दधातु । ’

इतर कांहीं टीकाकारांनीं अनेक अर्थ केले आहेत. पण ते थोड्याफार फरकानें ओढाताणीचे असल्यामुळें त्यांचा येथें कांहीं परामर्ष करणें इष्ट नाहीं, म्हणून त्यांचे अर्थ उध्दृत केले नाहींत आचार्यांनीं नवव्या श्लोकापासून षट्चक्रांचें माहितीपूर्ण वर्णन दिलें असल्यामुळें त्या त्या श्लोकाच्या विवरणांत त्यांचे अर्थाविष्करण येईल व विशेष स्पष्टीकरण येईलच.

अविद्यानामन्तस्तिमिरमिहिरद्वीपनगरी
जडानां चैतन्यस्तबकमकरन्दस्रुतिझरी ।
दरिद्राणां चिन्तामणिगुणनिका जन्मजलधौ
निमग्नानां दंष्ट्रा मुररिपुवराहस्य भवति ॥ ३ ॥

हे भगवति देवि, तुझ्या चरणकमळाचा रजःकण म्हणजे अडाणी लोकांच्या अंतःकरणांतील अज्ञानरूपी अंधकार नाहींसा करून ज्ञानरूप *प्रकाश पाजळणारी जणू अर्थात समुद्रांतील द्वीपनगरी म्हणजेच ज्ञानरूप* प्रकाश पाडणाऱ्या सूर्याचें उदयस्थान, तसेंच अडाणी म्हणजे अज्ञ लोकांना चैतन्य म्हणजे जाणीव अर्थात् ज्ञानदेणगीरूपी पुष्पगुच्छातील रसरूपीत मधाचा अखंड स्रोत देणारी जणूं झारीच होय, तसेंच दरिद्री लोकांच्या इच्छांची पूर्ति करणाऱ्या चिंतामणिरत्नांची जणूं माळच होय, मुरारिरूप

वराहावतार धारण करणाऱ्या विष्णूनें जशी समुद्रांतून आपल्या दाढेनें पृथ्वी-वर काढली तशी तुझ्या चरणकमलाचा रजःकण जन्ममरणाच्या समुद्रांत बुडून गेलेल्या आम्हां पामरजनांचा उद्धार करणारा आहे.

टीपा—कामेश्वरसूरि म्हणतात कीं, ह्या श्लोकांतील पहिल्या चरणाचा आशय, जगन्निर्मितीचें आदिकारण अविद्या आहे असें म्हणणाऱ्या तत्त्वज्ञांच्या मताचें निराकरण करणारा आहे. दुसऱ्या चरणानें जड प्रकृति मानणाऱ्या सांख्यमताचें निराकरण केलें आहे. तिसरा चरण परमाणुवादी वैशेषिकांच्या मताचें निरसन करणारा आहे; तर चवथा चरण हा अर्थकामामध्यें म्हणजे विषयांमध्यें आसक्त असलेल्यांच्या व जन्ममरणाच्या फेऱ्यांत गुरफटलेल्यांच्या मुक्तीचें साधन असणारा आहे.

कैवल्याश्रम नांवाच्या टीकाकारानें म्हटलें आहे कीं, या श्लोकानें 'कामराजमातृका' नांवाची देवता सूचित केली आहे. कारण श्रीविद्योपासकांना ह्या देवतेची उपासना आवश्यक असते. 'ऐं' हें कामराजबीज आहे. या बीजालाच कामराज म्हणतात. त्याला 'वाग्भवकूट' असेंहि म्हणतात. त्याची उपपत्ति फारच सुंदर आहे. ती उपपत्ति येणेंप्रमाणें आहे. ऋग्वेदाचा मंत्र 'अग्निमीळे' इ. आहे. यजुर्वेदाचा 'इषेत्वा' इ. व सामवेदाचा 'अग्न आयाहि' इ. आहे. तेव्हां सामवेदाचा आरंभ 'अ'+यजुर्वेदाचा आरभ 'इ'+ऋग्वेदाचा आरंभ 'अ' हे वर्ण मिळून संधि केल्यास 'ऐ' हें अक्षर होतें आणि त्यास बिंदु जोडला कीं, 'ऐं' हें बीजाक्षर तयार झालें. कोणत्याहि अक्षरावर बिंदु ठेवल्याशिवाय किंवा पुढें विसर्ग जोडल्याशिवाय बीजाक्षर तयार होत नाहीं. 'ऐं' हें त्रिपुरामंत्राचे प्रथम बीजाक्षर आहे. श्रीत्रिपुरासुंदरीचे अनेक मंत्र आहेत. त्यांतील एका मंत्राचें हें बीज आहे. याविषयीं कादिमतांतील प्रमाण येणेंप्रमाणें—

'अकारादिः सामवेदो ऋग्वेदस्तु तदादिकः ।
यजुर्वेद इकारादिस्तेषां सयोगतः शुचिः ॥
..... ..... . ... . ......   .. ..
गुणसंध्या ऋग्यजुषोस्ततस्तेनापरं तथा ।
वृद्धिसंध्या समायुक्त्यादित्युत्पन्नं शुचेर्वपुः ॥
तेन त्रयीमयी विद्या कार्यकारणयोगतः ।'

शुचि म्हणजे वाग्भवकूट होय हिलाच त्रिपुराविद्या किंवा त्रयीमयी विद्या म्हणतात त्रयी विद्या म्हणजे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद होत ह्या वेदत्रयीचीं आद्याक्षरें एकत्र करून झालेलें बीजाक्षर तेंच 'ऐं' होय त्यालाच वाग्भवकूट किंवा शुचि म्हणतात

प्रस्तुत तिसऱ्या श्लोकातील पूर्वोक्त गोष्टींचा त्रिपुरार्णव नामक ग्रथांतील पुढील श्लोकातून उल्लेख केला आहे या गोष्टी थोडक्यात म्हणजे (१) अज्ञाननिवृत्ति (२) मान्द्यनिवृत्ति (३) इच्छितप्राप्ति व (४) जीवन्मुक्ति ह्या आहेत त्याचा नामोल्लेख असा—

'हरत्यज्ञानमज्ञानाज्जडिमानमत पुन ।
इत कामान् वितनुते कैवल्य कलया विधो ।।
वाग्भव प्रथम बीज वेदाना पुरतो यत ।
त्रिपुरासज्ञया भद्रे त्वद्रूपा विश्वविग्रहा ॥
वाच्यवाचकरूपेण व्याप्नोत्यमितवैभवम् ।'

वाच्यवाचकरूपानें त्रिपुरा देवता ही विश्वव्यापिनी आहे वाच्यवाचकरूप म्हणजे शब्दार्थरूप म्हणजेच वागर्थरूप वाच्य म्हणजे अर्थ व वाचक म्हणजे वर्ण किंवा शब्द वागर्थरूपाच यथार्थ ज्ञान होण्यास म्हणजे 'वागर्थप्रतिपत्तये' असें रघुवशकारानी म्हटल्याप्रमाणें स्वर आणि अक्षर याच्या सयोगानें होणाऱ्या वर्णमालत शिवशक्ति ह्या आद्य द्वद्वाला—दांपत्याला नमन करणें प्राप्त होय ह्या वागर्थाचें विस्तृत आविष्करण प्रस्तावनेमध्ये केल आहे तें पाहावें

त्वदन्यः पाणिभ्यामभयवरदो दैवतगण—
स्त्वमेका नैवासि प्रकटितवराभीत्यभिनया ।
भयात् त्रातु दातु फलमपि च वाञ्छासमधिक
शरण्ये लोकानां तव हि चरणावेव निपुणौ ॥ ४ ॥

सर्व लोकाना शरणार्ह असणारी (हे भगवति), तुझ्याशिवाय इतर सर्व देव आपल्या दोनहि हातानीं अभयदान व वरप्रदान करतात मात्र तूच एकटी अशी आहेस कीं, वर व अभय देण्याचा अभिनय करीत नाहींस लोकाचें भयापासून रक्षण करण्याला व इच्छेपेक्षाहि अधिक फल देण्यास तुझे दोन्हीं चरणच समर्थ आहेत

टीपा—'शरण्य' ह्या शब्दाचा एक अर्थ गृह म्हणजे घर असा आहे. श्रीचक्र हें भगवती त्रिपुरसुंदरीचें घर मानलेलें आहे. म्हणजे शरण्य याचा अर्थ श्रीचक्रनिवासिनी असाहि आहे. 'लोकानाम्–' लोक म्हणजे सामान्य जन आणि लोक म्हणजे चतुर्दश भुवनें असे दोन अर्थ होतात.

भगवती त्रिपुरसुंदरीच्या ध्यानात (श्लोक ७ मध्यें) 'ती चतुर्भुज आहे' असें वर्णन आहे. मात्र प्रस्तुत चवथ्या श्लोकात द्विभुजांचें वर्णन आहे.

वरमुद्रिका व अभयमुद्रिका यांचें वर्णन आपणांस खालील श्लोकांत मिळतें.

'अधोमुखो वामहस्तः प्रधृतो वरमुद्रिका ।
ऊर्ध्वीकृतो दक्षहस्तः प्रवृतोऽभयमुद्रिका ॥'

ब्रह्मादि देवाना अभय देण्याचें व वर देण्याचें जें सामर्थ्य आहे तेंहि त्यांना श्रीत्रिपुरसुंदरीच्या कृपेनेंच प्राप्त झालें आहे हा या श्लोकाचा आशय. पाहा—

'येऽपि ब्रह्मादयो देवा भवन्ति वरदायिनः ।
त्वद्रूपां शक्तिमासाद्य ते भवन्ति वरप्रदाः ॥

**हरिस्त्वामाराध्य प्रणतजनसौभाग्यजननीं**
**पुरा नारी भूत्वा पुररिपुमपि क्षोभमनयत् ।**
**स्मरोऽपि त्वां नत्वा रतिनयनलेह्येन वपुषा**
**मुनीनामप्यन्तः प्रभवति हि मोहाय महताम् ॥ ५ ॥**

नमन करणाऱ्या लोकाना सौभाग्य देणाऱ्या तुझी आराधना करून पूर्वी विष्णूनें स्त्रीरूप धारण करून त्रिपुरहर शकरालाहि प्रक्षुब्ध केलें आपली स्त्री जी रति तिच्या डोळ्यांना आपल्या देहानें आनद देणारा मदनसुद्धा प्रथम तुलाच नमस्कार करून मोठमोठ्या सयमी ऋषिमुनींच्या अत करणानाहि मोह निर्माण करण्यास समर्थ होतो

टीपा—प्रस्तुत श्लोकातील प्रथमार्धात विष्णूनें मोहिनीरूप धारण करून भगवान् शकरालाहि मोहित केल्याच्या भागवतादि पुराणातील कथेचा उल्लेख आहे कैवल्याश्रम हा टीकाकार ह्याच दोन चरणाचा एक गुप्तार्थ देतो पण तो ओढाताणीचा वाटत असल्यानें येथें देण्याची आवश्यकता नाहीं लक्ष्मीधरानें ह्या गुप्तार्थाचा उल्लेख केला असल्यामुळें त्याला तो मान्य

आहे असें दिसतें. त्यांनीं वामकेश्वरमहातंत्रांतील चतुःशतीमधील पुढील दोन श्लोक ह्या श्लोकाशीं समानार्थक म्हणून उद्धृत केले आहेत ते असें—

‘ एतामेव पुराराध्य विद्यां त्रैलोक्यमोहिनीम् ।
त्रैलोक्यं मोहयामास कामारिं भगवान् हरिः ॥
कामदेवोऽपि देवेशीं देवीं त्रिपुरसुन्दरीम् ।
समाराध्याभवल्लोके सर्वसौभाग्यसुन्दरः ॥ ’

**धनुः पौष्पं मौर्वी मधुकरमयी पञ्च विशिखा**
**वसन्तः सामन्तो मलयमरुदायोधनरथः ।**
**तथाप्येकः सर्वं हिमगिरिसुते कामपि कृपा-**
**मपाङ्गात्ते लब्ध्वा जगदिदमनङ्गो विजयते ॥ ६ ॥**

हे हिमपर्वतनंदिनि ! मदन, तो अनंग असूनहि सर्व जगाला भारी होऊन त्यावर केवळ तुझ्या कृपाकटाक्षानें विजय मिळवितो. नाहींतर मदन हा जगताविरुद्ध लढाई करण्यास अगदीं एकटाच आहे. त्याचें धनुष्य पाहावें तर तें फुलांचें आहे. त्याची दोरी तर भुंग्यांचीच बनलेली आहे; व त्याचे पांच बाण असून वसंतऋतु हा त्याचा सचिव आहे. आणि दक्षिणचा मलयपर्वतावरून वाहणारा वायु हा त्याचा रथ आहे.

**टीपा**—मदन हा स्वतः एकटा जगाशीं टक्कर देऊन केवळ तुझ्या कृपाकटाक्षानेंच सर्व जगत् तो अनंग असूनहि जिंकतो. मदनदहनाची कथा कित्येक पुराणांत असून कालिदासानें कुमारसंभवांतहि शंकरानें मदनाला जाळून भस्म केलें, पण पार्वतीच्या कृपेमुळें व तिच्या इच्छेनें तो मदन पुनः सजीव झाला, पण अनंग राहिला असें वर्णिलें आहे.

**क्वणत्काञ्चीदामा करिकलभकुम्भस्तननता**
**परिक्षीणा मध्ये परिणतशरच्चन्द्रवदना ।**
**धनुर्बाणान् पाशं सृणिमपि दधाना करतलैः**
**पुरस्तादास्तां नः पुरमथितुराहोपुरुषिका ॥ ७ ॥**

रुणझुण असा आवाज होणारा सोन्याचा कंबरपट्टा असलेली, हत्तीच्या छाव्याच्या गंडस्थळासारख्या कुम्भाकार स्तनांच्या भारामुळें नत झालेली,

वारीक कंबर असलेली आणि शरदऋतूंतील पौर्णिमेच्या परिपूर्ण चंद्राप्रमाणें निर्मल, तेजस्वी, डौलदार व झोकदार चर्या असलेली, हातांत धनुष्य, बाण, पाश व अंकुश धारण करणारी अशी त्रिपुरासुरांना जाळणाऱ्या शंकरालाहि मोठा अभिमान वाटावा अशी गौरवास्पद देवी भगवती आमच्या पुढें येऊन आम्हांला दर्शन देवो.

टीपा—ही भगवती देवी चतुर्भुज आहे. पैकीं वरच्या डाव्या हातांत पाश व उजव्या हातांत अंकुश असून, खालच्या डाव्या हातांत धनुष्य व उजव्या हातांत बाण आहेत. श्रीललितासहस्रनामांमध्यें पुढील श्लोकांत देवीचें येणेंप्रमाणें वर्णन आहे—

'रागस्वरूपपाशाढ्या क्रोधाकाराङ्कुशोज्ज्वला ।
मनोरूपेक्षुकोदण्डा पञ्चतन्मात्रसायका ॥'

श्रीत्रिपुरसुंदरीच्या वरच्या डाव्या हातांत राग म्हणजे कामरूपी पाश आहे. वरच्या उजव्या हातांत क्रोधरूपी अंकुश आहे. खालच्या डाव्या हातांत इक्षुरूपी धनुष्य आहे व खालच्या उजव्या हातांत पंचतन्मात्ररूपी बाण आहेत. पंचमहाभूतांचे मूलप्रकृतस्वरूप पांच गुणमय बाण आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध हे पांच विषय आहेत. कांहीं टीकाकारांनीं पंच बाणांचे पंचबीजरूपी अर्थ काढलेले आहेत कांहींच्या मतें या श्लोकांतून 'वशिनीबीजाचा' उद्धार आहे. कोणत्याहि देवतेचें ध्यान करण्यासाठीं तिच्या सगुण स्वरूपाचें ज्ञान असणें अत्यावश्यक आहे. याच हेतूनें आचार्यांनीं प्रस्तुत श्लोकांत श्रीत्रिपुरसुंदरीच्या सगुण स्वरूपाचें वर्णन केलें आहे.

सुधासिन्धोर्मध्ये सुरविटपिवाटीपरिवृते
मणिद्वीपे नीपोपवनवति चिन्तामणिगृहे ।
शिवाकारे मञ्चे परमशिवपर्यङ्कनिलयां
भजन्ति त्वां धन्याः कतिचन चिदानन्दलहरीम् ॥ ८ ॥

कांहीं थोडे भाग्यवान लोक चित् आणि आनंद यांच्या लहरीरूप असलेल्या तुझें भजन करतात. अशी तूं परमशिवस्वरूप पलंगावर आरूढ झाली आहेस. तो पलंग शिवाकार आहे व तो चिंतामणिमय घरांत आहे. तें

चिंतामणिमय घर नीपवृक्षांच्या बगीच्यांत ( उपवनांत ) आहे व तें उपवन मणिद्वीपांत आहे. तें मणिद्वीप कल्पवृक्षांच्या समूहांनीं वेष्टित असून अमृतसिंधूमध्यें आहे.

टीपा—या श्लोकार्थांत श्रीचक्र सूचित केलें आहे. ( श्लोक ११ पाहा ). श्रीचक्रांत अधोमुख चार त्रिकोण आहेत, त्यांस या श्लोकांत 'शिवाकार मंच' म्हटलें आहे. तसेंच त्यांत ऊर्ध्वमुख पांच त्रिकोण शक्तिरूप आहेत. ह्या अधोमुख शिवमंचाचें चार खुर म्हणजे ब्रह्मा, विष्णु, रुद्र व ईश्वर होत. त्यांवरील पर्यंक सदाशिवरूप असतो. त्या पर्यंकावर भगवती श्रीत्रिपुरसुंदरी विराजमान झाली आहे. ह्यासंबंधीं विशेष विशदीकरण पुढील कांहीं श्लोकांच्या विवरणांत येईल.

महीं मूलाधारे कमपि मणिपूरे हुतवहं
स्थितं स्वाधिष्ठाने हृदि मरुतमाकाशमुपरि ।
मनोऽपि भ्रूमध्ये सकलमपि भित्वा कुलपथं
सहस्रारे पद्मे सह रहसि पत्या विहरसे ॥ ९ ॥

हे देवि ! तूं मूलधारामध्यें पृथ्वीला, मणिपूरांत जलाला, स्वाधिष्ठानामध्यें असलेल्या अग्नीला, हृदयांत वायूला, त्याच्यावर असलेल्या आकाशाला आणि भ्रूमध्यें असलेल्या मनाला—याप्रमाणें सर्वांनीं झालेल्या कुलमार्गाचें भेदन करून सहस्रदल कमलामध्यें आपल्या पतीशीं गुप्त रीतीनें रममाण होतेस.

टीपा :—श्लोक ७ मध्य श्रीत्रिपुरसुंदरीच्या बाह्य स्वरूपाचें वर्णन आहे, तर श्लोक ८ मध्यें सर्वव्यापी भगवती मणिद्वीपनिवासिनी आहे असें वर्णन आहे. म्हणजे भगवतीच्या बाह्यरूपाचीं दोन वर्णनें आहेत. प्रस्तुतच्या श्लोकामध्यें अंतर्यामीच्या सहस्रदल कमलामध्यें असलेल्या कुंडलिनीशक्तिरूपाचें वर्णन आहे. म्हणजे उपर्युक्त तीनहि श्लोकांत वर्णन केलेली भगवती पिण्डब्रह्माण्डांत व्यष्टिसमष्टिरूपात व्यापून राहिली आहे

श्लोक ७ व ८ मध्यें देवीच्या बाह्यस्वरूपाची उपासना अभिप्रेत असून श्लोक ९ मध्यें देवीच्या अंतःस्वरूपाची—योगमार्गाची उपासना सांगण्याचा उद्देश आहे. योगशास्त्रांत कुंडलिनीचें महत्त्व फार आहे. कुंडलिनी ही एक अंतर्गत शक्ति असून तिचें भगवतीशीं तादात्म्य ह्या श्लोकांत वर्णिलें आहे. जो ब्रह्मज्ञानी असतो त्याची कुंडलिनी सहस्रदल कमलामध्यें ब्रह्मरंध्रांत

जागृत असते व ती शिवाशीं एकरूप झालेली असते त्या कुडलिनीचा साक्षात्कार हें ब्रह्मज्ञानाचें सर्वश्रेष्ठ लक्षण आहे अज्ञानी जनाची कुडलिनी सर्वांत खाली मूलाधारचक्रात सुषुप्तावस्थत असते तिच वर्णन पुढील श्लोकात (श्लोक १०) केलेल आहे ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी मूलाधारातील सुप्त कुडलिनी जागृत करून तिनें वरील षट्चक्राचें भेदन करून ब्रह्मरध्रात शिवसायुज्य करून साधकाला तिचें उत्थापन करावें लागतें ही प्रक्रिया मानवास सहजसुलभ नसते 'अनेकजन्मससिद्धस्ततो याति परा गतिम्' या गीतावचनाप्रमाणें अनेक जन्म घेऊन योगसाधन केल्यानेंच साधकास मोक्षप्राप्ति होते

ह्या कुडलिनीसबधीच व षट्चक्रासबधीच वर्णन योगशास्त्रात आले आहे मूलाधारचक्र ह गुद व लिंग या दोघांच्या दरम्यान आहे व तें चतुर्दल आहे प्रस्तुत श्लोकात सागितल्याप्रमाणें हें मूलाधारचक्र पृथ्वीतत्त्वाचें निदर्शक आह त्यास पुढील प्रमाण आहे—

'गुदलिङ्गान्तरे चक्रमाधारारय चतुर्दलम् ।
अस्ति कुण्डलिनी ब्रह्मशक्तिराधारसपुटे ॥
आब्रह्मरन्ध्रमृजुता नीतेयममृतप्रदा ।'

मूलाधारचक्रामध्य सर्पाकार कुण्डलिनी साडेतीन वेटोळी होऊन सुषुप्तावस्थेंत असते (श्लोक ११ मध्यें विशेष वर्णन पाहा) या चतुर्दलामध्यें व, श, ष, स हें चार वर्ण आहेत 'वशषसदलयुक्ते सम्यगाधारपद्मे' इ वचनात त्याचा उल्लेख आहे

पचमहाभूतानीं हं जगत् झालेल आहे हीं पचतत्त्वें म्हणजे आकाश, वायु, अग्नि, जल व पृथ्वी होत त्यानीं जड किंवा अचेतन जगत् झालें आह त्यात पृथ्वी ही सर्वांत खालची व आधारभूत आहे म्हणूनच मूलाधारचक्र पृथ्वीतत्त्व आहे ह योग्य आहे अरुणामोदिनी टीकेंत उद्धृत केलेल्या रुद्ररहस्यातील पुढील श्लोक पाहा—

*'सर्वाधारा मही यस्मान्मूलाधारतया स्थिता ।*
*तदभावे तु देहस्य पात स्याद्भ्रमोऽपि वा ॥'*

*या मूलाधारचक्राच्या वर मणिपूरचक्र आहे असें या श्लोकात सागितल आहे पण योगमार्गाच्या इतर सप्रदायपद्धतीनुसार मूलाधारचक्राच्या वर असलेल्या*

चक्रास 'स्वाधिष्ठान' म्हणतात व या स्वाधिष्ठानाच्या वर 'मणिपूरचक्र' आहे. पण आचार्यांनीं प्रस्तुत श्लोकांत मणिपूरचक्र स्वाधिष्ठानचक्राच्या आधीं असल्याचें सांगितलें आहे. त्या मतानुसार अरुणामोदिनी टीकेंत पुढील श्रुतिवचन उद्धृत केलें आहे—

'आत्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। आपो वा अग्नेरायतनम्। अद्भ्योऽग्निर्ब्रह्मतः क्षत्रं पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशः।'

जरी चक्रांच्या स्थानांत आचार्यांची क्रमाविषयीं भिन्नता असली तरी तत्त्वाविषयीं नाहीं. दोन्ही मतांप्रमाणें दुसऱ्या चक्रांत जलतत्त्वच आहे. हें दुसरें चक्र षड्दलात्मक आहे व त्या सहा दलांत ब, भ, म, य, र, ल हीं सहा अक्षरें किंवा वर्ण आहेत. त्या द्वितीयचक्रावरील तृतीय चक्रास स्तोत्रकर्ते आचार्य 'स्वाधिष्ठान' म्हणतात. नामभिन्नता असली तरी दोन्हीं मतांनीं यांत अग्नितत्त्व आहे असेंच प्रतिपादिलें आहे. या तृतीय चक्राचीं दश दलें आहेत. त्यांत ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ हे दहा वर्ण आहेत.

या स्वाधिष्ठान चक्राच्या वर हृदयाच्या शेजारीं असलेल्या चक्राला 'अनाहतचक्र' असें म्हणतात. तें अनाहतचक्र द्वादशदलात्मक असून त्यांत कपासून ठपर्यंत बारा वर्ण आहेत. ह्यांत वायुतत्त्व आहे. विविध प्रकारचे अनाहत नाद या ठिकाणीं अभिव्यक्त होतात म्हणून या चक्राला अनाहतचक्र असें म्हटलें आहे. त्याच्या वरील कंठस्थानीं पाचवें 'विशुद्धिचक्र' आहे. ते षोडशदलात्मक असून तें आकाशतत्त्वाचें आहे. त्यांतील सोळा वर्ण म्हणजे अपासून अःपर्यंतचे सोळा स्वर आहेत. ह्या विशुद्धिचक्राच्या वर भ्रूमध्यांत 'आज्ञाचक्र' आहे तें द्विदल असून त्यांत ह आणि क्ष हे दोन वर्ण आहेत. मन हें या चक्राचें तत्त्व आहे. त्याच्या वर 'सहस्रदलचक्र' आहे व त्यांत सहस्रदलें आहेत हें मूर्धस्थानीं आहे. त्यांत शिवशक्ति ह्या कुंडलिनीच्या रूपानें राहतात.

मूलाधार व स्वाधिष्ठान यांच्यामध्यें एक ग्रंथि आहे. मणिपूराजवळ दुसरी ग्रंथि आहे व आज्ञाचक्राच्या अंतराळीं म्हणजे वरील बाजूस तिसरी ग्रंथि आहे. ह्या ग्रंथींच्या नांवाविषयीं विभिन्न मतें आहेत एका मताप्रमाणें ह्या ग्रंथींचीं नांवें अनुक्रमें ब्रह्मग्रंथि, विष्णुग्रंथि व रुद्रग्रंथि अशी आहेत. अशी हीं तीन नांवें ललितासहस्रनामांत आहेत—

'मूलाधारैकनिलया ब्रह्मग्रन्थिविभेदिनी ।
मणिपूरान्तरुदिता विष्णुग्रन्थिविभेदिनी ।
आज्ञाचक्रान्तरालस्था रुद्रग्रन्थिविभेदिनी ।
सहस्राराम्बुजारूढा सुधासाराभिवर्षिणी ॥'

पण वामकेश्वरतन्त्रांत उलट्या क्रमानें ही नांवें आहेत ह्यांत कुंडलिनी मार्गाचें समग्र वर्णन आहे. तें असें—

'भुजङ्गाकाररूपेण मूलाधारं समाश्रिता ।
शक्तिः कुण्डलिनी नाम बिसतन्तुनिभा शुभा ॥
मूलकन्दं फणाग्रेण दृष्ट्वा कमलकन्दवत् ।
मुखेन पुच्छं संगृह्य ब्रह्मरन्ध्रसमन्विता ॥
पद्मासनगतः स्वस्थो गुदमाकुञ्च्य साधकः ।
वायुमूर्ध्वगतिं कुर्वन् कुम्भकाविष्टमानसः ॥
वाय्वाघातवशादग्निः स्वाधिष्ठानगतो ज्वलन् ।
ज्वलनाघातपवनाघातैरुन्निद्रितोऽहिराट् ॥
रुद्रग्रन्थिं ततो भित्त्वा विष्णुग्रन्थिं भिनत्त्यथ ।
ब्रह्मग्रन्थिं च भित्त्वैव कमलानि भिनत्ति षट् ॥
सहस्रकमले शक्तिः शिवेन सह मोदते ।
सा चावस्था परा ज्ञेया सैव निर्वृतिकारणम् ॥'

ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्वांत खालची ग्रंथि ही रुद्रग्रंथि आहे व ती स्वाधिष्ठानाजवळ आहे त्याच्या वर विष्णुग्रंथि आहे व तिचें स्थान अनाहतचक्राजवळ आहे आणि सवांत वर सहाव्या चक्रापाशीं ब्रह्मग्रंथि आहे योगिलोक योगाभ्यासानें मूलाधारांत निद्रित असलेल्या कुंडलिनीला जागृत करतात ती क्रमानें वर जात असतांना षट्चक्रांचें भेदन करते व नंतर सहस्रदल कमलांत जाऊन शिवाशीं तादात्म्य पावते किंवा परमशिवाशीं एकरूप होते ही अवस्था सर्वश्रेष्ठ असून तिला निर्वृत्ति असें म्हणतात ह्या षट्चक्राचें श्रीचक्राशीं ऐक्य कसें आहे तें पुढें कळून येईल यावरून हें सिद्ध होतें कीं, कुंडलिनी म्हणजे भगवती श्रीत्रिपुरसुंदरी होय

मूलाधारापासून विशुद्धीपर्यंत तीन नाड्या आहेत त्यांचीं नांवें अशीः—( १ ) इडा ( २ ) पिंगला ( ३ ) सुषुम्ना पैकीं सुषुम्ना ही मध्यगत असून

तिच्या डाव्या बाजूस इडा व उजव्या बाजूस पिंगला नाडी आहे. इडानाडीस चंद्रनाडी म्हणतात व पिंगलानाडीस सूर्यनाडी म्हणतात. कुंडलिनी जागृत झाल्यावर ती सुषुम्ना नाडीमार्गानें वर जाते. विशुद्धिचक्रापर्यंत ती गेल्यावर तेथें दोन फांटे फुटतात. एक फांटा पूर्वमार्ग असून तो आज्ञाचक्रांतून सहस्रदलाकडे जातो. दुसरा फांटा पश्चिममार्ग असून तो मस्तिष्काच्या मागून सहस्रदलाकडे जातो. पूर्वमार्गावरून सहस्रदलकमलापर्यंत पोहोंचण्यापूर्वी कुंडलिनी नऊ स्थानांतून जाते. त्यांचीं नांवें अनुक्रमानें अशीं– (१) बिंदु (२) इन्दु (अर्धचंद्र) (३) रोधिनी (४) नाद (५) नादान्त (६) शक्ति (७) व्यापिनी (८) समना (९) उन्मना. कुंडलिनी उन्मनामधून वर गेल्यावर सहस्रदलकमलाप्रत पोहोंचते. ह्या नऊ स्थानांचें श्रीचक्राशीं ऐक्य पुढें विवरणांत येईल. पश्चिमेकडील मार्गांत तीन स्थानें आहेत. तीं स्थानें अशीं—(१) पयस्विनी (२) अलंबुसा व (३) गांधारी.

सुधाधारासारैश्चरणयुगलान्तर्विगलितैः
प्रपञ्चं सिञ्चन्ती पुनरपि रसाम्नायमहसा ।
अवाप्य स्वां भूमिं भुजगनिभमध्युष्टवलयं
स्वमात्मानं कृत्वा स्वपिषि कुलकुण्डे कुहरिणि ॥ १० ॥

(शिवाशीं रममाण झाल्यावर मग) पुनः तूं आपल्या दोन्ही चरणांच्या आंतून वाहणाऱ्या अमृताच्या धारेनें प्रपंचास षडरसरूपीं महत्तेजानें शिंपडीत आपल्या जागीं परत येऊन सापाप्रमाणें आपल्या शरीराची साडेतीन वेटोळीं करून कुंडाकार बिलामध्यें निद्रित होतेस.

टीपा—मागील श्लोकांत सांगितलें आहे कीं, शिवशक्तीच्या योगानें ब्रह्मांडनिर्मिति होते. ब्रह्मांडनिर्मितीकरितां निर्गुण ब्रह्म सगुण होतें असें वेदांतवेत्ते म्हणतात. सगुण ब्रह्मानें अग्नि, जल, पृथ्वी इ. तत्त्वें निर्माण केली. त्याचप्रमाणें तांत्रिकतत्त्वज्ञानांत सांगितलें आहे कीं, ह्या स्थूल जगदारंभीं सूक्ष्म अशीं सहा तत्त्वें निर्माण केलीं, तीं अशीं—(१) माया (२) कला (३) अविद्या (४) राग (५) काल (६) नियति. ह्या श्लोकांत जो रसाम्नाय हा शब्द आहे तो ह्या सहा तत्त्वांनाच उद्देशून आहे. रस ह्या शब्दाचा अर्थ सहा असाहि संकेतानें होतो. कारण रस सहा आहेत.

ऋतुहि सहाच आहेत. रसाम्नाय म्हणजे मागील श्लोकांत वर्णन केलेलीं सहा चक्रें होत. प्रपंच म्हणजे शरीरांतर्गत नाडीचा विस्तार. ह्या नाड्या ७२००० आहेत असें योगशास्त्र सांगतें. स्थूल शरीराप्रमाणें ह्या आंतील नाड्याहि अचेतन आहेत. कुलकुण्ड म्हणजे मूलाधार चक्र होय. ( कुः पृथ्वीतत्त्वं लीयते यस्मिन्, इति मूलाधारः । तदेव कुण्डं निवासस्थानविशेषः । ) '°महसः' या षष्ठीऐवजीं '°महसा' हा तृतीयान्त पाठ विशेष प्रचलित असून तोच येथें घातला आहे. कविराज शर्मा ह्या टीकाकारानें '°महसां' हा षष्ठी बहुवचनाचा पाठ घेतला आहे. ह्या पाठभेदांनीं अर्थात् अर्थभिन्नता होत नाहींत.

चतुर्भिः श्रीकण्ठैः शिवयुवतिभिः पञ्चभिरपि
प्रभिन्नाभिः शंभोर्नवभिरपि मूलप्रकृतिभिः ।
त्रयश्चत्वारिंशद्वसुदलकलाश्रत्रिवलय-
त्रिरेखाभिः सार्धं तव शरणकोणाः परिणताः ॥ ११ ॥

चार श्रीकंठ ( म्हणजे शिवचक्रें ) आणि पांच शक्तिचक्रें अशा प्रकारें भिन्न झालेल्या शिवाच्या नऊहि मूलप्रकृतींनीं तुझें मंदिर त्रेचाळीस कोणांनीं परिणत होतें. एक अष्टदल कमल, दुसरें षोडशदल कमल, ( त्याच्या बाहेर ) तीन वर्तुळें, तीन रेखांचीं भूपुरें ह्यांसहित तुझ्या भवनाचे त्रेचाळीस कोण परिणत होतात.

*टीपा*—हें *श्रीत्रिपुरसुंदरीच्या श्रीचक्राचें वर्णन* आहे. हें श्रीचक्र कसें काढावें तो उद्धारक्रम लक्ष्मीधर इ. कांहीं टीकाकारांनीं दिला आहे. याशिवायहि हें चक्र अनेक प्रकारांनीं काढतां येतें. ते प्रकार अठरा आहेत. ते अठराहि प्रकार आणि त्यांचा प्रस्तार ( श्रीचक्र काढण्याचा प्रकार ) परिशिष्टांत दिला आहे.

श्रीचक्र हें शिवशक्तींचें शरीर आहे. चतुःशतीमधील पुढील श्लोक पाहा—

' चतुर्भिः शिवचक्रैश्च शक्तिचक्रैश्च पञ्चभिः ।
नवचक्रैश्च संसिद्धं श्रीचक्रं शिवयोर्वपुः ॥ '

अथर्वणश्रुतीच्या सौभाग्यकाण्डामध्यें श्रीचक्राचें येणेंप्रमाणें वर्णन आहे—

' *तिस्रः पुरस्त्रिपथा विश्वचर्षणा अत्राकथा अक्षराः संनिविष्टाः ।*
अधिष्ठायैना अजरा पुराणी महत्तरा महिमा देवतानाम् ।

नवयोनें नव चक्राणि दीधिरे नवैव योगा नव योगिन्यश्च ।
नवाना चक्रा अधिनाथाः स्योना नव भद्रा नव मुद्रा महीनाम् ॥
एका स आसीत्प्रथमा सा नवासीद्रा सोनत्रिंशादा सोनत्रिंशत् ।
चत्वारिंशादथ तिस्रः समिधा उशतीरिव मातरो माविशन्तु ॥ '

जे मंदबुद्धि व अज्ञानी लोक आहेत त्यांच्या करितां बाह्यमूर्तीची उपासना आहे. सर्वश्रेष्ठ अध्यात्मज्ञानाचा अधिकार हजारों लोकांत एखाद्यालाच असतो. ब्रह्मसूत्रभाष्यांत श्रीशंकराचार्यांनीं सांगितलें आहे कीं, मनुष्य हा सामान्यतः अज्ञानी असतो. अज्ञानी म्हणजे ज्याला परमात्मा, जीवात्मा व जड जगत् यांच्यामधील भेद कळत नाहीं तो मनुष्य. अज्ञानी मनुष्य देहावर जीवात्म्याच्या गुणांचा आरोप करतो व जीवात्म्यावर देहाच्या गुणांचा आरोप करतो. उदाहरणार्थ–देहांत पांच कर्मेन्द्रियें आहेत–वाक्, पाणि, पाद, वायु, उपस्थ. ह्यांत जीव असेल तर हीं पांच इन्द्रियें आपापलीं कार्यें करूं शकतात हें खरें, पण म्हणजे जीवात्मा तीं कार्यें करतो असें नव्हे तर जीवात्मा त्या इन्द्रियांकडून तें कार्य करून घेतो. कार्य करून घेणारा जीवात्मा असून कार्य करणारीं इन्द्रियें आहेत. आपण पायांनीं चालतो, पण चालण्याची क्रिया पाय करतात व ती क्रिया करवून घेणारा जीवात्मा असतो. म्हणून जीवात्मा चालतो असें नव्हे तर जीवात्मा त्यांना चालावयाला लावतो जीवात्मा व देह यांमधील हा भेद अज्ञानी मनुष्य समजूं शकत नाहीं. म्हणून तो म्हणतो कीं, आपला आत्मा चालतो. अशा प्रकारें देहाचा आरोप तो आत्म्यावर करतो. याप्रमाणेंच उलटप्रकारें आत्म्याचा आरोप तो देहावर करतो. अशा अज्ञानी लोकांसाठीं आपल्या शास्त्रानें बाह्योपासना सांगितली आहे. ही बाह्योपासना म्हणजे देवदेवताच्या मूर्तींची, शंकराचा बाण इत्यादिकांची उपासना होय. असे उपासक अंतर्मुख होऊं शकत नाहींत म्हणून ते फक्त बाह्योपासनेचे अधिकारी असतात श्लोक सातमध्यें भगवती त्रिपुरसुंदरीचें जें ध्यान सांगितलें आहे तें ह्या लोकांसाठींच आहे. अशा प्रकारें मूर्तिध्यान करणें ही उपासनेची पहिली पायरी होय प्रायः सर्व लोक हिचेच अधिकारी असतात. ह्यांसेरीज इतर वरेच नास्तिक असतात. त्यांना ह्या बाह्य मूर्तिपूजेचाहि अधिकार नाहीं. उदा० चार्वाक, बौद्ध इत्यादि. म्हणून उपासनेच्या पहिल्या पायरीला देखील एका विशिष्ट आस्तिक्यबुद्धीची

आवश्यकता आहे. हिंदूधर्माखेरीज अन्यधर्मीय लोक एकप्रकारें आस्तिक आहेत. कारण ते ईश्वरप्रार्थना इत्यादि करतात. पण ते मूर्तिपूजा मानीत नाहींत. अशा लोकांविषयी येथे ऊहापोह केला नाहीं.

आस्तिकांतहि दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारचे म्हणजे अगदीं पहिल्या पायरीवरील आस्तिक लोक जे असतात, त्यांच्यांत अंतर्मुखतेचा संपूर्ण अभाव असतो. पण ते जगन्नियंत्या ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि बाळगतात. अशा लोकांकरितां बाह्यमूर्ति ही उपास्य आहे. बाह्योपासना केल्यानें हळूंहळूं वृत्ति अंतर्मुख होऊं लागते. ही अंतर्मुखता म्हणजे देह व बाह्य जगत् यांमध्यें कोणतीं देवीं तत्त्वें कार्य करीत आहेत त्यांचें ज्ञान करून घेण्याची इच्छा. बाह्योपासना पुष्कळशी झाल्यावर मगच अशा *अंतर्मुख वृत्तीचा उद्भव होतो. ह्या वृत्तीचा उद्भव होण्यास मनुष्याच्या मान*सिक सुवृत्तींना जागृत करण्याची आवश्यकता आहे. गीतेंतील पुढील श्लोकांत म्हटल्याप्रमाणें—

'काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्। '

सर्वसामान्यतः मनुष्य रजोगुणांनीं युक्त असतो त्यास गीतेंत महापाप्मा असें म्हटलें आहे आणि म्हणून त्यास वैरी असें म्हटले आहे. अशा रजोगुणयुक्त माणसांत प्रथमतः आस्तिक्यबुद्धीचा उद्भव झाला पाहिजे. तमोगुणयुक्त अनेक जन्म घेतल्यानतर मनुष्यांत रजोगुण उत्पन्न होतो रजोगुणांचें अनेक जन्म झाल्यावर त्याच्यांत जगत्कर्त्या ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि निर्माण होते ही बुद्धि निर्माण झाल्यावर तिच्या वृद्धीसाठीं धर्मरूपी साधन ईश्वरानें निर्माण केले आहे. आस्तिक्यबुद्धि निर्माण झाल्यावर माणसास वाटतें कीं, ह्या ब्रह्मांडावर सत्ता चालविणारी जी कोणी एक शक्ति आहे तिची आराधना केल्यानें सुखप्राप्ति होते ती आराधना म्हणजेच सुखप्राप्तीची साधना होय. हिंदुधर्मांत ज्या साधना सांगितल्या आहेत त्या सर्वतोपरी श्रेष्ठ आहेत.

प्राचीन वाङ्मयांत धर्माच्या अनेक व्याख्या दिल्या आहत त्यात कणादांच्या वैशेषिकसूत्रामध्यें जी व्याख्या दिली आहे ती या सवयात उद्बोधक आहे.

'अभ्युदयनिःश्रेयसहेतुर्धर्मः। '

ही ती व्याख्या होय ह्या व्याख्येंत स्पष्ट सांगितलं आहे कीं, अभ्युदय व निःश्रेयस् यांना जो कारणीभूत होतो तो धर्म होय म्हणून धर्माचरण केल्यानें अभ्युदय व निःश्रेयस हीं प्राप्त करून घेता येतात नामरूपात्मक त्रिविध भूमि, अंतरिक्ष व द्यु निर्माण करून त्यात ब्रह्मानें जीवरूपानं प्रवेश केला तेव्हा या नामरूपात्मक जगतांत जीवाचं अस्तित्व दोन प्रकारचें असतें एक म्हणजे तो जीवात्मा देह धारण करून जन्मास येतो त्या क्षणापासून त्या देहाचा पात होईपर्यंत ज्यास आपण जिवंतपणा म्हणतो तें अस्तित्व व दुसरं म्हणजे देहप्राप्तीनंतर तो जीवात्मा शरीररहित व आपल्या सामान्य दृष्टीला अदृश्य अशा रीतीनें अंतरिक्षांत असतो किंवा द्युलोकांत देहपातानंतर त्याचा विनाश होत नाहीं, पण संचित कर्मानुसार फलाचा उपभोग तेथं घेत असतो. हा जीवाच्या अस्तित्वाचा दुसरा प्रकार होय ह्या दोन्हीं प्रकारच्या अस्तित्वांत जीवात्म्याला सुखप्राप्तीची इच्छा असते व दुःख हें केव्हांहि त्याला नको असते

'यः कश्चित्सौख्यहेतोस्त्रिजगति यतते नव दुःखस्य हेतोः।'

असें श्रीशंकराचार्यांनीं सांगितलं असून

'सुखार्थाः सर्वभूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः ।
सुखं न च विना धर्मात्तस्माद्धर्मं न च त्यजेत् ॥'

असं स्मृतिवचनहि आहे

प्रारब्धकर्मानुसार सुखदुःखांचे भोग भोगावे लागतात तरी पण दुःख कमी करून सुखप्राप्तीची बुद्धि व्हावी ह्या हेतून ईश्वरानं धर्म निर्माण केला आहे लोकजीवनांत सुखप्राप्तीसाठीं धर्म आवश्यक आहे

'धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पंति ।
धर्मेण पापमपनुदति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति ॥'

असं नारायणोपनिषदांत सांगितलं असून

'धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजाः ।
यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चितः ॥'

असंहि एक स्मृतिवचन प्रसिद्ध आहे सातत्यानं सुखप्राप्तीचा मार्ग सांगणारा तो धर्म होय

अभ्युदय म्हणजे ऐहिक व पारलौकिक जीवात्म्याचं चिरंतन सुख व निःश्रेयस म्हणजे जीवन्मुक्ति म्हणजे ब्रह्माशीं ऐक्य होणं अभ्युदय व

नि श्रेयस हीं केवळ हिंदुधर्माचींच वैशिष्टयें आहेत इतर धर्मात अभ्युदयाचा धार्मिकदृष्टया विचार नाहीं सर्व धर्म समार सोडण्यावर भर देतात ससार म्हणजे *माता, पिता, भगिनी, भ्राता, दुहिता इत्यादि कौटुंबिक विस्तृत प्रपच* होय त्याच्याविषयींचीं कर्तव्यें करणें, नैतिक मूल्यें जतन करणें व गृहस्थाश्रमाचीं कर्तव्यें पार पाडणें म्हणजे धर्म पालन करणें होय हें वैदिक धर्माचें वैशिष्टय होय

*हिंदुधर्मांत आश्रमपद्धति आहे आश्रम एकूण चार आहेत पैकीं* ब्रह्मचर्य व गृहस्थ ह्या दोन आश्रमात ससारात राहून धर्मकर्मे करावयाचीं असतात त्यास प्रजेचें धारण म्हणतात वानप्रस्थ व सन्यास ह्या दोन आश्रमात ससार सोडून आत्मिक चिंतन करावयाचें असतें प्रथमच्या दोन आश्रमानीं ऐहिक अभ्युदय साधून पुढील दोन आश्रमानीं पारलौकिक अभ्युदयाच म्हणजेच नि श्रेयसाच साधन प्राप्त करावयाच असते परलोकामध्येंहि जीवात्म्यास *सुखदु खाचे भोग भोगावे लागतात ते भोग भोगणें सपणें म्हणजच जीवात्म्याच* ब्रह्माशीं ऐक्य होणें होय या अवस्थेला मुक्ति असें नाव आहे ही अवस्था परलोकापलीकडील आहे परलोकामध्येंहि सुखप्राप्ति हें धर्माचे उद्दिष्ट आहे

पुनर्जन्माची कल्पना हे हिंदुधर्माचे आणखी एक वैशिष्टय आहे इतर धर्म तो मानीत नाहींत मनुष्य हा मृत झाल्यावर पुन्हा जन्मास येईपर्यंत त्याचा जीवात्मा परलोकात असतो इहलोक म्हणजे पृथ्वी व परलोक म्हणजे अतरिक्ष व द्यु होय देहपातानतर जीवात्मा अतरिक्षलोकात जाता व तो अतिपुण्यवान असल्यास देवरूपानें द्युलोकात जातो अतरिक्ष व द्युलोकातील जीवात्म्यासहि कर्मानुरूप सुखदु ख भोगावी लागतात ' यक्षराक्षसवेताला कूष्माण्डा भैरवादय । ' ह्या सप्तशतीतील श्लोकात उद्धृत कलल जीवात्मे *अतरिक्षात असतात इद्र, चद्र, सूर्य अश्विनौ, मरुत इत्यादि देवता द्युलोका* तील जीवात्मे होत ह्यानाहि कर्मानुसार सुखदुखें भोगावीं लागतात देवानाहि पापपुण्यानुरूप उच्चनीच योनी प्राप्त होतात, हें नहुषराजाच्या कथेवरून कळून येईल इद्रालाहि पापपुण्याच्या सचयामुळे शाप व उ शाप प्राप्त झाले आहेत

अभ्युदय व नि श्रेयस म्हणजे इहलोकीं व परलोकीं प्राप्त होणार सुख हें सुख प्राप्त करून घण्यासाठीं वैदिक धर्मानें काहीं कर्माचरण सागितलें आहे या वैदिक धर्माची कल्पना आपल्याला वेदाच्या अभ्यासावरून येते चार

वेदांपैकीं ऋग्वेद हा मंत्रप्रधान आहे. मंत्रप्रधान म्हणजे संपूर्णतया मंत्रात्मकच आहे. वैदिक कर्म करतांना त्यांतील मंत्रांचा विनियोग करावयाचा असतो. कोणतीं कर्मे करतांना कोणते मंत्र म्हणावयाचे व त्यांचा विनियोग कसा करावयचा हें यजुर्वेदांत सांगितलें आहे. मंत्र हें शास्त्रोक्त व शुद्ध रीतीनें कसे म्हणावेत याची माहिती आपणांला सामवेदांत मिळते. मंत्र परिणामकारक होण्याकरितां मंत्रोच्चारहि शुद्ध व योग्य रीतीनें करावा लागतो. ह्याविषयीं व्याकरण महाभाष्यकार पतंजलींनीं स्पष्ट नियम घालून दिला आहे. ते म्हणतात—

'एकः शब्दः सम्यग् ज्ञातः सम्यक् प्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवति।'

वेदांतील शब्द चांगल्या रीतीनें समजून घेऊन योग्य रीतीनें त्यांचा उपयोग केला तर तो मनुष्य स्वर्गातहि आपली इच्छित कामना पूर्ण करण्यास समर्थ होतो. यांतील यांतील 'स्वर्गे लोके' हे शब्द फारच अर्थपूर्ण आहेत. 'सम्यग् ज्ञात' व 'सम्यक प्रयुक्त' शब्द फक्त या लोकांतच मनःकामना पूर्ण करतो इतकेच नव्हे तर देहपातानंतरहि तो जीवात्मा मंत्राच्या पुण्यदायक उच्चारामुळें देवरूप धारण करुन स्वर्गलोकीं जातो व तेथेंहि त्याची इच्छापूर्ति होते. म्हणजे वैदिक शब्द बरोबर जाणून प्रयुक्त केला तर इहलोकीं व परलोकींहि तो लाभप्रद होतो दुसऱ्या प्रकारें सांगावयाचें म्हणजे अभ्युदय व निःश्रेयस शुद्ध वैदिक मंत्रोच्चारानें प्राप्त होतात. वैदिक मंत्र हे विशिष्ट कालीं विशिष्ट वैदिक कर्मे करतांनाच ह्मणावयाचे असतात. उदाहरणार्थ गायत्रीमंत्र प्रातःकालीं सूर्योदयसमयीं सूर्याभिमुख होऊन अर्घ्यप्रदान करतांना म्हटला पाहिजे. तसेंच मध्याह्नसंध्या व सायंसंध्या करतांनाहि म्हटला पाहिजे. त्या वेळीं 'यः शुचि प्रयतो भूत्वा' यांत सागितल्याप्रमाणें शास्त्रोक्त शुद्धता राखली पाहिजे. आणि अशाप्रकारें जी शास्त्रोक्त स्वरप्रक्रिया आहे तिच्याप्रमाणें योग्य व शुद्ध उच्चारण झालें तर तो मंत्र लाभप्रद झाल्याशिवाय राहणार नाहीं. हें सत्य इतर मंत्रांच्या बाबतीतहि आहे. मंत्रांचें शास्त्रोक्त उच्चारण न झाल्यामुळें जो प्रमाद घडतो त्याचें अनिष्ट फल मंत्रोच्चारण करणाऱ्यालाभोगावें लागतें. याचें उदाहरण म्हणून भाष्यकारांनीं 'इन्द्रशत्रुर्वर्धस्व' या मंत्राचा उच्चार करतांना स्वरप्रमाद झाल्यानें अनर्थ घडल्याची कथा दिली आहे. ती अशी—

'दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह।
स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥'

इहलोकीं जन्म घेतल्यावर मनुष्यास अनेक आपत्तींला तोंड द्यावें लागतें. अशा संकटांचा परिहार होण्यासाठीं विधिविधानें कोणतीं हें सांगण्यासाठीं अथर्ववेद आहे. त्यांत इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार यांसाठीं मंत्र-प्रयोग आहेत. ह्याचें एकच उदाहरण पुढें दिले आहे.

'ज्येष्ठघ्न्यां जातो विचृतोर्यमस्य मूलबर्हणात्परि पाह्येनम्।
अत्येन नेषद्दुरितानि विश्वा दीर्घायुत्वाय शतशारदाय॥
व्याघ्रेऽह्न्यजनिष्ट वीरो नक्षत्रजा जायमानः सुवीरः।
स मा वधीत्पितरं वर्धमानो मा मातरं प्र मिनीज्जनोत्रीम्॥'

ह्या मंत्राचा अर्थ असा कीं, ज्येष्ठा किंवा मूळ नक्षत्रावर किंवा दुसऱ्या एकाद्या अशुभ नक्षत्रावर जन्मलेला मुलगा स्वतः मृत्यु पावतो किंवा आई वा बडिल यांच्या मृत्यूस कारणीभूत होतो. हें कनिष्ठ फल प्राप्त होऊं नये म्हणून पुढें मंत्र सांगितला आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, अशाप्रकारच्या दुष्ट नक्षत्रावर जन्मलेला मुलगा वीर होऊन शंभर वर्षे जगणारा दीर्घायु होवो व आपल्या जन्मदात्या मातापित्यांना मारणारा न होवो. कौशिकसूत्रांत सांगितलें आहे कीं, अनिष्ट नक्षत्रावर मूल जन्मलें तर शांति करून उपरोक्त व इतर मंत्रपाठ करावा.

इतका विस्तार करण्याचें कारण कीं, आपला वैदिक धर्म केवळ मोक्ष-प्राप्तीचेंच साधन दाखवितो असें नव्हे तर इहपरलोकीं सुखप्राप्तीचीं साधनेंहि सांगतो. साध्या भाषेंत सांगावयाचें तर संसार व परमार्थ हे दोहींहि सुखकारक कसे होतील हे शिकविणारा आपला वैदिक धर्म आहे. परंतु गेल्या कांहीं शतकांपासून ह्या तत्त्वज्ञानाचा विपर्यास झाला आहे संसार हे दुःखाचें मूळ समजूत त्याचा त्याग करावा व देवाचें भजन करीत राहावें असा साधुमतांचा उपदेश असतो.

'जन्माचें तें मूळ पाहिलें शोधून। दुःखासी कारण जन्म घ्यावा॥
पापपुण्य करूनी जन्मा येतो प्राणी। नर देहा घेऊनी हानी केली॥
तम म्हणजे काय नरकची केवळ। रजत सकळ आण पावा॥
तुका म्हणे येथें सत्त्वाचें सामर्थ्य। परि परमार्थ अहर्निशी॥'
'ठेविलें अनंतें तैसेंची राहावें। चित्तीं असो द्यावें समाधान॥'

वगैरे अभंगांतून निष्क्रियता व नैराश्य सांगितलें आहे. ह्याला अपवाद म्हणजे रामदासस्वामी त्यांनीं 'आधीं प्रपंच करावा नेटका' असें प्रतिपादिलें आहे

'प्रपञ्च साधूनी परमार्थाचा लाभ जयानें केला तो नर भला रे भला' 'भला जन्म हा तुला लाभला नरा,' इत्यादि संतवचनें प्रपंचाची महती वर्णन करणारी आहेत. 'दुर्लभ मनुष्यजन्म,' 'धन्यो गृहस्थाश्रमः' इत्यादि संस्कृत वचनेंहि सुप्रसिद्ध आहेत रामदासस्वामींनी स्वतः जरी प्रपंच केला नाहीं, तरी सर्व जनांना मात्र प्रपंचत्यागाचा मुळींच उपदेश केला नाही. कालिदास-कवीनें रघुवंशांत रघूचें वर्णन करतांना म्हटलें आहे कीं—

'शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।
वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम् ॥'

चारहि आश्रमधर्माचेंपालन करण्याचा आदेश वरील श्लोकांत अनुस्यूत आहे. गृहस्थाश्रमांतील सर्व कर्तव्ये पार पाडल्यावरच वानप्रस्थाश्रम रघूनें स्वीकारल्याचें वर्णन आहे भगवान विष्णूचे अवतार जे रघुरामराय किंवा भगवान श्रीकृष्ण यानीं आयुष्याच्या अंतापर्यंत गृहस्थाश्रमांतच राहून मोक्षाचें ज्ञान मिळवून मोक्षप्राप्ती करून घेता येते हें दाखवून दिले आहे. अशाप्रकारें गृहस्थाश्रमीय कर्तव्यें अनेक जन्म केल्यानंतर मोक्षज्ञानाची जिज्ञासा मानवास होते ज्ञानप्राप्तीपूर्वी शम, दम, तितिक्षा इत्यादि गुण संपादन करून घेऊन ज्ञान मिळविण्याची योग्यता प्राप्त करून घ्यावी लागते व अशी योग्यता प्राप्त झालेला ब्रह्मज्ञानाचा अधिकारी होतो, असें 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात श्रीशंकराचार्यांनीं विवेचन केले आहे.

इतका उहापोह करण्याचं कारण म्हणजे जे वैदिक धर्माचें ध्येय आहे तेंच शाक्तसंप्रदायाचं उद्दिष्ट आहे हें दाखविण्याचा आहे अलीकडील शाक्तसांप्रदायिकांनीं म्हटले आहे कीं,

'यत्रास्ति भोगो न हि तत्र मोक्षो यत्रास्ति मोक्षो न न हि तत्र भोगः ।
श्रीसुन्दरीपूजनतत्पराणां भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ॥'

श्लोकाच्या पूर्वार्धांत आपल्या धर्माचें विकृत स्वरूप दिलं आहे. उत्तरार्धांत म्हटलें आहे कीं, श्रीत्रिपुरसुन्दरीच्या पूजकाना भोग व मोक्ष या दोहोंचाहि सहज लाभ होतो. व हेंच वैदिक धर्मालाहि अभिप्रेत आहे.

चार वेद हे कर्मकाण्ड सागणारे आहेत हे कर्मकाण्ड वर सागितल्या प्रमाणें इहपरलोकीं सुख प्राप्त करून देणारं आहे उपनिषदें हीं ज्ञानप्राप्तीचा *मार्ग दाखविणारीं आहेत म्हणजे उपनिषदें हीं ज्ञानप्राप्तीची इच्छा* करणाऱ्याकरिता आहेत, सर्वसामान्याकरिता नाहींत कारण ते ज्ञानाच अधिकारी नसतात शाक्तसप्रदायाचहि हेंच तत्त्व आहे

कर्मकाण्डाचा दुरुपयोग केल्यानें वेदनिंदा होते व त्या निंदेला कारणीभृत असा दुरुपयोग करणारेहि काहीं विद्वान आहेत याचप्रमाणें शाक्तसप्रदायाच्या निंदेला कारणीभूत असा सप्रदायाचा दुरुपयोग करणारे काहीं साप्रदायीहि आहेत

कर्म, उपासना व ज्ञान या तीन पायऱ्या चढून गल्यावर साधकास मोक्ष प्राप्ति होते आणि हीच वैदिक धर्माची शिकवण आहे शाक्तसप्रदायाच मूलभूत प्रयोजनहि हेंच आहे *या सप्रदायातहि कर्म, उपासना व ज्ञानप्राप्ति हीं क्रमाक्रमानें करून घ्यावयाची असतात श्रीत्रिपुरोपासना ही शाक्तसप्र* दायाच्या अनेक उपासनाप्रकारापैकीं एक आह जगत् निर्माण करणारी जी शिवशक्ति आहे तिच्या आराधनेची सुरवात सप्रदायप्रोक्त कर्मानेंच होते शाक्तसप्रदायोक्त कर्म म्हणजे देवीच्या बाह्य मूर्तीची पूजा इत्यादि सप्रदायात देवीचीं अनेक रूपें सागितलीं आहेत त्यापैकीं प्रथम शिवशक्ति ही नाना प्रकारच्या मूर्तिरूपानें प्रकट होते उदाहरणार्थ, दहा प्रकारच्या महाविद्यापैकीं श्रीत्रिपुरसुदरी ही एक आह तिच्या एका हातात रागरूपी पाश, दुसऱ्या *हातात क्रोधरूपी अकुश, तिसऱ्या हातात मनोरूपी इक्षूच ( ऊसाचें कांडें )* धनुष्य, व चौथ्या हातात पाच तन्मात्रारूपी बाण, याप्रमाणें चार हातात चार आयुधें धारण करते, आणि तिच्या अरुणप्रभेनें सर्व ब्रह्माण्ड भरून राहिलें आहे राग ह्मणजे वासनाकिंवा इच्छा, मन ह्मणजे सकल्पविकल्परूप क्रिया, व तन्मात्र ह्मणजे शब्द, स्पर्श, रूप, रस वगध हे पचमहाभूताचे गुण देवीच्या डाव्या बाजूच्या वरच्या हातात मनारूपी इक्षुधनु आहे, तर उजव्या बाजूच्या वरच्या हातात तन्मात्ररूपी पाच बाण आहेत देवीच्या डाव्या बाजूच्या खालच्या हातात रागरूपी पाश आहे, तर उजव्या बाजूच्या खालच्या हातात क्रोधरूपी अकुश आहे ह्या आयुधानीं युक्त अशा भगवतीच्या अरुण कातीनें सर्व ब्रह्माण्ड व्यापून राहिलें आहे

' मातङ्गी भुवनेश्वरी च बगला घूमावती भैरवी।
तारा छिन्नशिरोधरा भगवती श्यामा रमा सुन्दरी ॥ '

या श्लोकांत महाविद्यांचीं नांवें सांगितलीं आहेत. श्रीत्रिपुरसुंदरीचें मूर्तस्वरूप हें फक्त उदाहरण म्हणून उद्धृत केलें आहे. वास्तविक शिवशक्तीचीं अनेक रूपें आहेत. सर्व भारतवर्षामध्यें शिवशक्ति अनेक रूपानें पूजिली जात आहे, हें विदितच आहे. कोल्हापूर, तुळजापूर, आंबेजोगाई, वर्णी, कामाक्षी, कांची, कन्याकुमारी, गोवा, कलकत्ता इत्यादि स्थळीं नानाविध मूर्तींच्या रूपानें तिची उपासना होत आहे. तसेंच बारा ज्योतिर्लिंगें व इतर स्वयंभू व स्थापित शिवाचीं स्थानेंहि बरीच असून शिवशक्तीची उपासना सर्वत्र प्रचलित झाली आहे. याचप्रमाणें गणपति, विष्णु, दत्तात्रेय, भैरव, भार्गवराम, दाशरथिराम, कार्तिकेय, हनुमान्, श्रीकृष्ण इत्यादिकांच्या मूर्तींचीहि विपुल क्षेत्रें सर्व भारतभर विखुरलेलीं आहेत. तसेंच ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम, कबीर, मीराबाई, रामकृष्ण परमहंस व इतर देवी उपासकांचीं समाधिस्थानेंहि पुण्यक्षेत्रें म्हणून प्रसिद्ध आहेत.

शाक्तसंप्रदायांत शिवशक्तीची उपासना ही मुख्य आहे. उपासकांसाठीं पहिली पायरी म्हणजे देवीच्या मूर्तीची पूजाअर्चा, स्तोत्रांतर्गत स्वरूपाचें चिंतन इत्यादि. सौंदर्यलहरी हे एक स्तोत्र असून, ह्या स्तोत्राचे कर्ते श्रीशंकराचार्य हे श्रीत्रिपुरसुंदरीचे उपासक होते. त्यांनीं सौंदर्यलहरीस्तोत्रांत श्रीत्रिपुरसुंदरीच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे. उपासनेची सुरवात मूर्तिपूजेपासून होत असल्यानें श्रीशंकराचार्यांनीं या स्तोत्राच्या प्रारंभीं श्रीत्रिपुरसुंदरीच्या मूर्तस्वरूपाचें वर्णन केलें आहे. तिच्या मूर्तीचें वर्णन श्लोक सातमध्यें आहे. श्रीत्रिपुरसुंदरीचें दुसरें बाह्यरूप जें श्रीचक्र त्याचें वर्णन प्रस्तुतच्या श्लोकांत आहे. श्रीचक्र हें भगवतीरूपच आहे. मात्र त्यांत मूर्तीचें स्वरूप नाहीं. भगवतीची पूजाअर्चा करतांना पूजकांनीं अशी भावना ठेवावयाची कीं, ती जगद्व्यापिनी असून तिनें सर्व ब्रह्माण्ड व्यापिलें आहे श्रीत्रिपुरसुंदरी ही अरुणप्रभायुक्त व चतुर्भुज आहे तिच्या एका हातांत धनुष्य, दुसऱ्या हातांत बाण, तिसऱ्या हातांत पाश व चवथ्या हातांत अंकुश धारण केलेला आहे. हीं आयुधें धारण केलेल्या चतुर्भुज देवीचें वर्णन मागील सातव्या श्लोकांत आलेंच आहे. त्यांना आंतरिक असा लाक्षणिक अर्थ त्यांत अभिप्रेत आहे.

‘ रागस्वरूपपाशाढ्या क्रोधाकाराङ्कुशोज्ज्वला ।
मनोरूपेक्षुकोदण्डा पञ्चतन्मात्रसायका ।
निजारुणप्रभापूरमज्जद्ब्रह्माण्डमण्डला ॥ ’

ललितासहस्रनामातील या श्लोकात सांगितलें आहे कीं, भगवतीनें रागस्वरूपी पाश व क्रोधरूपी अंकुश आपल्या हातात ( स्वाधीन ) ठेवलेले आहेत म्हणून उपासकानें भगवतीची उपासना केली म्हणजे उपासकाला भगवतीच्या कृपेनें कामक्रोधावर जय मिळविता येतो

श्रोत्र म्हणजे कान ह ज्ञानेंद्रिय आहे त्यानें आकाशाच्या शब्दगुणाच ज्ञान होतें त्याचप्रमाणें त्वक् ( त्वचा ), चक्षु ( डोळे ), जिह्वा ( जीभ ), व घ्राण ( नाक ) ह्या चार ज्ञानेंन्द्रियानीं अनुक्रमें वायु, अग्नि, जल व पृथ्वी याच्या स्पर्श, रूप, रस, गध या गुणाच अनुक्रमानें ज्ञान होतें हीं सर्व मानसिक कार्ये आहेत भगवतीच्या उपासकाला उपासनेनं भगवतीची कृपा सपादन करुन त्या सर्वांवर विजय मिळविता येतो

कामक्रोधावर जय मिळविल्यावर साहजिकच मनावरहि जय मिळतो मनावर विजय मिळविणें म्हणजे पञ्च ज्ञानेन्द्रियें व पञ्च कर्मेन्द्रियं आणि पञ्च तन्मात्रा यावर विजय मिळविणें होय येथपर्यंत बाह्यस्वरूपवर्णन झाल

आता त्या उपासनेची वरची पायरी म्हणजे श्रीचक्राची उपासना होय हें श्रीचक्र ताम्र किंवा सुवर्ण पत्र्यावर काढून त्याची यथाविधि पूजाअर्चा ही बाह्य उपासना श्रेष्ठ प्रतीची होय हें चक्र कशावर अंकित करावयाचें त्याचें तीन प्रकार आहत तें असें— ( १ ) भूपृष्ठ, ( २ ) कूर्मपृष्ठ व ( ३ ) मेरुपृष्ठ यंत्राचा पृष्ठभाग सपाट असतोच अस नाहीं पृष्ठाच्या कमीअधिक उंचीप्रमाणें त्या यन्त्रात भेद असतो तें यंत्र जर सपाट पृष्ठभागावर काढल तर तें भूपृष्ठ होतें पत्र्याला वेताचा बाक आणून त्यावर काढलें कीं तें कूर्मपृष्ठ होतें आणि चोहोंबाजूंनीं वन्याच वाकविलेल्या पत्र्यावर काढलें कीं तें मेरुपृष्ठ होतें उपरोक्त मूर्तीप्रमाणं हें श्रीचक्रसुद्धा अत मृष्टीच्या उपासनेचं प्रतीक आहे ह्यासबधीं विशेप विवेचन प्रस्तावनेंत आलच आहे येथें रुद्रयामलांतील आधारभूत प्रमाणवचनें लक्ष्मीधराच्या टीकेवरून उद्धृत केलीं आहेत

‘ पृश्नयो नाम मुनय सर्वे चक्रसमाश्रया ।
सेवमानाश्चक्रविद्या देवगन्धर्वपूजिताः ॥

अग्नीषोमात्मकं चक्रमग्नीषोममयं जगत् ।
अमावन्तर्बभौ भानुरग्नीषोममयं स्मृतम् ॥
त्रिखण्डं मातृकाचक्रं सोमसूर्यानलात्मकम् ।
त्रिकोणं बैन्दवं सौम्यमष्टकोणं च मिश्रकम् ॥
चक्रं चन्द्रमयं चैव दशारद्वितयं तथा ।
चतुर्दशारं वह्नेस्तु चतुश्चक्रं च भानुमत् ॥
एतत्प्रसादादिन्द्राद्या वसवोऽष्टौ मरुद्गणाः ।
ये ये समृद्धा लोकेऽस्मिन् त्रिपुराचक्रसेवकाः ॥
पुरत्रयं च चक्रस्य सोमसूर्यानलात्मकम् ।
महालक्ष्म्याः पुरं चक्रं तत्रैवास्ते सदाशिवः ॥ '

पृश्नी नावाच्या मुनींनीं देवगंधर्वपूजित श्रीचक्राचा आश्रय केला ' हें श्रीचक्र अग्निषोमात्मक आहे तसेंच जगत् हेंहि अग्निषोमात्मक आहे. म्हणजेच श्रीचक्र हें जगत्स्वरूप आहे अग्नीमध्यें सूर्य अंतर्भूत आहे त्रिखंडमातृकाचक्र अग्निषोमात्मक आहे. हें सर्व सोमसूर्याग्निरूप आहे श्रीचक्रांतील बिंदू व त्रिकोण हें सोमरूप आहेत. त्याबाहेरील अष्टकोण मिश्र आहे. त्या अष्टकोणाबाहेरील दोन दशकोण चक्रेंहि चंद्रमय आहेत त्याच्या बाहेर चतुर्दशकोण चक्रें अग्निमय आहेत, व सर्वांबाहेरील चतुश्चक्र हें सूर्यरूप आहे. ही उपासना म्हणजे त्रिपुराचक्राची उपासना होय या उपासनेच्या योगानें इंद्रादि देव अष्टवसु, मरुद्गण हे सर्व समृद्ध झाले ह्या श्रीचक्राचीं तीन भूपुरें हीं सोम, सूर्य व अग्निरूप आहेत अशा प्रकारें हें श्रीचक्र महालक्ष्मीचें स्थान असून तेथेंच सदाशिव असतो

ह्या वचनात सांगितल्याप्रमाणें भगवती ही विश्वरूपी आहे लक्ष्मीधरानें अरुणोपनिषदांतील ह्याच अर्थाचे आधारभूत मंत्र आपल्या टीकेंत उद्धृत केले आहेत भगवती त्रिपुरीच्या अंतःपूजेचा हा प्रकार सौंदर्यलहरींत वर्णिला आहे असें दिसत नाहीं पण अंत.पूजेचे दोन प्रकार श्लोक आठ ते दहामध्यें उल्लेखिलेले दिसतात एक प्रकार म्हणजे कुंडलिनीयोगाचा. ह्याचा उल्लेख श्लोक नऊ व दहामध्यें आहे दुसरा प्रकार म्हणजे पंचमहाभूतें व मन हीं भगवतीचें स्वरूप समजून ध्यान करणें. त्याचे उल्लेख पुढील चवदाव्या व पस्तीसाव्या श्लोकांत आहेत

श्रीचक्रलेखनाचे दोन प्रकार आहेत. एकाला आरोहचक्र व दुसऱ्यास अवरोहचक्र असें म्हणतात. यांस कांहीं *ठिकाणीं सृष्टिक्रम* व *संहारक्रम* असें म्हटलें आहे. सृष्टिक्रमामध्यें चार शिवचक्रें ऊर्ध्वमुख असतात व संहारक्रमांत पांच शक्तिचक्रें ऊर्ध्वमुख असतात. शाक्तसंप्रदायाचे दोन मार्ग मानले आहेत. एकाला समयमत असें म्हणतात व दुसऱ्यास कौलमत असें म्हणतात. सृष्टिक्रमानें *काढलेलें चक्र समयमतानुसारि* व *संहारक्रमानें काढलेलें चक्र* कौलमतानुसारि असें मानतात. योगमार्गांत कुंडलिनी शक्ति षट्चक्राचें भेदन करून ब्रह्मरंध्राप्रत पोहोंचते. कुंडलिनीमार्गांतील हीं चक्रें व समयकौलमार्गानुसार असलेली श्रीचक्रें यांचें ऐक्य भिन्न भिन्न रीतीनें भिन्न भिन्न टीकाकारांनीं दाखविलें आहे. हे सर्व प्रकार म्हणजे केवळ ओढाताणीचे आहेत.

श्रीत्रिपुरसुंदरीची श्रीचक्ररूपानें उपासना ही भोग व मोक्ष दोन्ही देणारी आहेत. कुण्डलिनीयोगानें मोक्षप्राप्ति होणें विवाद्य आहे. म्हणून कुंडलिनी मार्गाशीं श्रीचक्र उपासनेचें एकत्व असणें असंभवनीय आहे. *योगमार्गी शास्त्रांत जी कुंडलिनी शक्ति आहे तिचें भगवती त्रिपुरेशीं तादात्म्य* मांडणें योग्य नव्हे. छत्तीस ते एकेचाळीस श्लोकांत आपल्या शरीरांतील मूलाधारादि चक्रांचा उल्लेख आहे; आणि श्लोक दहामध्यें मूलाधारांतल्या कुलकुण्डामध्यें साडेतीन वेटोळी करून निद्रा करणारी असें भगवती त्रिपुरीचे वर्णन आहे. *तें योगमार्गांतल्या कुंडलिनीशी* समान आहे. पण श्लोक चवदा पासून पुढील वर्णन मात्र योगमार्गांतील कुण्डलिनीमार्गाशीं जमत नाहीं. ह्याविषयींच्या विस्तृत निवेदनाची येथें आवश्यकता नाहीं. थोडक्यांत म्हणजे *योगमार्गांतील कुण्डलिनी व भगवती त्रिपुरा एक नाहींत. प्रस्तावनेंत* त्याचा विचार केला आहे.

भगवतीरूपच आहेत असें समजून ध्यान करणें हा अंतर्ध्यानाचा दुसरा प्रकार होय प्रत्येक प्राचीन तंत्रग्रंथांत याचाच विचार अन्य प्रकारानें केला आहे त्याच्या उल्लेखाची येथें आवश्यकता नाहीं, पण उदाहरण म्हणून एक प्रकार येथें उद्धृत केला आहे. तो प्रकार कामेश्वरसूरीनें आपल्या टीकेंत दिला आहे.

'त्वगसृङ्मांसमेदोऽस्थिधातवः शक्तिमूलकाः ।
मज्जाशुक्लप्राणजीवधातवः शिवमूलकाः ॥
नवधातुमयो देहो नवयोनिसमुद्भवः ।
दशमी योनिरेवैषा पराशक्तिस्तदीश्वरी ॥
यत्पिण्डाण्डं समुत्पन्नं तद्वद्ब्रह्माण्डमुद्भवौ ।
पञ्च भूतानि शाक्तानि मायादीनि शिवस्य तु ॥
माया च शुद्धविद्या च महेश्वरसदाशिवौ ।
पञ्चविंशतितत्त्वानि तत्रैवान्तर्भवन्ति ते ॥
शिवशक्त्यात्मकं विद्धि जगदेतच्चराचरम् ।'

वरील श्लोकात सांगितल्याप्रमाणें शिवशक्तींनीं पिण्डब्रह्माण्ड उत्पन्न केलें आहे पिण्डात नऊ धातु असतात त्यापैकीं ( १ ) त्वचा, ( २ ) रक्त, ( ३ ) मास, ( ४ ) मेद व ( ५ ) अस्थि हे धातु शक्तिमूलक आहेत आणि ( १ ) मज्जा, ( २ ) शुक्र, ( ३ ) प्राण व ( ४ ) जीव हे चार धातु शिवमूलक आहेत पहिले पांच धातु श्रीचक्रातील पांच त्रिकोणानीं दर्शविले असून पुढील चार धातु शिवचक्रानीं दर्शित केले आहेत. अशाप्रकारें नवधातुमय देह शिवशक्तिमूलक आहे ज्याप्रमाणें पिण्ड शिवशक्तिमूलक आहे त्याचप्रमाणें ब्रह्माण्डहि शिवशक्तिमूलक आहे ब्रह्माण्डातील पांच महाभूतें हीं शक्तितत्त्वें असून ( १ ) माया, ( २ ) शुद्धविद्या, ( ३ ) महेश्वर व ( ४ ) सदाशिव ही चार शिवतत्त्वें आहेत ह्या एकंदर नऊ तत्त्वांनीं ब्रह्माण्ड झाले आहे सांख्यप्रक्रियेप्रमाणें जीं पचवीस तत्त्वें मानलीं जातात त्यांचा अंतर्भाव यातच होतो. अशाप्रकारें ब्रह्माण्डांतील नऊ तत्त्वें श्रीचक्रातील शिवशक्तिरूप नऊ चक्रांशीं एकरूप आहेत असे हें चराचर जगत् शिवशक्तिरूप आहे त्या शिवशक्तींचें ऐक्य म्हणजेच श्रीचक्र. म्हणून श्रीचक्र हे पिण्डब्रह्माण्डरूप आहे असें समजून ध्यान करणें हा अंतर्ध्यानाचा दुसरा प्रकार होय.

श्रुतींतहि सांगितलें आहे कीं, हें जगत् अग्निसोमसूर्यात्मक आहे. त्यांचेंहि श्रीचक्राशीं ऐक्य हें रुद्रयामलांतील 'पृश्नयो नाम मुनयः सर्वे चक्रमुपाश्रिताः' या प्रमाणवचनाच्या आधारें दाखविलेंच आहे. थोडक्यांत म्हणजे जगत् हें अग्निसोमसूर्यात्मक, त्रिखण्डात्मक व मातृकाचक्रात्मक असून तें शिवशक्तिरूप आहे. *तैत्तिरीयोपनिषदांत पिण्डब्रह्माण्डांचें* ऐक्य उत्कृष्ट प्रकारें सांगितलें आहे. त्यांत ब्रह्माच्या बाह्य स्वरूपाचे पांच प्रकार सांगितले आहेत. ते असे—

'अधिलोकमधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम् ।'

असें जडजीवसृष्टीच्या आविर्भावाचें वर्णन त्यांत आहे. अशा ब्रह्माचें ध्यानासाठीं अन्न-प्राण-मन-विज्ञान-आनंदमय ब्रह्म जाणले पाहिजे, त्याची उपासना केली पाहिजे. *उपासनेशिवाय ज्ञानप्राप्ति नाहीं असें उपनिषदांत* सांगितले आहे व तोच सिद्धांत त्रिपुरादेवीच्या उपासनेंतहि आहे त्या उपासनेस उपनिषदांत 'तप' असें नांव आहे 'सर्वेषां हि नियतसाध्यविषयाणां साधनानां तप एव साधकतमं साधनमतिप्रसिद्धं लोके।' असें भाष्यकार श्रीशंकराचार्य म्हणतात. वरुणपुत्र भृगु आपल्या वडिलांजवळ जाऊन त्यांना *ब्रह्म म्हणजे काय असें विचारतां झाला तेव्हां वरुणानें त्यास प्रथम अन्नमयब्रह्म* जाण व तें जाणण्यासाठीं तप कर असें सांगितलें त्यानें तप करून अन्नमय ब्रह्म जाणलें पुनः तप करून क्रमाक्रमानें प्राण, मन, विज्ञान व आनंदमय ब्रह्म त्यानें पायरीपायरीनें जाणलें. तें तप म्हणजेच उपासना होय.

'मनसश्चेन्द्रियाणां च ह्यैकाग्र्य परमं तपः।
तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते ॥'

असें स्मृतिवचन आहे मन व इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हेंच परम तप असून तें सर्वधर्मांहून श्रेष्ठ आहे व तोच श्रेष्ठ धर्म आहे असा ह्या वचनाचा आशय आहे. शारीरिक क्लेश करून घेणें, नाकपुड्या धरून श्वास कोंडणें, टाळ वाजवून भजन करणें किंवा माळ धरून जप करणें म्हणजे कांहीं तप नव्हे. उपास्यावर चित्त एकाग्र करणें म्हणजे तप होय. 'तद्धि तपस्तद्धि तपः' असें तैत्तिरीयोपनिषद् सांगतें.

अखिल ब्रह्माण्ड जसें शिवशक्तिरूप आहे तसेंच श्रीचक्रहि शिवशक्ति-रूप आहे ह्याचें विवेचन आतापर्यंत वर केलेंच आहे. तद्वतच वर्णात्मक

मंत्र हेहि शिवशक्तिरूपच आहेत याचें विवरण येथें विस्तारभयास्तव केलें नाहीं. ब्रह्माण्डाशीं व श्रीचक्राशीं त्यांचें ऐक्य दाखवितां येतें.

त्वदीयं सौन्दर्यं तुहिनगिरिकन्ये तुलयितुं
कवीन्द्राः कल्पन्ते कथमपि विरिञ्चिप्रभृतयः ।
यदालोक्यौत्सुक्यादमरललना यान्ति मनसा
तपोभिर्दुष्प्रापामपि गिरिशसायुज्यपदवीम् ॥ १२ ॥

हे पर्वतराजकन्ये भगवति, जें सौंदर्य पाहण्याच्या उत्सुकतेनें देवस्त्रिया तपश्चर्येनें देखील न मिळणारी शिवसायुज्यता मनानें प्राप्त करून घेतात, त्या तुझ्या सौंदर्याची तुलना करण्यांत ब्रह्मदेवप्रभृति कविश्रेष्ठ कसेंतरी समर्थ होतात. ( तुलना करणें हें त्यांच्याहि आटोक्याबाहेरचें आहे ).

टीपा — भगवतीचें सौंदर्य अप्रतिम व अवर्णनीय आहे एवढेंच सांगण्याचा प्रस्तुत श्लोकाचा आशय आहे. श्रीत्रिपुरसुंदरीचें अलौकिक सौंदर्य श्रीशिवच अवलोकन करूं शकतात. तेव्हां तें सौंदर्य अवलोकन करावयाचें असेल तर शिवसायुज्य प्राप्त करून घेणें जरूरीचें आहे. परंतु ती स्थिति खडतर तपश्चर्या केल्याखेरीज शक्य होत नाही; आणि म्हणून देवस्त्रिया फक्त मनानें शिवसायुज्याप्रत पोहोंचतात.

नरं वर्षीयांसं नयनविरसं नर्मसु जडं
तवापाङ्गालोके पतितमनुधावन्ति शतशः ।
गलद्वेणीबन्धाः कुचकलशविस्रस्तसिचया
हठात् त्रुट्यत्काञ्च्यो विगलितदुकूला युवतयः ॥ १३ ॥

हे भगवति, जो मनुष्य म्हातारा, दिसण्यांत कुरूप, प्रेमक्रीडेमध्यें मूर्ख आहे, पण तुझ्या कटाक्षाच्या किरणांचा अनुग्रह ज्याच्यावर झाला आहे अशाच्या मागें शेंकडों स्त्रिया लागतात—त्याच्या मागें धावतांना त्यांचें बुचडे किंवा वेण्या सुटतात, स्तनांवरून पदर सरकतात ( उडतात ), घाईमुळें कंबरपट्टेहि ढिले होतात व नेसलेलीं वस्त्रेंहि निसटतात.

टीपा—'नयनविरस' या शब्दाचा अर्थ 'ज्याची दृष्टि मंद झाली आहे' असा कामसूरीनें दिला आहे. भगवतीच्या कृपाकटाक्षप्रसादाचें वर्णन पंचस्तवींत खालीलप्रमाणें केलें आहे.

'यस्मिन् मनागपि नवाम्बुजपत्रगौरि
गौरि प्रसादमधुरां दृशमादधासि ।
तस्मिन्निरन्तरमनङ्गशरप्रकीर्ण-
सीमन्तिनीनयनसंततयः पतन्ति ॥

क्षितौ षट्पञ्चाशद् द्विसमधिकपञ्चाशदुदके
हुताशे द्वाषष्टिश्चतुरधिकपञ्चाशदनिले ।
दिवि द्विःषट्त्रिंशन्मनसि च चतुःषष्टिरिति ये
मयूखास्तेषामप्युपरि तव पादाम्बुजयुगम् ॥ १४ ॥

हे भगवति, पृथ्वीस्वरूपी मूलाधारचक्रामध्यें छप्पन, जलरूपी द्वितीय चक्रामध्यें बावन्न, अग्निरूपी तृतीय चक्रांत बासष्ट, वायुरूपी चतुर्थ चक्रांत चोपन्न, आकाशरूपी पांचव्या चक्रांत बहात्तर व मनोरूपी सहाव्या चक्रांत चौंसष्ट असें जे किरण आहेत त्यांच्याहि वर तुझें चरणकमलद्वय आहे.

टीपा—या श्लोकांत भगवती कुंडलिनीरूप आहे असें सांगून ती ज्या स्थानांतून प्रवास करते तीं सहा स्थानें सांगितलीं आहेत. भगवतीचें चरण-कमल सहस्रदलचक्रांत मस्तकाच्या ऊर्ध्वभागीं आहेत. त्या चरणांचे किरण कुंडलिनीमार्गानें सहा चक्रांतून खालीं मूलाधारचक्रापर्यंत येतात. पूर्वीच्या एका श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मरंध्रांत असणारी कुंडलिनीरूपी शक्ति सहा चक्रांतून खालीं उतरून मूलाधारचक्ररूपी कुलकुण्डामध्यें साडेतीन वेटोळीं करून सुप्त असते. त्या चक्राचें स्पष्टीकरण प्रस्तुत श्लोकांत केलें आहे. हीं सहा चक्रें म्हणजे मन व पचमहाभूतें ह्यांची निदर्शक आहेत हेंहि पुढील एका श्लोकांत विशद केलें आहे ह्या सहा चक्रांपैकीं पहिलें चक्र म्हणजे सर्वांत खालचें चक्र मूलाधारचक्र होय व तें पृथ्वीतत्त्वाचें आहे. त्याच्या वरील दुसरें चक्र जलतत्त्वाचें असून त्याच्या नामाभिधानांत थोडी भिन्नता आहे. या चक्राचें नांव या स्तोत्रात मणिपूरचक्र असें दिलें असून इतरत्र त्याला स्वाधिष्ठानचक्र असें नाव आहे. पण तिसऱ्या चक्रास स्वाधिष्ठानचक्र असें या स्तोत्रात नाव आहे. नावात भिन्नता असली तरी जल व अग्नि ह्या तत्त्वांत भिन्नता नाहीं हें पूर्वीच दाखविलें आहे. चवथ्या चक्राचें नांव अनाहतचक्र असें असून तें वायुतत्त्वाचें आहे. पाचव्या चक्राचें नांव विशुद्धिचक्र असें असून तें आकाशतत्त्वाचें आहे. सहाव्या चक्राचें नांव

आज्ञाचक्र असें असून तें मनस्तत्त्वाचें आहे. ह्या सहाहि चक्रांवर सहस्रदल कमलचक्र आहे.

श्लोक तेरावरील भाष्यविवरणांत सौभाग्यवर्धिनी टीकाकार म्हणतात कीं, भगवतीच्या अपांगाचा (नेत्रकटाक्षाचा) महिमा सांगितला असून श्लोक चवदामध्यें तिच्या चरणकमलाचा महिमा सांगितला आहे.

या शिवशक्तींचीं दोन प्रकारची स्वरूपें आहेत. शक्तिपुरःसरस्वरूपवर्णनाचें जें तंत्र त्याला पूर्वतंत्र म्हणतात आणि शिवपुरःसरस्वरूपवर्णनाच्या तंत्रास उत्तरतंत्र म्हणतात. त्यांना अनुक्रमें शाक्त व शांभव तंत्र अशींहि नांवें आहेत. शांभवामध्यें शिवशक्तीच्या तेजानें उत्पन्न झालेल्या देवतांना आवरणदेवता म्हणतात. त्यांना 'रश्मि' (किरण) असेंहि नांव आहे. शांभवतंत्र सहा प्रकारें विस्तार पावलें आहे. त्यांना अन्वय म्हणतात; म्हणजे शांभवतंत्र षडन्वयात्मक आहे. तें अन्वय असे—(१) मानस, (२) नाभस, (३) वायव्य, (४) तैजस, (५) आप्य व (६) पार्थिव. ह्या शिवरूपांतून शक्तिरूप कुंडलिनी खालीं प्रकट होते. निर्गुण शिवाला प्रपंच उत्पादन करण्याची इच्छा होते, म्हणजे तो सगुण होतो. ही आदिशक्ति होय. ही आदिशक्ति ह्यामध्यें ब्रह्मरंध्रादि भ्रूमध्यान्त अंतर्व्यापिनी असते. तिला मज्जाधातूची अधिदेवता म्हटलें आहे. पुढें त्या पराशक्ति अधिदेवतेपासून क्रमानें पांच देवता उत्पन्न होतात. इच्छा, ज्ञान, क्रिया, कुंडलिनी व मातृका या त्या देवता होत. त्यांचीं अनुक्रमें आकाश, वायु, तेज, जल, व भूमि हीं तत्त्वें आहेत. कुंडलिनीमार्गांतील हीं स्थानें असून तीं अनुक्रमें कंठ, हृदय, नाभि, लिंग व गुदाचा ऊर्ध्वविभाग अशीं पांच स्थानें आहेत. त्यांचीं नांवें अनुक्रमें विशुद्धिचक्र, अनाहतचक्र, मणिपूरचक्र, स्वाधिष्ठानचक्र व मूलाधारचक्र अशीं आहेत. ह्या चक्रांतील शक्तिरूप देवता त्वक्, असृक्, मांस, मेद व अस्थि ह्या पदार्थांच्या म्हणजे धातूंच्या आहेत. या उपरोक्त देवतांकडून सचराचर विश्वाची उत्पत्ति होते. ह्या पांच देवतांपैकीं कुंडलिनी व मातृका या दोघींना बहिणी असें म्हटलें आहे. ह्याप्रमाणें सहा अन्वयांतून भगवतीच्या चरणकमलाचे किरण सर्वत्र पसरले आहेत. ते किरण कोणत्या स्थानीं किती आहेत हें प्रस्तुतच्या चवदाव्या श्लोकांत सांगितलें आहे.

प्रथम पृथ्वीतत्त्वांत छप्पन्न किरण असल्याचें सांगितलें आहे. हे छप्पन्न किरण शिवशक्तिरूप आहेत. विश्वांत पार्थिवतत्त्वें एकंदर अठ्ठावीस आहेत. तीं अशीं–पांच *तन्मात्रा ( शब्दस्पर्शरूपरसगंध )*, पांच *महाभूतें* ( पृथ्वी, आप्, तेज, वायु व आकाश ), पाच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, चार *अंतःकरणें ( अंतःकरणचतुष्टय )*, काल, प्रकृति, पुरुष व महत्तत्त्व. अशीं हीं अठ्ठावीस तत्त्वें शिवशक्तींच्या योगानें छप्पन्न होतात.

जलतत्त्वें एकूण सव्वीस आहेत. तीं अशीं – पांच महाभूतें, पांच ज्ञानेंद्रियें, त्यांचीं पांच कार्ये, पांच कर्मेंद्रियें, त्यांचीं पांच कार्यें व मन. हीं सव्वीस तत्त्वें शिवशक्तींच्या योगानें बावन्न होतात.

अग्नितत्त्वें एकूण एकतीस आहेत. पांच महाभूतें, पांच तन्मात्रा, पांच ज्ञानेंद्रियें, त्यांचीं पांच कार्यें, पांच कर्मेंद्रियें, त्यांची पांच कार्यें व मन हीं *एकतीस तत्त्वें शिवशक्तियोगानें बासष्ट होतात.*

वायुतत्त्वें सत्तावीस आहेत. वर पार्थिवतत्त्वे जीं अठ्ठावीस सांगितलीं आहेत, त्यांतील महत्तत्त्व वगळल्यास बाकीची सत्तावीस वायुतत्त्वें होत. हीं शिवशक्तियोगानें चोपन्न होतात.

आकाशतत्त्वें छत्तीस आहेत. तीं अशीं—( १ ) शिव, ( २ ) शक्ति, ( ३ ) सदाशिव, ( ४ ) ईश्वर, ( ५ ) शुद्धविद्या, ( ६ ) माया, ( ७ ) कला, ( ८ ) विद्या ( ९ ) राग, ( १० ) काल, ( ११ ) नियति, ( १२ ) पुरुष, ( १३ ) प्रकृति, ( १४ ) अहंकार, ( १५ ) बुद्धि, ( १६ ) मन, ( १७ – २१ ) पांच ज्ञानेंद्रियें, ( २२ – २६ ) पाच कर्मेंद्रियें, ( २७ – ३१ ) पांच तन्मात्रा ( ३२ – ३६ ) पांच महाभूतें, हीं शिवशक्तियोगें बहात्तर होतात

मानसतत्त्वें बत्तीस आहेत. वर जीं छत्तीस आकाशतत्त्वें सांगितलीं आहेत, त्यांतील पहिलीं चार ( शिव शक्ति–सदाशिव–ईश्वर ) वगळल्यास बाकीचीं बत्तीस हीं मानसतत्त्वें होत तीं शिवशक्तियोगानें चौसष्ट होतात.

या सर्वांना भगवतीचें चरणकिरण म्हटलें आहे. हीं सर्व मिळून एकंदर तीनशेंसाठ होतात

ह्या षट्चक्रांचें पुनः तीन विभाग केले आहेत त्यांना खण्ड असें म्हणतात. मूलाधार व स्वाधिष्ठान ह्यांचा प्रथमखण्ड, मणिपूर व अनाहत यांचा द्वितीयखण्ड आणि विशुद्धि व आज्ञा ह्यांचा तृतीयखण्ड होय.

प्रथमखण्डाच्या वरील भागास अग्निस्थान आहे, त्यास रुद्रग्रंथि म्हणतात. द्वितीयखण्डावर सूर्यस्थान आहे, त्यास विष्णुग्रंथि म्हणतात. आणि तृतीयखण्डावर चंद्रस्थान आहे, त्यास ब्रह्मग्रंथि म्हणतात.

अशाप्रकारें कुंडलिनीमार्ग हा समग्र ब्रह्माण्डाचें दर्शन घडवितो. या ब्रह्माण्डांत तीन स्थानें आहेत. भू, अंतरिक्ष व द्यु हीं तीं स्थानें असून त्यांच्या देवता अग्नि, सूर्य व चंद्र ह्या आहेत. ह्याच तीन देवता रुद्र, विष्णु व ब्रह्म या तीन ग्रंथींच्याहि आहेत. ह्याप्रमाणें कुंडलिनीमार्ग विश्वाचें प्रतीक आहे. ब्रह्माण्डाला ज्याप्रमाणें सूर्य, सोम व अग्नि ह्या देवतात्रय प्रकाशित करतात, त्याप्रमाणें देहांतल्या कुंडलिनीमार्गातील त्रिखण्डांच्या आधिपत्यामुळें याच देवता देहालाहि प्रकाशित करतात. हेंच सोप्या व साध्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास असें सांगतां येईल कीं, जो योगी पुरुष ह्या कुंडलिनीमार्गानें योगध्यान करून भगवतीच्या चरणकिरणांचें दर्शन करीत भगवतीच्या चरणांपाशीं ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचतो, त्याला ह्या निखिल विश्वाचेंहि ज्ञान होतें. ह्याच आशयाचा एक श्लोक अंबास्तवांत आहे तो असा—

‘भूमौ निवृत्तिरुदिता पयसि प्रतिष्ठा
विद्यानले मरुति शान्तिरतीतशान्तिः।
व्योम्नीति याः किल कलाः कलयन्ति विश्वं
तासां हि दूरतरमम्ब पदं त्वदीयम् ॥’

प्रस्तुत श्लोकांत पांच चक्रांतील शक्तींचीं नांवें वेगळीं दिलीं आहेत तीं अशीं—१ भूमिस्थानांत निवृत्ति, २ जलस्थानांत प्रतिष्ठा, ३ अग्निस्थानांत विद्या, वायुस्थानांत शान्ति व ५ आकाशस्थानांत अतीतशान्ति. ह्या रूपांनीं शक्ति ही विश्वांत प्रगट झाली आहे. पण शक्तीचें पद म्हणजे स्थान त्यांच्याहून अतिशय दूर आहे.

मन इत्यादि सहा स्थानरूपांनीं भगवती परिणत झाली आहे व प्रत्येक स्थानांत एकेक विशिष्ट रूप आहे, असें छत्तीसपासूनच्या पुढील श्लोकांत सांगितलें आहे. पण त्यांत एक फरक दिसतो. त्या सहा श्लोकांत ( श्लोक ३६ ते ४१ ) शिवशक्तींचीं जीं नांवें सांगितलीं आहेत तीं अगदीं वेगळीं आहेत. त्यांचें विवेचन त्या त्या श्लोकांच्या खालीं टीपेंत केलेलेंच आहे, तें पाहावें म्हणजे ध्यानांत येईल.

भगवतीच्या चरणांचे किरण तीनशें साठ आहेत. त्याचें स्पष्टीकरण असें—

'तद्भासा रहितं किंचिन्न च यच्च प्रकाशते।
तस्याश्च शिवशक्तेश्च चिद्रूपायाश्रितं विना॥
आन्ध्यमापद्यते नूनं जगदेतच्चराचरम्।
तेषामनन्तकोटीनां मयूखानां महेश्वरि॥
मध्ये षष्ट्युत्तरं देवि त्रिशतं किरणाः शिवे।
ब्रह्माण्डं व्यश्नुवानास्ते सोमसूर्यानलात्मना॥
अग्नेरष्टोत्तरशतं षोडशोत्तरकं रवेः।
षट्त्रिंशदुत्तरशतं चन्द्रस्य किरणाः शिवे॥
ब्रह्माण्डं भासयन्तस्ते पिण्डाण्डमपि शांकरि।
दिवा सूर्यस्तथा रात्रौ सोमो वह्निश्च संध्ययोः॥
प्रकाशयन्तः कालांस्ते तस्मात्कालात्मकास्त्रयः।
षष्ट्युत्तरं च त्रिशतं दिनान्येव तु हायने॥'

कामेश्वरसूरीनें आपल्या अरुणामोदिनीटीकेंत वरील श्लोक उद्धृत केले आहेत. ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विश्व हें अग्नि सूर्य व चंद्र ह्या त्रयीनें बनलेलें आहे. ह्या श्लोकांत सांगितलेल्या कला ह्या अग्नि, सूर्य व सोमाच्या असून त्या सर्व मिळून तीनशेंसाठ होतात. पहिल्या दोन चक्रांत सांगितलेल्या कलांची बेरीज एकशेंसाठ होते. त्या अग्नीच्या कला आहेत. तिसऱ्या व चवथ्या चक्रांतील मिळून एकशेंसोळा कला होतात त्या सूर्याच्या आहेत. आणि पांचव्या व सहाव्या चक्रांतील कलांची बेरीज एकशेंछत्तीस होते. त्या चंद्राच्या कला आहेत. अशा प्रकारें भगवतीच्या चरणांनीं हें विश्व नटलेलें आहे.

कांहीं टीकाकार दुसरा एक अर्थ देतातः कालतत्त्व हें भगवतीच्या विश्वात्मकरूपाप्रमाणें एकरूप आहे. ह्या कालतत्त्वाच्या गणनेला चंद्राच्या तिथींचा उपयोग करतात. चंद्राच्या बारा प्रदक्षिणांनीं एक वर्ष पूर्ण होतें. त्यास चांद्रवर्ष म्हणतात. एक महिन्याच्या तिथी तीस, म्हणून बारा महिन्यांच्या एकूण तीनशेंसाठ तिथी होतात. श्लोकांत उद्धृत केलेले तीनशेंसाठ किरण म्हणजे चांद्रवर्षाच्या तीनशेंसाठ तिथी होत. याप्रमाणें

भगवती ही कालात्मक म्हणजे कालरूप असून तिचे चरणकिरण हे तिथिरूप आहेत.

आणखीहि एक अर्थ खालीलप्रमाणें लावतातः वर्षमानाचे सहा ऋतु आहेत. श्लोकांत उल्लेखिलेलीं सहा चक्रें किंवा सहा तत्त्वें म्हणजे हे सहा ऋतु असून त्यांपैकीं प्रथमचक्र वसंतऋतु. त्याचे दिवस छप्पन्न. द्वितीयचक्र ग्रीष्मऋतु. त्याचे दिवस बावन्न. तिसरें चक्र वर्षाऋतु. त्याचे दिवस बासष्ट. चवथें चक्र शरदृऋतु. त्याचे दिवस चोपन्न. पांचवें चक्र हेमन्तऋतु. त्याचे दिवस वहात्तर आणि सहावें चक्र शिशिरऋतु असून त्याचे दिवस चौसष्ट आहेत. या दिवसांची एकूण बेरीज तीनशेंसाठ होते. कालमानाचे हे विभाग म्हणजे भगवतीचे चरणकिरण आहेत.

कैवल्याश्रमानें आपल्या सौभाग्यवर्धिनीटीकेंत प्रत्येक चक्रांतील सर्व किरणांचा नामोल्लेख अन्यप्रकारें केला आहे. पण विस्तारभयास्तव येथें ती नामावली न देतां नुसता निर्देशच केला आहे. जिज्ञासूंनीं ती मूळ टीकेंत पाहावी.

भगवती त्रिपुरसुंदरीचे जे अनेक मंत्र आहेत त्यांपैकीं एकास पंचदशी व दुसऱ्यास षोडशी म्हणतात. पंचदशीमंत्रानें चंद्राच्या पंधरा तिथींचें ज्ञान होतें. भगवती जशी शिवाची अर्धांगी आहे तशीच शिवानें मस्तकावर धारण केलेली चंद्रकला ही भगवतीरूपच आहे. ती चंद्रकला तिथिरूप पंधरा कलांची निदर्शक आहे. त्या पंधरा कला पंचदशीमंत्रानें दर्शित होतात. चंद्राची सोळावी कला अदृश्य आहे. जसा अदृश्य परमशिव शिवशक्तिरूपानें प्रकट होतो, किंवा जसे शब्दातीत निर्गुण ब्रह्म शब्दाख्येय सगुण ब्रह्मरूपानें म्हणजे नाम, रूप व जीव या रूपानें प्रकट होतें तशी अदृश्य सोळावी चंद्रकला दृश्य पंधरा कलांचीं रूपें धारण करून प्रगट होते. षोडशीमंत्रात हीं नांवें दर्शित करते त्याच्या सोळा कला आहेत व त्याचे तीनशेंसाठ किरण आहेत.

सृष्टीमध्यें भिन्न भिन्न प्रकारें तीन तीन तत्त्वें आहेत. उदाहरणार्थ, त्रिगुण म्हणजे सत्त्व, रजस् व तमस् हे गुण; क्रियात्रय म्हणजे सृष्टि, स्थिति व लय ह्या क्रिया; देवतात्रय म्हणजे ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या तीन देवता. श्लोकांतील सहा तत्त्वें वा सहा चक्रें वरील तीन त्रयींत विभागलीं आहेत. म्हणजे पहिलीं दोन चक्रें, सृष्टिक्रिया व रजोगुण यांनीं युक्त असून तीं ब्रह्मा-

देवतेचीं आहेत. पुढील दोन चक्रें, स्थितिक्रिया व सत्त्वगुण यांनीं युक्त असून तीं विष्णुदेवतेचीं आहेत. आणि पुढील दोन चक्रें, लयक्रिया व तमोगुण यांनीं युक्त असून तीं रुद्रदेवतेचीं आहेत ब्रह्मदेव सृष्टिकर्ता, विष्णु पालनकर्ता व रुद्र हा संहारकर्ता आहे हें सर्वविश्रुतच आहे. रजस्, सत्त्व व तमस् हे त्यांचेच अनुक्रमें गुण आहेत.

दरभंग्याच्या राजकुलांतील श्रीश्यामानदांनीं सौंदर्यलहरी तथा आनद-लहरीचें जें हिंदी विवरण केलें आहे त्यांत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, स्वामी अच्युतानंदाच्या सिद्धांताप्रमाणें श्लोकांतील मयूख शब्दाचा अर्थ मातृकापर लावतां येतो. ह्या पन्नास मातृकाचा भिन्न भिन्न समूह श्लोकात सांगितलेल्या षट्तत्त्वरूपी षटचक्रामध्यें वेगवेगळ्या संख्येंत परिगणनात्मक आहेत ते असे—

( १ ) प्रथमचक्रांत असलेल्या पृथ्वीतत्त्वाचे छप्पन्न किरण म्हणजे पन्नास मातृका व ऐं, ऱ्हीं, श्रीं, ऐं, क्लीं, सौः हीं सहा बीजाक्षरें आहेत.

( २ ) द्वितीयचक्रांत जलतत्त्वाचें बावन्न किरण म्हणजे पन्नास मातृका आणि सौं व श्रीं ही दोन बीजाक्षरें.

( ३ ) तृतीयचक्रात अग्नितत्त्वाचें बासष्ट किरण म्हणजे पन्नास मातृका आणि ओम् तीन वेळा, ऱ्हीं एक वेळ आणि हं व सः हीं दोन बीजें प्रत्येकीं चार वेळा.

( ४ ) चतुर्थचक्रात वायुतत्त्वाचें चोपन्न किरण म्हणजे पन्नास मातृका आणि यं, र, ल, व हीं चार बीजें.

( ५ ) पाचव्या चक्रात आकाशतत्त्वाचें बहात्तर किरण म्हणजे अपासून औपर्यंतच्या चवदा स्वरांची पाच वेळां आवृत्ति आणि ऐ व ऱ्हीं हीं दोन बीजाक्षरें

( ६ ) सहाव्या चक्रात मनस्तत्त्वाचें चौसष्ट किरण म्हणजे सोळा स्वरांची चतुरावृत्ति होय.

ज्योतिःस्वरूप शिवशक्तीचे किरण अनत असल्यानें ब्रह्माण्डेंहि अनत आहेत. म्हणून ललितासहस्रनामांत भगवतीला 'अनन्तकोटिब्रह्माण्डजननी' असें म्हटलें आहे. भगवती ही 'दिव्यप्रकाशमानविग्रहा' आहे तिच्या चरण-कमलापासून निघणारे किरणहि अनंत असून त्यांतील मर्यादित रूपानें तीनशें-

साठ किरणांनीं आपलें विश्व बनलें आहे. अशी भावना ठेवून भगवतीचें ध्यान करणें हा आपला उच्च व उदात्त धर्म असल्याचें ह्या श्लोकाचें तात्पर्य आहे.

हीं षट्तत्त्वें श्रीचक्राशीं एकरूप आहेत. श्रीचक्राचे नऊ भाग आहेत. ते पुढील श्लोकांत उद्धृत केले आहेत—

' बिन्दुत्रिकोणवसुकोणदशारयुग्म-
मन्वस्रनागदलसंयुतषोडशारम् ।
वृत्तत्रयं च धरणीसदनत्रयं च
श्रीचक्रराजमुदितं परदेवतायाः ॥ '

या श्लोकाचा भावार्थ असा– (१) बिंदु, (२) त्रिकोण, (३) अष्टकोण, (४) दशकोण, (५) दुसरा दशकोण, (६) चतुर्दशकोण, (७) अष्टदलचक्र, (८) षोडशदलचक्र, ह्या चक्राबाहेर तीन वर्तुळे व (९) त्रिरेखात्मक भूपुर.

यांतील प्रथम बिंदु सोडला तर वृत्तत्रयाची चक्रांत गणना करावी. अशा प्रकारें श्रीचक्र नवविभागात्मक असून तें भगवतीचें प्रतीक आहे. म्हणून त्यामध्येंहि प्रस्तुत श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व तत्त्वें व सर्व किरण आहेत. मात्र त्याची विभागणी भिन्नप्रकारें केली आहे. त्यांतील सर्वांत बाहेरील भूपुर असून त्याचें नांव त्रैलोक्यमोहन असें आहे. त्याच्या आंतील षोडशदल सर्वशापरिपूरकचक्र आहे त्याच्या आंतील तिसरें चक्र सर्वसंक्षोभणचक्र होय. त्याच्या आतील चतुर्थचक्र सर्वसौभाग्यदायकचक्र होय. त्याच्या आंतील पांचवें सर्वार्थसाधकचक्र असून, त्याच्या आंतील सहावें सर्वरक्षाकरचक्र होय. त्याच्या आंतील सातवें सर्वरोगहरचक्र असून, त्याच्या आंतील आठवें सर्वसिद्धिप्रदचक्र होय. आणि त्याच्या आंतील नववें सर्वानंदमयचक्र आहे. श्रीचक्राचें नऊ विभाग नित्याषोडशिकार्णवांत पुढीलप्रमाणें दिले आहेत—

' मध्य त्र्यस्र तथाष्टारं द्वे दशारे चतुर्दश ॥
तद्बाह्यतोऽष्टपत्रं च षोडशार महीपुरम् ।
सर्वानन्दमय चादौ सर्वसिद्धिप्रदं परम् ॥
सर्वरोगहरं चान्यत्सर्वरक्षाकरं तथा ।
सर्वार्थसाधकं चक्रं सर्वसौभाग्यदायकम् ॥

सर्वसंक्षोभणं चान्यत्सर्वाशापरिपूरकम् ।
त्रैलोक्यमोहनं चेति नवधा नवभिर्भवेत् ॥'

या नवचक्रांत तीनशेंसाठ किरण असून ते शिवशक्तिरूपानें दोन प्रकारचें आहेत. म्हणजे एकशेंऐंशी शिवरूप असून एकशेंऐंशी शक्तिरूप आहेत. यांपैकीं शक्तिरूप किरणांचीं एकशेंऐंशी नांवें भगवती त्रिपुरसुन्दरीच्या खड्गमालानामक स्तोत्रांत आलेलीं आहेत. तींच नांवें शिवरूपानेंहि एकशें-ऐंशी होतात.

अशाप्रकारें भिन्न भिन्न रीतींनीं प्रस्तुत श्लोकाचा भगवतीच्या उपासनेशीं समन्वय करतां येतो. सारांश भगवती ही श्रीचक्ररूपानें उपास्य असून हें श्रीचक्र अखिल विश्वाचें प्रतीक आहे. विश्वात्मक भगवतीची उपासना केल्यानें साधक हा भगवतीच्या चरणांपाशीं पोहोंचतो हें पुढील पंधराव्या श्लोकांत सांगितलें आहे. सप्तशतीमध्यें भगवतीचें पुढीलप्रमाणें विश्वात्मक वर्णन आहे—

'विश्वेश्वरीं जगद्धात्रीं स्थितिसंहारकारिणीम् ।
निद्रां भगवतीं विष्णोरतुलां तेजसः प्रभुः ॥'
'त्वयैतद्धार्यते विश्वं त्वयैतत्सृज्यते जगत् ।
त्वयैतत्पाल्यते देवि त्वमत्स्यन्ते च सर्वदा ॥'
'सृष्टिस्थितिविनाशानां शक्तिभूते सनातनि ।
गुणाश्रये गुणमये नारायणि नमोऽस्तु ते ॥'
'विश्वेश्वरि त्वं परिपासि विश्वं
विश्वात्मिका धारयसीति विश्वम् ।
विश्वेशवन्द्या भवती भवन्ति
विश्वाश्रया ये त्वयि भक्तिनम्राः ॥'

भगवद्गीतेंतल्या अकराव्या अध्यायांत भगवंतांनीं अर्जुनास जें विश्वरूपदर्शन दिलें त्याचें स्पष्टीकरण करतांना विश्वांतील सर्व तत्त्वें मद्रूपच आहेत असें म्हटलें आहे. तसेंच सातव्या अध्यायांतहि भगवान् म्हणतात कीं,—

'भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ '

म्हणजे पंचमहाभूतें, मन, बुद्धि आणि अहंकार मिळून आठ प्रकारें विभागलेली ही माझी प्रकृति आहे. ही अपरा प्रकृति. शिवाय जिनें या जगाचें धारण होतें अशी परा म्हणजे श्रेष्ठ प्रतीची जीवस्वरूपी दुसरी प्रकृति आहे. अशाप्रकारें जगत् हें भगवंताच्या परा व अपरा प्रकृतींनीं अन्वित आहे.

शरज्ज्योत्स्नाशुभ्रां शशियुतजटाजूटमुकुटां
वरत्रासत्राणस्फटिकघुटिकापुस्तककराम् ।
सकृन्नत्वा न त्वां कथमिव सतां संनिदधते
मधुक्षीरद्राक्षामधुरिमधुरीणा भणितयः ॥ १५ ॥

शरदृतूंतील चांदण्याप्रमाणें पांढरें शुभ्र व चंद्रानें युक्त असा जटाजूट धारण केलेल्या आणि हातांत वरमुद्रा, स्फटिकमाला व पुस्तकें धारण केलेल्या तुला एक वेळ नमस्कार करून कविश्रेष्ठांनीं उच्चार केलेली बोलणीं ( वाङ्मय ) मध, दुधाची खीर व द्राक्षें यांच्यासारखीं मधुर कशी होणार नाहींत ? ( खात्रीनें होणारच ).

टीपा—उपरोक्त चवदाव्या श्लोकात भगवतीच्या चरणमहिम्याचे वर्णन झालें. आतां भगवतीचें ध्यान बीजाक्षरांनी केले असतां कसें उत्तम फळ मिळतें तें ह्या पंधराव्या श्लोकापासून वर्णिले आहे. यांत वाग्भवकूटाच्या सात्त्विक ध्यानासंबंधीं सांगितले आहे वाग्भवकूटाचे सात्त्विक ध्यान जे करतात, त्यांच्या ठिकाणीं सुंदर कवित्वबीज अंकुरित होतें. वाग्देवतारूप भगवतीला एकदांच नमस्कार केल्यानें कवित्वशक्ति प्राप्त होते अशाच अर्थाचे इतरत्र आलेले पुढील श्लोक पाहा—

' यः स्फटिकाक्षगुणपुस्तककुण्डिकाढ्या
व्याख्यासमुद्यतकरां शरदिन्दुशुभ्राम् ।
पद्मासनां च हृदये भवतीमुपास्ते
मातः स विश्वकवितार्किकचक्रवर्ती ॥ ' ( अम्बास्तव )

'वामे पुस्तकधारिणीमभयदां साक्षस्रजं दक्षिणे
भक्तेभ्यो वरदानपेशलकरां कर्पूरकुन्दोज्ज्वलाम् ।
उज्जृम्भाम्बुजपत्रकान्तनयनस्निग्धप्रभालोकिनीं
ये त्वामम्ब न शीलयन्ति मनसा तेषां कवित्वं कुतः ॥' (लघुस्तव)

'वन्दे वाग्भवमन्दवात्मसदृशं वेदादिविद्यागिरो
भाषा देशसमुद्भवाः पशुगताच्छन्दांसि सप्त स्वरान् ।
तालान् पञ्च महाध्वनीन्प्रकटयत्यात्मप्रकाशेन यत्
तद्बीजं पदवाक्यमानजनकं श्रीमातृके ते परम् ॥' ( शक्तिमहिम्न )

**कवीन्द्राणां चेतःकमलवनबालातपरुचिं**
**भजन्ते ये सन्तः कतिचिदरुणामेव भवतीम् ।**
**विरिञ्चिप्रेयस्यास्तरुणतरशृङ्गारलहरी-**
**गभीराभिर्वाग्भिर्विदधति सतां रञ्जनममी ॥ १६ ॥**

मोठमोठ्या कवींच्या हृदयकमलाच्या समूहांना विकसित करणाऱ्या उदयकालीन सूर्याच्या अरुणकांतीनें युक्त अशा भगवतीचें जे विद्वान भजन करतात, ते ब्रह्मदेवाची पत्नी जी सरस्वती तिच्या शृंगारलहरीयुक्त गभीर वाणीनें सज्जनांचें मन प्रसन्न करतात

टीका – या श्लोकांत वाग्भवकूटाच्या राजस ध्यानाचें माहात्म्य वर्णिलें आहे अरुणवर्णा भगवतीचें ध्यान केल्यानें शृंगाररसप्रधान वाग्विलास प्रवृत्त होतो अशाच अर्थाचा वामकेश्वरतन्त्रांतील पुढील श्लोक आहे —

'अरुणाख्या भगवतीमरुणाभां विचिन्तयेत् ।
पाशाङ्कुशधरां देवीं धनुर्बाणधरां शिवाम् ॥
वरदाभयहस्तां च पुस्तकाक्षस्रगन्विताम् ।
अष्टबाहुं त्रिनयनां खेलन्तीममृताम्बुधौ ॥
स करोत्येव शृङ्गाररसास्वादनलम्पटान् ।
सभासदः सदा सर्वान् साधकेन्द्रः सभास्थले ॥'
सवित्रीभिर्वाचां शशिमणिशिलाभङ्गरुचिभि
र्वशिन्याद्याभिस्त्वां सह जननि संचिन्तयति यः ।

सवित्रीभिर्वाचा शशिमणिशिलाभङ्गरुचिभि-
र्वशिन्याद्याभिस्त्वा सह जननि संचिन्तयति यः ।
स कर्ता काव्यानां भवति महतां भङ्गिरुचिभि-
र्वचोभिर्वाग्देवीवदनकमलामोदमधुरैः ॥ १७ ॥

हे जननि, चन्द्रकान्त रत्नाच्या खड्यासारख्या सुंदर असणाऱ्या वशिनी, कामेश्वरी इत्यादि अष्टशक्तींसहित जो तुझें चिंतन करतो तो सुप्रसिद्ध कवींच्या काव्यरचनेप्रमाणें मनोहर आणि सरस्वतीच्या मुखकमलाच्या सुगंधाप्रमाणें मधुर अशा वाग्रचनेनें युक्त काव्य करणारा असा होतो.

टीका—ह्या श्लोकात 'वशिन्याद्याभिस्त्वा' या शब्दांनीं भगवतीच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे भगवतीच्या आठ शक्ती आहेत त्या अशा—

१ वशिनी, २ कामेश्वरी, ३ मोदिनी, ४ विमला, ४ अरुणा, ५ जयिनी, ७ सर्वेश्वरी व ८ कौलिनी खड्गमालेंत याचा उल्लेख आलेला आहे ह्या अष्टशक्ति वर्णात्मक आहेत वर्ण संख्येनें पन्नास आहेत या वर्णांचे म्हणजे मातृकांचे आठ वर्ग आहेत अकरादि सोळा स्वर, कवर्ग, चवर्ग, टवर्ग, तवर्ग, पवर्ग, यवर्ग आणि शवर्ग अशीं त्या वर्गांचीं नावें आहेत या वर्गांच्या वशिनी इत्यादि उपरोक्त आठ अधिष्ठात्री देवता आहेत भगवती त्रिपुरा ही समस्तवर्णात्मिका आहे कालिदासानें रघुवंशाच्या प्रथम सर्गांत आरंभीं जें 'वागर्थाविव' इ श्लोकानें शिवशक्तीचें वर्णन केलें आहे तेथें वाक् म्हणजे पञ्चाशद्वर्णात्मिका शक्ति जाणावी भर्तृहरीनें आपल्या वाक्यपदीय या व्याकरणविषयक ग्रंथारंभीच्या श्लोकात म्हटले आहे कीं, परमशिवरूप निर्गुण ब्रह्म शब्दब्रह्मरूपाने सगुण होतें आणि नतर तें शब्द-ब्रह्म अर्थरूपानं परिणत होतें येथेंहि कालिदासानें सांगितलेलाच अर्थ विवक्षित आहे सगुण ब्रह्म म्हणजे शब्दब्रह्म म्हणजेच पञ्चाशत् वर्ण होत तें अर्थरूपानें परिणत होतात. म्हणजे ही वर्णमाला जगद्रूपी अर्थाला व्यक्त करणारी आहे वर्णमाला ही जगातील मूलभूत घटक किंवा निखिल तत्त्वाचीं द्योतक किंवा प्रकाशक आहे याप्रमाणें विश्वरूपिणी भगवती त्रिपुरसुन्दरी अष्टवर्गात्मिका वशिन्यादि अष्टशक्तींनीं युक्त आहे भगवतीचें हें अष्टवर्गात्मक स्वरूप श्रीचक्रांत दाखविलें आहे श्रीचक्रामध्यें शिवात्मक चार चक्रें आहेत तीं बिन्दुत्रिकोण, अष्टदलपद्म, षोडशदलपद्म व भूपुर अशीं आहेत. तसेंच

श्रीचक्रात चार शक्तिचक्रें आहेत अष्टकोन, दोन दशकोन व चतुर्दशकोन हीं तीं चार शक्तिचक्र होत यांत अष्टवर्गात्मक मातृका विभागलेल्या आहेत अवर्ग, कवर्ग, चवर्ग व टवर्ग हे वर्ग शिवचक्रात असून, तवर्ग, पवर्ग, यवर्ग व शवर्ग हे वर्ग शक्तिचक्रात आहेत हे लक्ष्मीधरानें आपल्या टीकेत दिले असलें तरी तें सयुक्तिक नाहीं असें वाटते ही अष्टवर्गात्मक मातृका वशिन्यादि योगिनींनीं समन्वित आहे लक्ष्मीधरटीकेत या शक्तींचें स्वरूपवर्णन आलें असून ह्या विश्वात अष्टयोगिनींचीं जीं स्थानें आहेत त्यांचेंहि वर्णन त्यांत दिले आहे पण त्यांचा निर्देश येथे विस्तार भयास्तव केला नाहीं हें वर्णन सनत्कुमारसंहितेत आहे असाहि उल्लेख लक्ष्मीधरानें आपल्या टीकेत केला आहे

काहीं टीकाकाराच्या मतें स्वरमातृकाचा वर्ण स्फटिकासारखा शुभ्र आहे कचटतप या पंचवर्गांतील मातृकाचा वर्ण पोवळ्यासारखा तांबूस आहे य ते ह पर्यंतच्या मातृकाचा वर्ण पीत असून क्षचा वर्ण तांबडा आहे अन्य मताप्रमाणें स्वर धूम्रवर्ण असून क ते ठ पर्यंतचे बारा वर्ण सिंदुरवर्णाचे आहेत, ड पासून फ पर्यंतचे शुभ्रवर्ण आहेत, पुढील ब ते ल पर्यंतच्या सहा वर्णांचा रंग गुलाबी आहे, आणि व, श, ष, स ह्या चार वर्णांचा रंग सोन्यासारखा पिवळा असून ह व क्ष ह्यांचा रंग वीजेसारखा पिवळसर आहे लक्ष्मीधराचे मत वर्णमालेंतील मातृकाचे सांगितलेले हे रंग शंकराचार्यांना संमत आहेत ह्या सर्वांचें विस्तरश वर्णन लक्ष्मीधरानें गौडपादाचार्यांच्या सुभगोदयकाव्याच्या टीकेत केले आहे शक्तिकूटाची अधिष्ठात्री देवता असलेल्या ज्ञानशक्तीच्या रूपांत भगवतीचें ध्यान केल्यास काय फल मिळतें याचें वर्णन प्रस्तुत श्लोकात आलें आहे

तनुच्छायाभिस्ते तरुणतरणिश्रीसरणिभि-
र्दिवं सर्वामुर्वीमरुणिमनिमग्नां स्मरति यः ।
भवन्त्यस्य त्रस्यद्वनहरिणशालीननयनाः
सहोर्वश्या वश्याः कति कति न गीर्वाणगणिकाः ॥ १८ ॥

भ्यालेल्या हरिणाप्रमाणें चचल डोळे असलेल्या उर्वश्यादि असख्य स्वर्गीय अप्सरा वश होणार नाहींत काय ?

टीपा—यापूर्वीच्या दोन श्लोकात वाग्भवकूटाच माहात्म्य वर्णिले आहे आता ह्या श्लोकात कामराजकूटाच्या माहात्म्याचें वर्णन आहे ऊर्वशी ही सर्वात सुदर अप्सरा असल्याच वर्णन पुराणातरीं आढळतें इतर अप्सराच्या गर्वाचा भग करण्याकरिता नरनारायणापैकी नरानें एक सुदर स्त्री आपल्या ऊरु म्हणजे माडीपासून निर्माण केल्यानें तिचें नाव ऊर्वशी आहे याच अर्थाचा एक श्लोक कांहीं टीकाकारानीं उद्धृत केला आहे तो असा—

'यावकाब्धौ निमग्ना यो दिव भूमिं विचिन्तयेत् ।
तस्य सर्वा वश यातास्त्रैलोक्यवनिता द्रुतम् ॥'

लघुस्तवातहि या आशयाचा श्लोक आहे तो असा—

'ये सिन्दूरपरागपुञ्जपिहिता त्वत्तेजसा द्यामिमा–
मुर्वी चापि विलीनयावकरसप्रस्तारमग्नामिव ।
पश्यन्ति क्षणमप्यनन्यमनसस्तेषामनङ्गज्वर
क्लान्तास्त्रस्तकुरङ्गशावकदृशो वश्या भवन्ति स्त्रिया. ॥'

शक्तिमहिम्नातहि कामराजमाहात्म्याचे पुढील श्लोक आहेत—

'मात्रा यात्र विराजतेऽतिविशदा तामष्टधा मातृका
शक्तिं कुण्डलिनीं चतुर्विधतनु यस्तत्त्वविन्मन्यते ।
सोऽविद्याखिलजन्मकर्मदुरितारण्य प्रबोधाग्निना
भस्मीकृत्य विकल्पजालरहितो मातु. पद तद् व्रजेत् ॥
तत्ते मध्यमबीजमम्ब कलयाम्यादित्यवर्ण क्रिया–
ज्ञानेच्छाद्यमनन्तशक्तिविभवव्यक्तिं व्यनक्ति स्फुटम् ।
उत्पत्तिस्थितिकल्पकल्पिततनु स्वात्मप्रभावेन यत्
काम्य ब्रह्महरीश्वरादिविबुधै काम क्रियायोजितं. ॥'

देवीपचस्तवीमधील लघुस्तवात कामराजकूटास सारस्वतकूट म्हटलें आहे तें पाहा—

'यन्नित्ये तव कामराजमपर मन्त्राक्षर निष्कल
तत्सारस्वतमित्यवैति विरल कश्चिद् बुधश्चेद्भुवि ।

आरण्यान प्रतिपर्वं सत्यतपसो यत्कीर्तयन्तो द्विजा
प्रारम्भे प्रणवास्पदप्रणयिता नीत्वोच्चरन्ति स्फुटम् ॥'

श्लोक १६ ते १९ मध्य वर्णन केलेल्या उपासनेच्या स्वरूपाला तन्त्रशास्त्रात मादनप्रयोग असं म्हटलं आहे श्लोक १६ व १७ मध्य सांगित लेले प्रयोग सात्त्विक स्वरूपाचे आहेत तर श्लोक १८ व १९ मध्य वर्णन केलेले प्रयोग राजसस्वरूपाचे आहेत

मुखं बिन्दुं कृत्वा कुचयुगमधस्तस्य तदधो
हकारार्धं ध्यायेद्धरमहिषि ते मन्मथकलाम् ।
स सद्यः संक्षोभं नयति वनिता इत्यतिलघु
त्रिलोकीमप्याशु भ्रमयति रवीन्दुस्तनयुगाम् ॥ १९ ॥

हे हरमहिषि त्रिपुरसुन्दरि, बिंदु हे तुझें मुख व त्याखालीं बिंदुद्वय हे तुझें स्तनद्वय व त्याच्या खालीं हकारार्ध, अशा रीतीनें जो मन्मथकलेचं म्हणजे कामकलेच ध्यान करतो, तो तात्काळ स्त्रियाना क्षुब्ध करतो ही अगदींच क्षुल्लक गोष्ट आहे सूर्य व चन्द्र हें जिचें स्तनद्वय आहेत अशा त्रिलोकीलाहि तो भ्रमित करतो.

टीपा—ह्याहि श्लोकात कामराजकूट वर्णिलें आहे ह्यात कामराज कूटाच्या आकृतीच वर्णन आहे पण श्लोकातील व्यक्त होणाऱ्या अर्था विषयीं स्पष्टता नाहीं श्लोकातील मन्मथकला म्हणजे कामकला असं म्हणता येईल पण हल्लीं कामकला म्हणजे 'ई' हे बीजाक्षर मानतात पण त्याचा उद्धार या श्लोकातील शब्दावरून कसा होतो तें समजत नाहीं प्रथम चरणाचा अर्थ असा होतो कीं, प्रथम एक बिंदु दर्शित करून त्याखालीं दोन बिंदु लिहावेत म्हणजे त्या बिंदूंचा एक त्रिकोण होतो द्वितीय चरणात सांगितलं आहे कीं, या बिंदुयुक्त त्रिकोणाखालीं हरार्ध ( हकारार्ध ) लिहावें हा हरार्ध किंवा हकारार्ध म्हणजे काय याचें स्पष्टीकरण मात्र कोणत्याहि टीकेंत नाहीं 'कामकलाविलास' नामक तन्त्रशास्त्रावरील ग्रंथात मात्र कामकला म्हणजे 'ई' या बीजाक्षराचं माहात्म्य सांगितलं आहे तैत्तिरीय आरण्यकातील 'य ई ँ शृणोत्य लोक ँ शृणोति न हि प्रवेद सुकृतस्य पन्थाम्' असा मन्त्र असून श्रीसूक्तातहि पुढील मन्त्र आहे—

'चन्द्रां प्रभासां यशसा ज्वलन्तीं श्रियं लोके देवजुष्टामुदाराम् ।
तां पद्मिनीं ई शरणमहं प्रपद्ये अलक्ष्मीर्मे नश्यतां त्वां वृणे ॥'

सोभाग्यवर्धिनीटीकेंत रुद्रयामलांतील पुढील श्लोक उद्धृत केले आहेत—

'नभोमहाबिन्दुमुखी चन्द्रसूर्यस्तनद्वया ।
सुमेरुहारवलया शोभमानमहीपदा ॥
पातालतलविन्यासा त्रिलोकीयं तवाम्बिके ।
कामराजकलारूपा जागर्ति सचराचरा ॥'

यांतहि तीन बिंदूंच्या त्रिकोणाचे वर्णन आहे. तसेंच कादिमतांतीलहि श्लोक उद्धृत केले आहेत ते असे —

'नित्याकूटत्रय देवि तुरीयस्वरशेखरम् ।
तत्तुरीयं स्वरूपं च बिन्दुत्रयमुदीरितम् ॥
तदात्मकं च देव्यास्ते साधकस्य च यद्भवेत् ।
तद्भावनां शृणु प्राज्ञे महोदयकरीं शुभाम् ॥
ऊर्ध्वबिन्द्वात्मकं वक्त्रमधोबिन्दुद्वयात्मकम् ।
कुचद्वयं तु तच्छेषागतिमेतां विभावयेत् ॥'

हरार्ध शब्दाचे अनेक अर्थ टीकाकारांनीं केले आहेत. एक अर्थ असा कीं, हरार्ध म्हणजे शिवाचें अर्धांग म्हणजेच शिवाची शक्ति.

'त्रिकोणरूपिणी शक्तिर्बिन्दुरूपः सदाशिवः ।'

म्हणजे श्रीचक्रांत मध्यें जो बिंदु आहे तो शिवात्मक असून त्याला वेष्टित करीत असलेला त्रिकोण ती मध्यबिन्दुरूप शिवाची शक्ति आहे. वर्णमालेंतील 'अ' हा शिवरूप असून 'इ' हा वर्ण शक्तिरूप आहे ही दोन्ही एकरूप असल्यानें शिवशक्तीचें ऐक्य मानलेलें आहे. हें तात्त्विकदृष्ट्या बरोबर असले तरी श्लोकांतील वर्णनाप्रमाणें वर एक बिन्दु व त्यासालीं दोन बिन्दु व त्यासालीं हरार्ध ह्याचा वर्णमालेंतील 'अ' व 'ई' यांच्याशीं संबंध कसा जोडला आहे तें अनाकलनीय आहे. 'ई' हे अक्षर लिहिण्यांत बिन्दुत्रय नाहीं; व हरार्धहि नाहीं. 'ई' ह्या बीजाक्षराची कामकलेशीं एकता एका प्राचीन लिपींतील अक्षराधारानें दासवितां येते. त्या ब्राह्मीलिपींतील जीं वर्णाक्षरें आहेत त्यांत 'ई' हे अक्षर बिंदुत्रयात्मक त्रिकोणानें लिहिलें जातें

'ई' यांतील जो अनुस्वार आहे तो बिंदुत्रयात्मक 'ई' च्या वर लिहिला कीं, 'ई' हें कामकलाबीज ब्राह्मी लिपींत सिद्ध होतें. पण हें श्लोकार्थाशीं सुसंगत होत नाहीं. पहिली विसंगति ही कीं, श्लोकांत तीनच बिंदु निर्दिष्ट आहेत. पण ब्राह्मी लिपीवर्णाच्या 'ई' मध्यें तीन बिंदु आहेत. पण 'ई' मध्यें चार बिंदु होतात. दुसरी अडचण अशी कीं, 'ई' ही कामकला समजण्यांत हरार्ध किंवा हकारार्ध येत नाहीं. टीकाकारांनीं श्लोकांत बिन्दुत्रय व हरार्ध किंवा हकारार्ध यांस मन्मथकला म्हटलें आहे व त्यांनीं तें विविध प्रकारें विशद केलें आहे. एका टीकाकाराचें म्हणणें असें कीं, देवनागरी 'ह' अक्षराचा ऊर्ध्व अर्ध काढल्यास अधोऊर्ध्वभाग थोडासा त्रिकोणा सारखा दिसतो तो हकारार्ध. आणि अशा प्रकारें बिंदुत्रयात्मक त्रिकोण व अधोभागीं रेखात्रयात्मक जो त्रिकोण होतो त्या आकृतीस कामकला म्हणावें व त्याचा उच्चार 'ई' असाच करावा. हेंच तें 'ई' चें रूप होय. पण हें रूप कोणत्या लिपीप्रमाणें आहे तें कळत नाहीं.

कांहीं टीकाकार हकारार्धऐवजीं हरार्ध पाठ घेतात. त्याचेहि वेगवेगळे अर्थ होतात. कांहीं टीकाकारांच्या मतें हरार्धमधील हर या दोन अक्षरांमधील एक 'ह' किंवा 'र' हें अक्षर घ्यावें, पण कोणतेंहि अक्षर घेतलें तरी 'कामकला' निष्पन्न होत नाहीं कांहींच्या मतें हर शब्दांतील दोन वर्णांतून 'अ' स्वर वगळल्यास 'ह्' व 'र्' व्यजनें राहतात. वरील त्रिकोण म्हणजे 'ई'. आतां ह् + र् + ई = र्हीं हें बीज तयार होतें. पण र्हीं हें कामकलाबीज आहे असें कोठें विदित नाहीं. कांहीं टीकाकार 'क्लीं' हे कामकलाबीज मानतात. अरुणामोदिनीचे टीकाकार म्हणतात कीं, 'अथवा, क्लीमित्यस्य मदनबीजत्वात्तत्र च बिन्दोर्नागरलिप्यां शिरःस्थत्वात्तत्रस्थे बिन्दौ मुखं कृत्वा, तदधःस्थितबिन्दुद्वयाकारे कुचद्वयं, तदधोवर्तिनि लकारे हरार्धं त्रिकोणं ध्यात्वा तेन मन्मथकलां यो ध्यायेत्, क्लीमित्येत्ररूपां चिन्तयति स साधकः।'

योगिराज महाराज बाबा श्री. मोतीलालजी मेहता यांनीं हिंदींत लिहिलेल्या 'सार्थ सौंदर्यलहरी' नामक ग्रंथांत ते म्हणतात कीं, 'इस श्लोक में मादन प्रयोगसिद्धि है। इसमें कामराजकूटके साथ इच्छाशक्तिका प्रधानत्व है। श्रीमहामायाकी मन्मथकलाका बीज 'क्लीं' (कामबीज) है। ऊपर मुखपर बिन्दु है। नीचे बिन्दुप्रकारकी दो गुण्डियाँ। उसके नीच लकारका योग

है। इस महाकामबीजको गुप्त महासरस्वतीबीजभी कहते हैं। श्रीक्रमके अनुसार त्रिबिन्दुका अर्थ इस प्रकार है —

| | बिन्दु | गुण | दैवत | |
|---|---|---|---|---|
| १– | अग्नि | रजस् | ब्रह्मा | |
| २– | सूर्य | सत्त्व | हरि ) | ये दो कुच- |
| ३– | चंद्र | तमस् | हर ) | बिन्दु हैं। |

उसके नीचे चित्कलागुणत्रय भाव है। उसके नीचे बिन्दुत्रयभावमें अर्धशिवरूप 'हंसः' है। इसमें भी तीन बिन्दु हैं। प्रथमार्ध श्लोकका भाव विश्वस्त्रीवशीकरण महामाया शक्ति है। द्वितीयार्धमें विश्ववशीकरण शक्ति सामर्थ्य है। इस श्लोक में चिद्कुण्डलिनीसंयोग या शिवशक्तिमीलनका भाव है।'

ह्यांत सांगितल्याप्रमाणें या श्लोकांत कामबीजाचा उद्धार आहे. जो त्रिन्दुत्रयात्मक त्रिकोण आहे त्याचे तीन तीन अर्थ होतात. अग्नि, सूर्य, चंद्र या तीन तेजस्वी देवता असून त्रिलोकांच्या अधिष्ठात्री देवता आहेत. तसेंच रजस्, सत्त्व व तमस् हे तीन गुण आणि ब्रह्मा, हरि व हर या त्यांच्या अनुक्रमें देवता आहेत. हीं तत्त्वें उपरोक्त त्रिपुटीत दर्शविलीं जातात. याखालील जो रेखात्मक त्रिकोण आहे तो शिवरूप 'हं' आणि 'सः' यांचा अर्धा भाग म्हणजे हंमधील एक बिंदूची एक रेखा, व सः मधील विसर्गाचे दोन बिंदु, मिळून हरार्ध दाखवितो. त्यास चित्कली अशी संज्ञा आहे. अन्यहि एक अर्थ होतो तो असा–निर्गुण ब्रह्म किंवा परमशिव विश्वोत्पत्तीची इच्छा करतो तेव्हां प्रथम तो सगुण म्हणजे शिवशक्तिरूप धारण करतो. सृष्ट्युत्पत्तीपूर्वी या शिवशक्तीची तीन तीन रूपें होतात. आदिशक्तीची तीन रूपें म्हणजे इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति होत. शिव हा शक्तीहून भिन्न नसतो. म्हणून या तीन शक्तींच्या अनुषंगानें शिवाचीहि तीनच रूपें आहेत. प्रथम इच्छाशक्तियुक्त तो होतो, त्यास 'शिव' हीच संज्ञा आहे. जगदुत्पत्तीची इच्छा झाल्यावर तें कशा प्रकारें निर्माण करावें याचा त्यानें विचार केला. तो विचार म्हणजेच ज्ञानशक्ति. या ज्ञानशक्तीनें युक्त अशा शिवास 'सदाशिव' अशी संज्ञा आहे. तो सदाशिव जगदुत्पत्ति करतो. ज्या शक्तीच्या योगें ही जगन्निर्मिति होते तीच क्रियाशक्ति होय.

क्रियाशक्तियुक्त युक्त शिवास 'ईश्वर' म्हणतात. अशा प्रकारें शक्तित्रयात्मक व रूपत्रयात्मक शिव हा विश्वोत्पत्तीचा विधाता आहे.

आपल्या वर्णमालेंत सोळा स्वरूपानें ह्या शिवशक्तीचें रूपत्रय विशद केलेलें प्रस्तावनेंत आलेंच आहे. प्रस्तुत श्लोकांत जे बिंदु व हरार्ध सांगितले आहेत त्यांचें स्पष्टीकरण खालीलप्रमाणें आहे—

तीन बिंदूंचा त्रिकोण म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया ह्या शक्ति व तीन रेषांचा त्रिकोण म्हणजे शिव, सदाशिव व ईश्वर. येणेंप्रमाणें हे दोन त्रिकोण विश्वोत्पत्तीचें मूलकारण दर्शवितात. हें मूलकारण प्रथम इच्छाशक्तिरूपच असल्यानें प्रस्तुत श्लोकांत ह्या शक्तीस मन्मथकला म्हणजे इच्छारूपी कला म्हटलें आहे. भगवती त्रिपुरेच्या श्रीचक्रांत बिंदु व त्रिकोण ही मध्यभागीं असून तीं श्रीचक्ररूपी विश्वाचें मूलकारण आहेत. इतर चक्रें विश्वविस्तार दर्शवितात. वास्तविक शिवशक्तीचें मूलस्वरूप समूर्त नाहीं. पण पूजा, जप, ध्यान इत्यादि करण्यासाठीं मूर्ति व वर्णोच्चार आवश्यक आहेत. श्रीचक्र हें त्या मूर्तीचें प्रतीक असून बीजाक्षर हें वर्णरूप प्रतीक आहे. म्हणून श्रीचक्राचें *पूजन व ध्यान आणि बीजाक्षराचा जप ही त्रिपुटी साधकास भगवतीच्या* चरणांसन्निध नेण्यास समर्थ आहे.

श्लोकाच्या प्रथमार्धाचा भावार्थ असा कीं, जप, ध्यान इत्यादिकांनीं स्त्रीवशीकरण शक्ति प्राप्त होते. जपध्यानानें ही इहलोकींची सिद्धि हीच एक सिद्धि मिळते असें नव्हे तर त्याच्या आधारें साधक त्रैलोक्यावरहि स्वामित्व मिळवूं शकतो. या विश्वास स्त्रीरूप देऊन त्यास त्रिलोकी असें म्हटलें आहे. प्रथमबिंदु मुखरूप असून अन्य दोन बिंदु स्तनरूप आहेत. म्हणजेच प्रथमबिंदु अग्निरूप असून अन्य दोन बिंदु सूर्यचंद्ररूप आहेत. अशा प्रकारें बाह्य विश्वाचें ध्यान केल्यावर पुढील पायरी म्हणजे विश्व हें शिवशक्तिरूप आहे अशी भावना धारण करून श्रीचक्राचें ध्यान करणें. नंतर शेवटची *पायरी म्हणजे साधकानें स्वतःस्च शिवशक्तिरूप मानून आपणच श्रीचक्ररूप* आहोंत अशा भावनेनें ध्यान करणें. याप्रमाणें शिवशक्तीशीं एकरूपता प्राप्त करून घेणें ही सर्वोच्च स्थिति व हाच मोक्ष होय.

उपनिषदांतहि 'सर्व खलु इदं ब्रह्म'। 'अहं ब्रह्मास्मि'। 'अयमात्मा ब्रह्म' *इत्यादि जीं वचनें आहेत त्याचाहि हाच अर्थ आहे.*

किरन्तीमङ्गेभ्यः किरणनिकुरुम्बामृतरसं
हृदि त्वामाधत्ते हिमकरशिलामूर्तिमिव यः।
स सर्पाणां दर्पं शमयति शकुन्ताधिप इव
ज्वरप्लुष्टान् दृष्ट्या सुखयति सुधासारसिरया ॥ २० ॥

आपल्या अवयवांपासून किरणसमूहरूपी अमृतरस स्रवणाऱ्या चंद्रकांत मण्याच्या मूर्तीप्रमाणें हृदयांत स्थापन करून जो साधक तुझें ध्यान करतो, तो पक्षिराज गरुडाप्रमाणें सर्पांचें गर्वहरण करतो आणि अमृताची धारा वाहविणाऱ्या आपल्या दृष्टीनें ज्वरानें तप्त झालेल्यांना सुखी करतो.

टीपा—वरील दोन श्लोकांत (श्लोक १८ व १९) मादनप्रयोग सांगितले. आतां प्रस्तुत श्लोकांत विषहर व ज्वरहर प्रयोगांचें वर्णन आहे. भगवतीचा भक्त साप चावल्यावर त्या सर्पदंशाचें विष उतरवूं शकतो आणि रोग्यांचा ज्वरहि दूर करूं शकतो. सर्वसाधारणपणें ज्वरासारखे रोग रोगचिकित्सक वैद्य औषधें देऊन बरें करतो. परंतु देवीभक्ताची गोष्ट वेगळीच आहे. भगवतीच्या कृपेनें त्याच्यामध्यें जें दैवी सामर्थ्य उत्पन्न होतें त्या योगानेंच तो सर्पादिकांचें विष व ज्वरादि रोग आपल्या केवळ दृष्टिपातानें दूर करूं शकतो. भगवतीच्या कृपेनें कलिकालालाहि जिंकण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त होतें. या साधनाला गरुडध्यानयोग असेंहि नांव आहे. चतुःशतींतील प्रमाणभूत पुढील श्लोक पाहा –

'षण्मासध्यानयोगेन जायते गरुडोपमः।
दृष्ट्या कर्षयते लोकं दृष्ट्यैव कुरुते वशम् ॥
दृष्ट्या संक्षोभयेन्नारीं दृष्ट्यैव हरते विषम्।
दृष्ट्या चातुर्थिकादींश्च ज्वरान्नाशयते क्षणात् ॥
चन्द्रकान्तशिलामूर्तिं चिन्तयित्वा विनाशयेत्।
तापज्वरानशेषांश्च शीघ्रं तार्क्ष्य इवापरः।
गारुडध्यानयोगेन स्मरणान्नाशयेद्विषम् ॥

तटिल्लेखातन्वीं तपनशशिवैश्वानरमयीं
निषण्णां षण्णामप्युपरि कमलानां तव कलाम्।
महापद्माटव्यां मृदितमलमायेन मनसा
महान्तः पश्यन्तो दधति परमाह्लादलहरीम् ॥ २१ ॥

निर्दुलेरेप्रमाणें सूक्ष्म, सूर्य, चन्द्र व अग्नि यानीं युक्त, तसच सहाहि कमळाच्यावर असलेल्या तुझ्या कलेला, महापद्मवनामध्यें मायारूपी मल नष्ट झालेल्या मनानें तुला पाहून धन्य झालेले पुरुष उत्कृष्ट आनदलहरीमध्य निमग्न झालेल तुझें भजन करतात

टीपा—मागील श्लोकात भगवतीच्या स्थूल ध्यानाच माहात्म्य सागितलें आहे आता ह्या श्लोकात भगवतीच्या अधिक श्रेष्ठ व सूक्ष्म रूपाचा उल्लेख केला आहे मागील श्लोकात बाह्यपूजेचा उल्लेख आहे, तर ह्या श्लोकात अतर्मुखवृत्तीनें ध्यान करण्याच विधान सागितले आहे बाह्यपूजा न करता केवळ अत पूजाच करावी असा अर्थ यात अभिप्रेत नाहीं बाह्यपूजा ही पहिली पायरी असून अत पूजा ही तिच्या वरची पुढील पायरी आहे ह्या अर्थाचा एक श्लोक असा—

‘ उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा ।
अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राधमाधमा ॥ ’

भगवतीच्या उपासनेची अतिम पायरी म्हणजे सर्व काहीं भगवतीरूपच आहे अस मानून आपल्या सर्व क्रिया तिचीच नानाप्रकारची सेवा आहे अशी भावना ठेवून जीवनक्रम चालू ठरणें ही सहजावस्था होय अगदीं ह्याच अर्थाचा श्लोक सौंदर्यलहरींतील २७ वा आह त्याच विवरण करताना ह्या सहजावस्थेच स्पष्टीकरण केलें आह ही सहजावस्था अत्यत दुर्लभ आहे लाखों लोकात एखादाच भक्त ही अवस्था मिळविता त्यालाहि ती अनेक पूर्वजन्मीं कलेल्या उपासनेच्या योगानेंच मिळते भगवद्गीततहि ‘ अनेकजन्म ससिद्धस्ततो याति परा गतिम् । ’ असें म्हटल असून यात वर्णन केलेला पुरुषच परा म्हणजे सर्वश्रेष्ठ गतीस जाता असा स्पष्ट उल्लेख आहे त्या परा गतीच वर्णन प्रस्तुत श्लोकात ‘ दधति परमाह्लादलहरीम् ’ या शब्दात केलें आह पण ही स्थिति प्राप्त होण्यास ध्यानधारणेची आवश्यकता आहे ही पायरी उच्च पायरीच्या खालीं असल्यानें तिला मध्यमा म्हटलें आहे, त योग्य आहे पण या मध्यमा पायरीवर येण्याची योग्यता प्राप्त होण्यास अनेक जन्मातील पूजा व उपासनारूप आराधना ही आवश्यक आहे ही तिसरी म्हणजे मध्यमाच्याहि खालची असल्यानें तिला अधम म्हटलें आहे म्हणजे ती त्याज्य नसून खालच्या दर्जाची, कमी प्रतीची आहे असें समजावें सर्वसामान्य भक्त ध्यानधारणेंचेहि अधिकारी नसतात

'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥'

या श्लोकांत वर्णन केलेली उपास्यदेवतेच्या मूर्तीची नवविधा भक्ति अनेक जन्मे केली कीं, त्या त्या भक्ताची ती ती विशिष्ट उपास्यदेवता आपल्या भक्तास वरील पायरीवर चढण्याची योग्यता प्राप्त करून देते. भगवद्गीतेंत म्हटलेंच आहे कीं,

'तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥'
'यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥'

हा मूर्तिपूजेचा अधिकार प्राप्त होण्यास पुण्यसंचयाची जरुरी आहे. पण जे पुण्यरहित लोक आहेत त्यांच्याकरतां कनिष्ठमार्ग म्हणजे तीर्थयात्रा होय. त्यास अधमाधमा म्हटलें आहे. याचा अर्थ असा नव्हे की, हा मार्ग अगदीं त्याज्य आहे. ज्याच्या त्याच्या कुवतीप्रमाणें व पुण्यसंचयानुरूप त्यानें वरीलपैकीं एका मार्गाचा अवलंब करावा.

प्रस्तुतच्या श्लोकांत कुंडलिनीयोगाचें वर्णन आहे असें सर्व टीकाकार समजतात. त्यांच्या मतें मागें एका श्लोकांत भगवतीच्या वर्णनांत सहस्रदल-कमलांतून खालीं येऊन कुलकुण्डांत साडेतीन वेटोळीं करून ती निद्रा घेते अशा अर्थाचें 'स्वपिषि कुलकुण्डे कुहरिणि' हें वचन आलें आहे जेव्हां कुण्डलिनी जागृत होते तेव्हां ती मूलाधारादि सहा चक्राचा भेद करून सहस्रदलकमलांत जाऊन शिवाशीं विहार करते ('सह रहसि पत्या विहरसे') हें वर्णन कुण्डलिनीयोगांत उपासकानें करावयाचा जो मार्ग सांगितला आहे त्याच्याशीं बरेच साम्य आहे म्हणून प्रस्तुत श्लोकांत 'तटिल्लेखातन्वीम्' हे जे शब्द आहेत तशाच अर्थाचे योगमार्गांतील कुण्डलिनीचें वर्णन आहे मागील एका श्लोकांत मूलाधारादि जीं नांवें आलेलीं आहेत, तींहि कुण्डलिनीयोगांतीलच आहेत. ह्या सर्व कारणांमुळें प्रस्तुत वर्णन व्यक्तिगत कुण्डलिनी वरूप भगवतीचें आहे असें सर्व मानतात. पण हें सयुक्तिक दिसत नाहीं. कारण हें वर्णन कुण्डलिनीरूपाचें नाहीं. याविषयींचें विशेष स्पष्टीकरण प्रस्तावनेंत आलेंच आहे. येथें फक्त एक दोन मुद्द्यांचेंच विवेचन करणार आहोत.

'शिवः शक्त्या युक्तो' इत्यादि श्लोकाचें वर्णन कुण्डलिनीसंबंधी नाहीं. कारण त्यांतील 'अतस्त्वामाराध्यां हरिहरविरिञ्चादिभिरपि' इत्यादि वर्णनावरून ब्रह्मादि देवता त्या कुण्डलिनीचें आराधन करीत नाहींत हें स्पष्ट आहे. तसेंच श्लोक ७ व ८ मध्येंसुद्धां भगवतीचें ध्यान कोठें व कसें करावें याविषयींचें वर्णन आहे तेंहि व्यक्तिगत कुण्डलिनीध्यानाला अनुकूल नाहीं. नंतर श्लोक १४ मध्येंहि भगवतीच्या चरणमहिमाच्या वर्णनांत पृथिव्यादि पंचमहाभूतें व सहावें मन यांच्या किरणसंख्येचें गणन आलें आहे. तेंहि व्यक्तिगत कुण्डलिनीयोगाच्या षट्चक्रांना कांहीं अनुकूल नाहीं. शेवटीं म्हणजे प्रस्तुत एकवीसाव्या श्लोकांतहि महापद्मवनामध्यें असलेल्या आणि अग्नि, चंद्र व सूर्य ह्यांनीं युक्त असलेल्या भगवतीच्या एका कलेचें ध्यान करावें असेंच सांगितलें आहे. तेव्हां ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें व्यक्तिगत कुण्डलिनी 'तटिल्लेखातन्वी' आहे हें खरं, तसेच ती षट्चक्रांचें भेदन करून सहस्रदलकमलांत जाते हेंहि खरें आहे. पण ती व्यक्तिगत कुण्डलिनी अग्नि, चंद्र व सूर्य यांनीं युक्त नाहीं आणि सहस्रदलकमलांत ती पोहोंचल्यावर फक्त तिच्या एकाच कलेचें ध्यान करावें असेंहि वर्णन नाहीं. म्हणून हें भगवतीचें वर्णन व्यक्तिगत कुण्डलिनीचें नाहीं असें वाटतें. प्रस्तुत श्लोकाशीं समानार्थक श्लोक इतर कांहीं स्तोत्रांत आहेत. उदाहरणार्थ चर्चास्तवांतील पुढील श्लोक पाहा—

'योऽयं चकास्ति गगनार्णवरत्नमिन्दु-
र्योऽयं सुरासुरगुरुः पुरुषः पुराणः।
यद्वाममर्धमिदमन्धकसूदनस्य
देवि, त्वमेव तदिति नः प्रतिपादयन्ति ॥'

'मूर्ध्नि स्फुरत्तुहिनदीधितिदीप्तिदीप्त
मध्ये ललाटममरायुधरश्मिचित्रम्।
हृच्चक्रचुम्बि हुतभुक्कणिकानुकार
ज्योतिर्यदेतदिदमम्ब तव स्वरूपम् ॥'

अम्बास्तवामध्येंहि अशाच आशयाचा एक श्लोक आहे—

'मूलालवालकुहरादुदिता भवानि
निर्भिद्य षट् सरसिजानि तटिल्लतेव।
भूयोऽपि तत्र विशसि ध्रुवमण्डलेन्दु-
निःष्यन्दमानपरमामृततोयरूपा ॥'

प्रस्तुतच्या श्लोकांत भगवतीला 'तपनशशिवैश्वानरमयी' असें म्हटलें आहे. म्हणजे भगवती ही अग्नि, चंद्र व सूर्यरूप आहे. भगवतीच्या संबंधीचें हें वर्णन किती सार्थ आहे ह्याचा खुलासा कोणत्याहि टीकाकारानें केला नाहीं. अग्नि, चंद्र व सूर्य ह्या वेदांतहि देवता आहेत. ह्यांची उपासना करण्यासाठीं पुष्कळ वैदिक मंत्र आहेत. इतर देवतांमधून ह्या तीन देवतांचा उल्लेख वेगळा करण्यांत एक प्रकारचें वैशिष्ट्य, पूर्ण औचित्य व स्वारस्य आहे. वैदिक मंत्रांत भूः, भुवः, सुवः या तीन लोकांचा उल्लेख असून त्यांचीं लौकिक नांवें पृथिवी, अंतरिक्ष व द्यु अशीं असून त्यांच्या अनुक्रमें अग्नि, चंद्र व सूर्य ह्या देवता आहेत. भगवतीदेवीच ह्या तीन देवता व हे तीन लोक व्यापून परिणत झाली आहे.

' भूरग्निं च पृथिवीं च मां च ।
त्रींश्च लोकान् संवत्सरं च ।
प्रजापतिस्त्वा सादयतु ।
तया देवतयाङ्गिरस्वद्ध्रुवासीद ॥ '

इत्यादि मंत्रांत व अशाच अन्य मंत्रांतूनहि त्रिदेव व त्रैलोक्यव्यापिनी भगवती त्रिपुरसुंदरीचें बाह्यस्वरूप अनुस्यूत आहे. 'चतुर्भिः श्रीकण्ठैः शिवयुवतिभिः पञ्चभिरपि' या मागील अकराव्या श्लोकांत श्रीचक्राचें वर्णन आहे. त्यांतील शेवटच्या दोन चरणांत असें सांगितलें आहे कीं, शिवशक्तिचक्रांच्या बाहेर तीन चक्रें आहेत. प्रथम वसुदल म्हणजे अष्टदलकमलाकार चक्र आहे. त्याच्या बाहेर कलाश्र म्हणजे षोडशदलकमलाकार चक्र आहे. व ह्या सर्वांच्या बाहेर त्रिरेखात्मक भूपुर नांवाचें एक चक्र आहे. हीं सर्व चक्रें म्हणजे भगवतीच्या चरणांचे किरण आहेत. ही तीन चक्रें म्हणजे द्यु, अंतरिक्ष व भूमि यांची द्योतक आहेत. सर्वांत बाहेरील चक्र भूपुर आहे. त्यांतील भूशब्दच पृथ्वीवाचक आहे. त्याच्या आंतील षोडशदलकमल अंतरिक्षाचें द्योतक असून तें अंतरिक्ष पृथ्वीच्या वर आहे व त्याची देवता चंद्र आहे. चक्रांतील षोडशदलकमल म्हणजेच चंद्राच्या सोळा कलांचें तें निदर्शक आहे. वसुदल हें सर्वांत वरील द्यूचें द्योतक आहे व त्याची देवता सूर्य आहे. सूर्योपासक सूर्यचक्र काढून त्याचें पूजन करतात. तें चक्र अष्टदलात्मक आहे. म्हणून अष्टदलात्मक वसुदल हें सूर्यदेवतात्मक द्यूचें द्योतक* होय. येणेंप्रकारें भगवती ही भूः, भुवः, सुवः ह्या व्याहृतिपूर्ण बाह्य विश्वानें

परिणत आहे. तिच्या अंतर्विश्वाची परिणति पुढील 'मनस्त्वं व्योम त्वं' इत्यादि श्लोक ३५ पासून वर्णिली आहे. तिचे वर्णन पुढें आलेलेंच आहे. सारांश बहिर्विश्व व अंतर्विश्व ह्या उभयरूपानें भगवती नटलेली आहे. या सर्व वर्णनावरून असें अनुमान करणें अवश्य वाटतें कीं, येथें व्यक्तीच्या अंतर्गत कुण्डलिनीचें हें वर्णन नव्हे.

भवानि त्वं दासे मयि वितर दृष्टिं सकरुणा-
मिति स्तोतुं वाञ्छन् कथयति भवानि त्वमिति यः ।
तदैव त्वं तस्मै दिशसि निजसायुज्यपदवीं
मुकुन्दब्रह्मेन्द्रस्फुटमकुटनीराजितपदाम् ॥ २२ ॥

हे माते भवानि, 'मी तुझा दास आहे, तूं माझ्यावर कृपादृष्टि टाक', याप्रमाणें तुझी स्तुति करण्याची मनांत इच्छा ठेवून जो कोणी 'भवानि त्वं दासे मयि वितर दृष्टिं सकरुणाम्' हें वाक्य उच्चारावयास आरंभ करतो तो 'भवानि त्वं' एवढीं अक्षरें उच्चारतांक्षणींच तूं त्या दासाला ज्याठिकाणीं विष्णु, ब्रह्मदेव व इंद्र (नमस्कार करतांना) आपल्या मुकुटांच्या स्पर्शानें तुझे चरण प्रकाशित करीत आहेत अशा आपल्या सायुज्य पदवीला नेतेस.

*टीपा*–*श्लोक १४ मध्यें भगवतीच्या चरणकमलांनें वर्णन आहे.* श्लोक १५ ते २१ पर्यंतच्या सप्तश्लोकींनें धर्म, अर्थ, काम व मोक्ष या *चतुर्विध पुरुषार्थांतील प्रथमचे तीन–धर्म, अर्थ व काम, हीं फळें भगवतीच्या* उपासकांना प्राप्त होतात असें सांगितलें प्रस्तुत श्लोकांत चवथा पुरुषार्थ जो मोक्ष त्याचेंहि दान भगवतीच करते असें सांगितलें आहे

सायुज्य म्हणजे एकरूप होणें उपनिषदांतहि असेंच प्रतिपादिलें आहे कीं, ब्रह्मोपासना करून ज्ञानप्राप्ति झाली म्हणजे उपासक ब्रह्मरूप होतो. चार वेदांचीं चार प्रधान वाक्यें आहेत. तीं ह्या अंतिम स्थितीच यथार्थ वर्णन करतात तीं चार वाक्यें अशीं आहेत—

'अन्तकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥'

भागवतांतील अजामिळाची कथा ह्याविषयीं प्रसिद्ध आहे. वामन पंडितहि म्हणतात—

'न कळतां पद अग्निवरी पडे ।
न करि दाह असें न कधीं घडे ॥
अजित नाम वदो भलत्या मिषें ।
सकल पातक भस्म करीतसे ॥'

विष्णु, ब्रह्मा व इंद्र यांना देवत्व आले तरी त्यांनाहि तुझ्या चरणीं नत होऊन तुझी उपासना आवश्यक आहे. म्हणजे स्वर्ग, सत्यलोक व वैकुंठ या ठिकाणीं जाऊनहि तुझी सायुज्यस्थिति मिळत नाहीं त्यांनाहि तुझ्याच उपासनेनें सायुज्यमुक्ति मिळते.

इतर विविध धर्मापेक्षां हिंदुधर्मातच म्हणजे वैदिक धर्मातच ईश्वर-प्राप्तीसाठीं धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ सांगितले आहेत, हें त्याचे वैशिष्ट्य आहे. इतर धर्मात अर्थ व काम या पुरुषार्थांचा धर्माशीं किंवा ईश्वरप्राप्तीशीं कांहीं संबंध सांगितला नाहीं. मात्र वैदिक धर्मातच त्यांच्याशीं योग्य समन्वययुक्त सांगड घातली आहे त्याचें स्पष्टीकरण प्रस्तावनेंत केलेलेंच आहे.

'भवानि त्वं' इत्यादि चरणांतील 'भवानि त्वं' हे प्रारंभींचे शब्द उच्चारतांक्षणींच असा एक अर्थ आहे 'भवानि त्वं' याचा दुसरा अर्थ 'मी तूं व्हावें' असाच अभिप्रेत धरून 'तूं मला भक्ताला तुझेंपण देऊन म्हणजे त्वदाकार बनवून सायुज्यमुक्ति देतेस'. लक्ष्मीधराटीकेंत याच्या पुष्टयर्थ पुढील भाग उद्धृत केला आहे—

'अनिच्छयापि संस्पृष्टो दहत्येव हि पावकः' इति न्यायेन अविवक्षया प्रयुक्तमपि महावाक्यं फलदायकमिति, नापि अविमृश्यकारित्वं देव्या इति रहस्यम् ।'

भागवतांत अजामिळासंबधीं पुढील श्लोक आहे —

'एतावतालमघनिर्हरणाय पुंसां
संकीर्तनं भगवतो गुणकर्मनामाम् ।

आकृष्य पुत्रमघवान् यदजामिलोऽपि
नारायणेति म्रियमाण उपेति मुक्तिम् ॥ '

याचप्रमाणें शिवलीलामृतांतहि प्रदोषमाहात्म्यांतील कथेंत अनिच्छेनेंहि बिल्वपत्र फेकलें जाऊन तें चुकून शिवलिंगावर पडल्यानें बिल्वपत्र टाकणाऱ्यालाहि शिवसायुज्य लाभलें असें वर्णन आहे.

त्वया हृत्वा वामं वपुरपरितृप्तेन मनसा
शरीरार्धं शंभोरपरमपि शङ्के हृतमभूत् ।
यदेतत्त्वद्रूपं सकलमरुणाभं त्रिनयनं
कुचाभ्यामानम्रं कुटिलशशिचूडालमकुटम् ॥ २३ ॥

हे भगवति, तूं शिवाच्या शरीराचा वामार्ध हरण करूनहि तुझें मन तृप्त झालें नाहीं म्हणून तूं शंभूच्या दक्षिणार्धाचेंहि हरण केलेस, अशी मला शंका वाटते. कारण तुझें रूप सर्व अरुणवर्ण आहे, तें त्रिनेत्र आहे, तें कुचयुगलानें नम्र झालें आहे आणि तुझ्या मस्तकीं चूडेवर असलेला कुटिल चंद्र मुकुटच आहे.

टीपा—जगाचें आदिकरण परमशिव असून त्यालाच वेदान्तशास्त्रांत *निर्गुण ब्रह्म असें नांव आहे. पण हें मूलतत्त्व शब्दातीत आहे. तरी उपासकां-*साठीं निर्वचनीय करण्यास वेदान्ती लोक त्यास सगुणब्रह्म म्हणतात व शाक्त त्यास आदिशिव शक्तिस्वरूप म्हणून संबोधितात. सगुणब्रह्म म्हटलें कीं, त्यास गुणयुक्त वर्णन लागूं होतें. तसेंच शिव व शक्ति या दोन शब्दांनीं शाक्तपंथीय त्याचें निर्वचन करतात. वास्तविक त्यांच्यांत भेद नाहीं. हा अभेद प्रस्तुत श्लोकानें दर्शविला आहे. लक्ष्मीधर या टीकाकाराचें मतें सदरचा श्लोक उत्तरकौल नांवाच्या शाक्तसंप्रदायाच्या सिद्धांताचें प्रतिपादन करणारा आहे. या पंथांत शिवतत्त्व हें शक्तितत्त्वाहून भिन्न नसतें. त्याचा शक्ति-तत्त्वांत समावेश झालेला आहे. हाच सिद्धान्त काव्यात्मक पद्धतीनें येथें वर्णन केला आहे. शिवाच्या अनेक रूपांपैकीं अर्धनारीनटेश्वर हें रूप प्रसिद्धच आहे. या रूपांत भगवतीनें शिवाचा अर्धा भाग हरण केला आहे असें वर्णिलें आहे परंतु एवढ्यानेंच भगवती संतुष्ट झाली नाहीं. तिनें शिवाचा दुसरा भागहि हरण करून घेतल्यामुळें ती शिवाच्या रूपाशीं एकरूप झाली आहे किंवा शिव तिच्या रूपाशीं एकरूप झाले आहेत असेंहि म्हणतां येईल.

जगत्सूते धाता हरिरवति रुद्रः क्षपयते
तिरस्कुर्वन्नेतत्स्वमपि वपुरीशस्तिरयति ।
सदापूर्वः सर्वं तदिदमनुगृह्णाति च शिव-
स्तवाज्ञामालम्ब्य क्षणचलितयोर्भ्रूलतिकयोः ॥ २४ ॥

ब्रह्मा जगाची निर्मिति करतो, विष्णु रक्षण करतो आणि रुद्र संहार करतो. ईश्वर हा या सर्वांचा लय करीत स्वतःच्या देहाचाहि सदाशिवतत्त्वांत लय करून घेतो. सदाशिव या सर्वांच्या वर अनुग्रह करतो. हे भगवति, तुझ्या भ्रूलतिकेच्या चलनाचा एक क्षण हीच तुझी आज्ञा आहे असें समजून ह्या सर्व देवता आपापलीं कार्यें करतात.

टीपा—ह्या श्लोकांतील 'तिरस्कुर्वन्' ह्या शब्दाचा अर्थ कांहीं टीकाकार 'तुच्छ समजणारा' असें करतात, पण तें योग्य नव्हे. इतर टीकाकार 'उपसंहरन्' असा अर्थ करतात. म्हणजे 'आपल्यामध्यें अंतर्भाव करणारा' असा अर्थ होतो. 'तिरयति' म्हणजे 'तुच्छ मानतो' असें नसून 'लीन करतो' असा अर्थ होय. एका इंग्रजी टीकाकाराच्या मतें 'approves' (पसंत करतो) हा अर्थ आहे. पण तोहि बरोबर वाटत नाहीं. अनुग्रह करणें म्हणजे कृपा करणें. शाक्ततत्त्वज्ञानाचा जो मूळ सिद्धांत आहे, त्यांत सांगितल्याप्रमाणें जगदुत्पत्ति, जगत्स्थिति व जगत्प्रलय कसें होतात हें समजून घेतलें म्हणजे 'अनुग्रह' शब्दाचा अर्थ कळून येतो. याविषयींचें विशेष विशदीकरण प्रस्तावनेंत आलेंच आहे. हाच अर्थ सांगणारा ललिता-सहस्रनामांतील एक लहानसा उतारा पुढें दिला आहे—

'सृष्टिकर्त्री ब्रह्मरूपा गोप्त्री गोविन्दरूपिणी ।
संहारिणी रुद्ररूपा तिरोधानकरीश्वरी ।
सदाशिवानुग्रहदा पञ्चकृत्यपरायणा ॥'

वरील उताऱ्यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, भगवती ब्रह्मदेवाच्या रूपानें सृष्टि उत्पन्न करणारी असून विष्णुरूपानें रक्षण करणारी आहे. रुद्ररूपानें संहार करणारी असून ईश्वररूपानें ह्या तिघांनाहि अंतर्हित करणारी आहे आणि सदाशिवरूपानें त्यांच्यावर अनुग्रह करणारी आहे. अशा प्रकारें भगवती ही पांच कृत्यें करणारी आहे. सर्व जगताचें म्हणजे उत्पत्ति, स्थिति व लय यांचें स्थान ब्रह्म आहे. असें ब्रह्मसूत्रांतील

'*जन्माद्यस्य यतः*' ह्या सूत्रानें सांगितलें आहे. कार्यात कारण नेहमींच अनुस्यूत असतें. जेव्हां कार्याचा नाश होतो असें आपण म्हणतो तेव्हा तें कार्य नष्ट पावत नसून कारणरूपांत लीन होऊन राहातें.

'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । इत्यादि उपनिषद्वाक्यावरून हे स्पष्ट आहे कीं, चेतनाचेतनांरूपी ह्या जगताचें सगुण ब्रह्म हें मूळ कारण आहे. '*जन्माद्यस्य यतः*' *या सूत्रांतहि सांगितलें आहे कीं, सृष्टि, स्थिति* व लय ही ब्रह्मापासूनच होतात. लय होणें म्हणजे उत्पन्न झालेल्या वस्तूंचा विनाश नव्हे, तर मूळ कारणामध्यें विलीन होणें हें होय. ह्या तीन सृष्टिस्थितिप्रलयांचा उल्लेख प्रस्तुत श्लोकाच्या प्रथम चरणांत आला आहे.

तुरीय म्हणजे चवथी अवस्था, कार्याचा कारणरूपांत लय म्हणजे *कारणरूपानें अस्तित्व. त्याचा उल्लेख द्वितीय चरणांत* '*त्वमपि वपुरीशस्ति-रयति*' अशा शब्दांत केला आहे.

भगवतीच्या ह्याच पांच स्वरूपांना पंचप्रेत म्हटलें आहे. तें तिचें आसन असून त्याला मञ्च म्हटलें आहे. पहिलीं चार स्वरूपें हीं त्याचे चार खूर आहेत व पांचवा सदाशिव हा आसन आहे. श्लोक ८ व ९४ मध्यें या पंचप्रेतांचा स्पष्ट निर्देश आहे. श्लोक ८ मध्यें 'शिवाकारे मञ्चे परमशिवपर्यङ्कनिलयाम्,' व श्लोक ९४ मध्यें 'गतास्ते मञ्चत्वं द्रुहिण-हरिरुद्रेश्वरभृतः शिवः स्वच्छच्छायाघटितकपटप्रच्छदपटः'। याप्रमाणें भगवतीच्या आसनाचें वर्णन आहे.

उत्पत्ति, *स्थिति व लय या त्रिपुटीच्या फेऱ्यांतून* मुक्त होण्यास भगवतीच्या कृपेची आवश्यकता असते व ही कृपा ती सदाशिवरूपानें करते असा अर्थ 'अनुगृह्णाति' या शब्दानें ध्वनित होतो. हें सर्व कार्य भगवतीच्या इच्छेनुरूप होतें असा चतुर्थ चरणाचा आशय आहे. त्याचें विवेचन प्रस्तावनेंत आहेच.

प्रस्तुत श्लोकाशीं समानार्थक श्लोक सकलजननीस्तवांत आहेत——

'त्वया यो जानीते रचयति भवत्यैव सततं
त्वयैवेच्छत्यम्ब, त्वमसि निखिला यस्य तनवः ।
गतः साम्यं शम्भुर्वहति परमं व्योम भवती
तथाप्येतं हित्वा विहरति शिवस्येति किमिदम् ॥'

'विरिञ्च्याख्या मातः सृजसि हरिसंज्ञा त्वमवसि
त्रिलोकीं रुद्राख्या हरसि विदधासीश्वरदशाम् ॥
भवन्ती सादाख्या शिवयसि च पाशौघदलिनी
त्वमेवैकानेका भवसि कृतिभेदैर्गिरिसुते ॥'

त्रयाणां देवानां त्रिगुणजनितानामपि शिवे
भवेत्पूजा पूजा तव चरणयोर्या विरचिता ।
तथा हि त्वत्पादोद्वहनमणिपीठस्य निकटे
स्थिता ह्येते शश्वन्मुकुलितकरोत्तंसमकुटाः ॥ २५ ॥

हे शिवे, तुझ्या चरणकमलाची केलेली पूजा हीच तीन गुणांपासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मा, विष्णु व महेश या देवांचीच पूजा होते कारण तू तुझे पाय ज्यावर ठेवतेस त्या मणिपीठाजवळ हे तीन देव आपापल्या मस्तकावरील मुकुटापाशीं सतत हात जोडून उभे आहेत

टीपा—भगवती ही अखिल विश्वाची जननी आहे आणि तिनेंच त्रिगुणात्मक विश्व व सर्व देव निर्माण केले आहेत म्हणूनच तिच्या चरणकमलाची पूजा केल्यानें सर्व देवांची पूजा केल्याचें फळ मिळते हें योग्यच आहे आगमशास्त्रातील याच आशयाचा पुढील श्लोक पाहा—

'विष्णुपूजासहस्राणि शिवपूजाशतानि च ।
अम्बिकाचरणार्चायाः कलां नार्हन्ति षोडशीम् ॥'

विरिञ्चिः पञ्चत्वं व्रजति हरिराप्नोति विरतिं
विनाशं कीनाशो भजति धनदो याति निधनम् ।
वितन्द्री माहेन्द्री विततिरपि संमीलितदृशा
महासंहारेऽस्मिन् विहरति सति त्वत्पतिरसौ ॥ २६ ॥

टीपा--ह्या श्लोकार्थी समानार्थक सूतसहितेंतील एक वचन अरुणामोदिनी व्याख्येंत उद्धृत केले आहे तें असें--

'असख्या विलय यान्ति ब्रह्माणः पण्डितोत्तमाः ।
असख्या विष्णवो रुद्रा असख्या वासवादयः ॥
एक एव शिवः साक्षात्सृष्टिस्थित्यन्तहेतवः ।'

'एक एव रुद्रो न द्वितीयाय तस्थे।' असें एक श्रुतिवचनहि एतदर्थवाचक आहे भगवद्गीततहि 'क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते।' असेंच म्हटले आहे.

**जपो जल्पः शिल्पं सकलमपि मुद्राविरचना
गतिः प्रादक्षिण्यक्रमणमशनाद्याहुतिविधिः ।
प्रणामः संवेशः सुखमखिलमात्मार्पणदृशा
सपर्यापर्यायस्तव भवतु यन्मे विलसितम् ॥ २७ ॥**

माझें बोलणें म्हणजे तुझ्या मन्त्राचा जप होय माझ्या हाताचे सर्व व्यापार म्हणजे मुद्रा, माझ्या पायाचें चालणें म्हणजे तुला प्रदक्षिणा घालणें, माझें खाणें पिणें म्हणजे तुला आहुति देण्याचं कर्म, माझी गाढ निद्रा म्हणजे तुला केलेला प्रणाम अशा प्रकारं जं जें मी करतों तं तं तुझ्या चरणीं आत्मसमर्पण आहे अशा दृष्टीनें माझीं सर्व कृत्य तुझ्या पूजेचाच एक प्रकार होवो

टीपा--भावनोपनिषदात सांगितल्याप्रमाणें जीवन्मुक्त देवीची पूजा कशी करतो याचं वर्णन प्रस्तुत श्लोकात आलें आहे या पूजेच्या प्रकाराला मानसपूजा म्हणतात पूजेचे दोन प्रकार आहेत एक बाह्यपूजा व दुसरी मानसपूजा बाह्यपूजेंत पूजेची साधनसामग्री गोळा करून ती शास्त्रोक्त पद्धतीन करावी लागते या पूजापद्धतींत देवीच्या कोणत्या स्वरूपाची पूजा करावी ह चन्द्रज्ञानविद्यत दिलें आहे--

'सूर्यमण्डलमध्यस्था देवीं त्रिपुरसुन्दरीम् ।
पाशाङ्कुशधनुर्बाणान् धारयन्तीं प्रपूजयेत् ॥'

मानसपूजेस तन्त्रशास्त्रात समयाचार म्हटलें आहे या पूजेंत आपलं दैनंदिन व्यवहार म्हणजेच भगवतीची पूजा होय ही भावना असते

गिरिजापति महादेवासंबंधीं शिवमानसपूजास्तोत्रांत अशाच आशयाचा पुढील श्लोक आहे तो असा —

'आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहं
पूजा ते विषयोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः ।
संचारः पद्योः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो
यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् ॥'

शिवानंदलहरीनामक स्तोत्रांतहि असाच श्लोक आहे—

'वक्षोद्भूतबिधौ सहस्रकरता पुष्पार्चने विष्णुता
गन्धे गन्धवहात्मताऽन्नपचने बर्हिर्मुखाध्यक्षता ।
पात्रे काञ्चनगर्भता. ....बालेन्दुचूडामणे
शुश्रूषां करवाणि ते पशुपते स्वामिन् त्रिलोकीगुरो ॥'

श्रीमद्भगवद्गीतेंतहि याच आशयाचे श्लोक आहेत—

'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥'
'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
.मामेवैष्यसि कौन्तेय प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥'

इतर स्तोत्रादिकांतहि एतत्समानार्थवाची श्लोक आढळतील.

ददाने दीनेभ्यः श्रियमनिशमाशानुसदृशी-
ममन्दं सौन्दर्यप्रकरमकरन्दं विकिरति ।
तवास्मिन् मन्दारस्तबकसुभगे यातु चरणे
निमज्जन् मज्जीवः करणचरणैः षट्चरणताम् ॥ २८ ॥

दीन उपासकांना त्यांच्या इच्छेप्रमाणें सदैव संपत्ति देणाऱ्या, सौन्दर्यसमूहरूपी मध आसमंतात जोरानें सोडणाऱ्या व कल्पवृक्षाच्या पुष्पगुच्छाप्रमाणें अतीव सुंदर अशा तुझ्या चरणीं माझा जीव इंद्रियांच्या हालचालींच्या रूपानें भ्रमर होऊन लीन होवो.

टीपा — भगवतीच्या चरणकमलांपाशीं जाण्याकरितां कारणभूत जो भक्तिभाव तो देण्याबद्दल भगवतीची प्रार्थना प्रस्तुत श्लोकांत आहे हा श्लोक कित्येक टीकाकारांनीं गाळला आहे. सौभाग्यवर्धनीकार कैवल्याश्रमांनीं मात्र घेतला आहे. तें सयुक्तिकच आहे. कारण मागील श्लोक २७ मध्यें सांगितलेली उच्च स्थिति प्राप्त करून घेणें असेल तर प्रस्तुतच्या श्लोकांत सांगितलेल्या भक्तीची साधना करणें अत्यंत आवश्यक आहे. अशा रीतीनें श्लोक २७ व २८ मधील कार्यकारणभाव स्पष्टतया दिसून येतो.

सुधामप्यास्वाद्य प्रतिभयजरामृत्युहरिणीं
विपद्यन्ते विश्वे विधिशतमखाद्या दिविषदः ।
करालं यत्क्ष्वेलं कबलितवतः कालकलना
न शंभोस्तन्मूलं तव जननि ताटङ्कमहिमा ॥ २९ ॥

ब्रह्मदेव, इन्द्र इत्यादि विश्वांतील देवता अत्यंत भयकर असलेल्या जरामृत्यूंचें हरण करणाऱ्या अमृताचें प्राशन करूनहि मृत्युवश होतात. पण अत्यंत जहाल अशा विषाचें प्राशन करूनहि शिव कालवश झाले नाहींत. हे माते, त्याचें मूळ कारण म्हणजे तुझ्या कर्णाभरणाचा महिमा आहे.

टीपा—अत्यंत जहाल असलेले हलाहल शिवांनीं प्राशन केलें होतें. ही कथा पुराणातरीं प्रसिद्धच आहे. देवदानवांनीं केलेल्या समुद्रमंथनांतून उत्पन्न झालेल्या विषाचें शिवानीं प्राशन केल्यामुळें त्यांना नीलकंठ असें नांव पडलें

ललितासहस्रनामांत भगवतीचें एक नाव 'ताटङ्कयुगलीभूततपनोडुपमण्डला' असें आहे म्हणजे सूर्यमण्डल व चन्द्रमण्डल हीं भगवतीचीं ताटङ्कयुगलरूप आहेत भूलोक प्रलयकालीं नष्ट झाला तरी अतरिक्ष व द्यु हीं भगवतीचीं पग्णित रूपें राहतात त्याच्या अधिष्ठात्री देवता चद्र व सूर्य यांच्यावर रूपकालकार करून तीं भगवतीचीं कर्णभूषणें समजलीं आहेत

जरी इतर सर्व तत्त्वाचा व त्याच्या अधिष्ठात्री असलेल्या देवताचा सदाशिवतत्त्वामध्यें लय होतो, तरी पण सदाशिवतत्त्वाचा कधींच लय होत नाहीं. सदाशिवाला प्राप्त झालेलें हें अविनाशित्व भगवतीच्याच कृपेनें प्राप्त झालेलें आहे हा प्रस्तुत श्लोकाचा आशय

किरीटं वैरिञ्चं परिहर पुरः कैटभभिदः
कठोरे कोटीरे स्खलसि जहि जम्भारिमकुटम् ।
प्रणम्रेष्वेतेषु प्रसभमुपयातस्य भवनं
भवस्याभ्युत्थाने तव परिजनोक्तिर्विजयते ॥ ३० ॥

ब्रह्मदेवाचा मुकुट बाजूला कर, तुझ्यापुढें असलेल्या विष्णूच्या कणखर मुकुटावर पडशील, इंद्राच्या किरीटाचा तूं त्याग कर, याप्रमाणें तुझ्या मंदिरांत शिव अवचित आले म्हणजे उठून घाईनें त्यांचें स्वागत करतेवेळीं तुझ्या सेवकजनाचे वरील शब्दांचा विजय असो.

टीपा—कैटभजित् म्हणजे कैटभाला जिंकणारा विष्णु. जम्भारि म्हणजे जम्भाचा शत्रु इंद्र. विष्णूनें कैटभाला जिंकण्याची व इंद्रानें जम्भासुराचा वध केल्याची कथा प्रसिद्धच आहे. हे माते, तुझ्या मंदिरांत तुझें दर्शन घेण्यासाठीं ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र इत्यादि देव आले वेळीं तुला साष्टांग नमस्कार करीत असतात. त्या वेळीं शिव जेव्हां तुझ्या मंदिरांत अवचित येतात त्या वेळीं घाईनें त्यांना सामोरें जाण्यासाठीं जेव्हां निघतेस तेव्हां तुझे सेवकजन देवांच्या मुकुटांच्या गर्दीतून सुरक्षितपणें वाट काढून जाण्यास सुचवितात या श्लोकांत भगवतीच्या समृद्धीचें व शिवावरील असलेल्या अलोट प्रेमाचें वर्णन आलेलें आहे.

स्वदेहोद्भूताभिर्घृणिभिरणिमाद्याभिरभितो
निषेव्ये नित्ये त्वामहमिति सदा भावयति यः ।
किमाश्चर्यं तस्य त्रिनयनसमृद्धिं तृणयतो
महासंवर्ताग्निर्विरचयति नीराजनविधिम् ॥ ३१ ॥

हे षोडशनित्यरूपिणि माते, तुझ्या देहाच्या किरणरूप अणिमादि अष्टसिद्धीकडून सेवित झालेली अशी तूं भगवती मीच आहे अशी जो नेहमीं भावना ठेवतो, तो तुझे त्रिनयन म्हणजे सूर्य, चन्द्र व अग्नि यांनीं अधिष्ठित केलेले द्यु, अंतरिक्ष व भूमि ह्यांच्यांतील वैभवहि क्षुद्र तृणवत् मानतो आणि प्रलयकालरूप अग्निहि त्याला नीरांजन दाखवितो. ( म्हणजे त्याची आरती करतो.

टीपा-- प्रस्तुत श्लोक कैवल्याश्रमानें घेतला नसला तरी लक्ष्मीधरानें व कामेश्वरसूरीनें उद्धृत केला आहे. तसेंच कांहीं हिंदी टीकाकारांनींसुद्धां हा श्लोक वगळला आहे.

मागें श्लोक ११ मध्यें श्रीचक्राचें वर्णन आलेंच आहे. श्रीचक्र म्हणजे भगवतीचा देह होय. श्रीचक्राचें एकंदर नऊ विभाग आहेत. त्यांत शेवटीं म्हणजे सर्वांच्या बाहेर चतुष्कोणात्मक भूपुर आहे. हीं भूपुरें तीन आहेत. त्यांच्या आंत षोडशदल व अष्टदल कमलें आहेत. त्याच्या आंत एक चतुर्दशकोण, दोन दशकोण, एक अष्टकोण व एक त्रिकोण असें कोण आहेत. आणि ह्या सर्वांच्या आंत एक बिन्दु आहे. श्रीचक्राची रचना अशी आहे श्रीचक्र हें भगवतीचें देहरूप असल्यामुळें भगवतीच्या देहातून निघणारे किरणहि श्रीचक्राच्या अवयवांत निवास करतात. यांपैकीं सर्वांत बाहेरचें जें भूपुर आहे त्याचे तीन चतुष्कोण आहेत. त्यांपैकीं सर्वांत *बाहेरच्या चतुष्कोणांत असणाऱ्या अष्ट देवतांचा प्रस्तुत श्लोकांत उल्लेख* आहे. म्हणजे अणिमादि नांवानें उल्लेख आहे. इतर भागांतील-अवयवांतील देवतांचें केवळ सूचन ' आदि ' शब्दानें केलेलें आहे. श्रीत्रिपुरसुन्दरीच्या खड्गमालानामक स्तोत्रांत ह्या सर्व देवतांची नामावली आहे. सर्वांत बाहेर असलेल्या भूपुरांतील देवतांचीं नांवें येणेंप्रमाणें-अणिमा, लघिमा, महिमा, वशित्व, ईशित्व, प्राकाम्य, प्राप्ति व सर्वकामप्रदायिनी. ह्या अष्टसिद्धि त्या ठिकाणीं वास्तव्य करतात. त्याच्या आंतील भूपुरांत ब्राह्मी, माहेश्वरी इत्यादि अष्ट देवता म्हणजे मातृका आहेत नतरच्या तिसऱ्या भूपुरांत सर्वसंक्षोभिणी प्रभृति दहा मुद्रादेवता आहेत. इतर चक्रांतील देवतांचीं नांवें जिज्ञासूनें खड्गमालास्तोत्रांत पाहावीं. अशा स्वरूपाची भगवती मीच आहे अशी भावना ठेवणारा उपासक कल्पांतीहि मृत होत नाहीं. भगवतीच्या चरणापाशीं त्याचा अखंड वास राहतो. अशा अर्थाचा खड्गमालेतील भगवतीच्या ध्यानाचा श्लोक आहे तो असा--

' अरुणां करुणातरङ्गिताक्षीं
धृतपाशाङ्कुशचापबाणहस्ताम् ।
अणिमादिभिरावृतां मयूखै-
रहमित्येव विभावये भवानीम् ॥ '

त्रिनयन म्हणजे सदाशिव. त्रिनयन या शब्दाचें स्पष्टीकरण खालील-प्रमाणें करतां येईल—

१. सूर्य, चंद्र व अग्नि ही शिवाच्या प्राप्तीची तीन नयनें म्हणजे साधनें आहेत म्हणून त्यांना त्रिनयन म्हणतात. २ इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन मार्गांनीं योगमार्गाचा अवलंब करणारे साधक शिवाचा साक्षात्कार घडवून आणतात म्हणून त्यास त्रिनयन असें म्हटलें आहे; किंवा ३ सूर्य, चंद्र व अग्नि हे शिवाचे तीन नेत्र असल्यामुळे त्यांस त्रिनयन म्हटलें आहे.

चतुःषष्ट्या तन्त्रैः सकलमतिसंधाय भुवनं
स्थितस्तत्तत्सिद्धिप्रसवपरतन्त्रैः पशुपतिः ।
पुनस्त्वन्निर्बन्धादखिलपुरुषार्थैकघटना-
स्वतन्त्रं ते तन्त्रं क्षितितलमवातीतरदिदम् ॥ ३२ ॥

त्या त्या विशिष्ट सिद्धि देणें इतकेंच ज्यांचें कार्य आहे अशा चौसष्ट तंत्रांनीं सर्व भुवनाला मोहांत टाकून ( अज्ञानान्धकारांत टाकून ) पशुपति स्थित झाला आहे. पण पुढें पुनः तुझ्या आग्रहास्तव चतुर्विध पुरुषार्थ सिद्ध करून देणारें तुझें एक स्वतंत्र तंत्र त्यानें पृथ्वीवर निर्माण केलें आहे.

टीपा – हीं चौसष्ट तंत्रें त्या त्या विशिष्ट कामनेकरितां म्हणजे त्यांच्या पूर्तीसाठीं आहेत. त्या तंत्रांच्या साध्यानें ज्ञान म्हणजे यथार्थज्ञान दुरावतें आणि या तंत्रांत सांगितल्याप्रमाणें कर्माचरण केल्यास भौतिक वैभव मिळतें परंतु मोक्षज्ञान मिळत नाहीं.

लक्ष्मीधरानें आपल्या टीकेंत चतुःशतीमधील चौसष्ट तंत्रांच्या नांवांच्या उल्लेखाचे पुढील श्लोक उद्धृत केले आहेत—

'चतुःषष्टिश्च तन्त्राणि मातृणामुत्तमानि च ।
महामायाशम्बरं च योगिनीजालशम्बरम् ॥
तत्त्वशम्बरकं चैव भैरवाष्टकमेव च ।
बहुरूपाष्टकं चैव यमलाष्टकमेव च ॥'
चन्द्रज्ञानं मालिनी च महासंमोहनं तथा ।
वामजुष्टं महादेवं वातुलं वातुलोत्तरम् ॥

इच्छेदं तन्त्रभेदं च गुह्यतन्त्रं च कामिकम् ।
कलावादं कलासारं तथान्यत्कुण्डिकामतम् ॥
मतोत्तरं च वीणाख्यं त्रोतल त्रोतलोत्तरम् ।
पञ्चामृतं रूपभेदं भूतोड्डामरमेव च ॥
कुलसारं कुलोड्डीशं कुलचूडामणिस्तथा ।
सर्वज्ञानोत्तरं चैव महाकालीमतं तथा ॥
अरुणेशं मोदिनीशं विकुण्ठेश्वरमेव च ।
पूर्वपश्चिमदक्षं च उत्तरं च निरुत्तरम् ।
विमलं विमलोत्थं च देवीमतमतःपरम् ॥

हीं तंत्रें पार्वतीस परमेश्वरानें म्हणजे शंकरानें सांगितलीं आहेत. ह्यांच्या योगें कामनासिद्धि होते पण मोक्षज्ञान होत नाहीं. परमकारुणिक परमेश्वरानें असलीं तंत्रनिर्मिति करून लोकांची भुलवणी करून वचना कां करावी असा प्रश्न उत्पन्न होतो. ह्या प्रश्नाचें उत्तर लक्ष्मीधरानें कांहींशा समाधानकारक रीतीनें देण्याचा प्रयत्न केला आहे.

ह्या जगांत अनुलोमविलोम इत्यादि भेदांची विविध जाती आहेत ह्या सर्व जातींतील लोक ब्रह्मज्ञान प्राप्त करून देणाऱ्या विद्येचे अधिकारी नसतात. त्याचें चित्त ऐहिक कामनापूर्तीकडेच वेधलेलें असतें. अशाहि लोकांना ऐहिक कामनासिद्धीच्या प्राप्तीसाठीं देवी सामर्थ्य प्राप्त व्हावें ह्यासाठीं हीं चौसष्ट तन्त्रें निर्मिलीं आहेत. अनेक जन्म वासनातृप्ति मिळाल्यावर जीवाला कल्पना येऊं लागतें कीं, आधिभौतिक सुखप्राप्तीचा प्रयत्न केल्यानें पूर्ण सुखप्राप्ति किंवा दुःखनिवृत्तीहि होत नाहीं म्हणून तो आधिदैविक साहाय्याच्या अपेक्षेनें यज्ञयाग, उपासना वगैरे करूं लागतो अशा प्रकार केवळ कर्माच्या मार्गे लागणारा जीव खऱ्या सुखाच्या मार्गापासून दूर राहतो म्हणून तो जीव फसला आहे असे या श्लोकात म्हटलें आहे. ही सर्व सृष्टि ईश्वरानेंच निर्माण केली आहे म्हणजे सर्व सृष्टींतील साहजिकच दैवी साहाय्य बहुत सुकृताच्या योगें निर्माण होतें ह्याची परिपूर्ति होण्यास गणपत्यादि देवता किंवा पंचायतनदेवताराधन आवश्यक आहे अनेक जन्म आराधना करून देवता संतुष्ट झाली कीं, तीः ज्ञानप्राप्तीचा मार्गदर्शन करते ह्या मार्गानेंहि बहुत जन्म प्रवास केल्यावर मगच ब्रह्मज्ञान मिळतें.

'अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।'

'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।'

अशीं गीतावचनेंहि प्रसिद्ध आहेत.

श्लोकांत 'अतिसंधाय' हा शब्दप्रयोग आहे. ह्याचा अर्थ 'फसवून' असा आहे. म्हणजे तीं चौसष्ट तंत्रें ऐहिक सिद्धिच देतात. परमसुखदायक अंतिम मोक्षमार्ग सांगत नाहींत. तो मार्ग वैदिक धर्मानेंच मिळतो. ह्या तंत्रांनी नाहीं. दुसऱ्या शब्दांत सांगणें झाल्यास फसविणें म्हणजे मोक्षमार्गापासून दूर नेणें इतकेंच समजावयाचें आहे. वैदिक मार्ग जाणणारेहि लोक ऐहिक फलाच्या अपेक्षेनें अशा तंत्रमार्गाचा अवलंब करतात. म्हणजेच ते स्वतःला फसवून घेतात.

हीं ऐहिक सिद्धि देणारी तंत्रें परमकारुणिक शंकरानें कां निर्मिलीं ह्याचें उत्तर लक्ष्मीधराटीकेंत पुढीलप्रमाणें आहे—

वैदिककर्माचा अधिकार नसलेल्या शूद्र, अतिशूद्र व अन्यधर्मीय लोक यांच्याकरितां हीं तंत्रें आहेत. जे वैदिकधर्मानुयायी आहेत त्यांच्याकरितां वैदिकधर्मसदृश अशीं आठ तंत्रें आहेत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें— १ चंद्रकला, २ ज्योत्स्नावती, ३ कुलार्णव, ४ कुलेश्वरी, ५ भुवनेश्वरी, ६ बार्हस्पत्य, ७ दुर्वासमत ८ श्रीविद्याप्रतिपादक तंत्र. ह्या तंत्राष्टकप्रणीतमार्गाचा त्रैवर्णिक व शूद्र यांस अधिकार आहे. त्यांतहि दोन प्रकार आहेत— (१) सव्यमार्ग व (२) वाममार्ग. त्यांपैकीं ब्राह्मणादि त्रैवर्णिक उपासक सव्यमार्गानें उपासना करतात व शूद्रादिकांनीं वाममार्ग (पंच मकार)-पूर्वक ती उपासना करावयाची असते. वैदिकमार्गानुयायी उपासकांना योग्य असा अनुष्ठानकलाप सांगणारीं तंत्रें पांच मुनींनी केलीं आहेत. वसिष्ठ, शुक, सनक, सनंदन व सनत्कुमार हे ते मुनी होत. ह्यांनीं केलेल्या तंत्रांस 'शुभागमपंचक' म्हणतात. चंद्रकलादि तंत्राष्टकानें दर्शित मार्गाला 'मिश्रक' असें नांव आहे. तत्पूर्वदर्शित तंत्रांना 'कुलमार्ग' असें म्हणतात. म्हणून या मार्गाच्या उपासकांना 'कौल' म्हणतात. ह्यालाच 'वाममार्ग' असें दुसरें नांव आहे.

दुसरा जो मार्ग आहे तो 'सव्यमार्ग' होय. ह्यालाच 'मिश्रक' असें नांव आहे. कारण तो कुलमार्गाशीं कांहींसा मिश्रित झाला आहे. हे मिश्रक

व कौलमार्ग अनुपादय म्हणजे त्याज्य आहेत वेदानुयायी उपासकांना तिसरा 'शुभागमपंचकप्रथित मार्गच उपादेय म्हणजे स्वीकार्य आहे त्यालाच 'समयमार्ग' असे दुसरे नाव आहे प्रस्तुत श्लोकातील 'सकलपुरुषार्थैक घटनास्वतन्त्र ते तन्त्र' या उक्तींत कोणते तंत्र उद्दिष्ट आहे याविषयी टीकाकारांच्यांत मतभेद आहेत लक्ष्मीधराचे मत हे तंत्र म्हणजे शुभागम पंचक होय कैवल्याश्रमाचे मत हे स्वतंत्र तंत्र 'कादिमत' नावाचे आहे हे तंत्र म्हणजे वामकेश्वरतंत्र होय असें भास्कररायाचे मत आहे इतर काहीं टीकाकार हे तंत्र म्हणजे 'ज्ञानार्णवतंत्र' आहे असे मानतात

शिवः शक्तिः कामः क्षितिरथ रविः शीतकिरणः
स्मरो हंसः शक्रस्तदनु च परामारहरयः ।
अमी हृल्लेखाभिस्तिसृभिरवसानेषु घटिता
भजन्ते वर्णास्ते तव जननि नामावयवताम् ॥ ३२ ॥

हे माते, शिव ( ह ), शक्ति ( स ), काम ( क ), क्षिति ( ल ), नंतर रवि ( ह ), शीतकिरण ( स ), स्मर ( क ), हंस ( ह ), शक्र ( ल ), त्यानंतर परा ( स ), मार ( क ), हरि ( ल ) आणि ह्या वर्णांत किंवा त्यांच्या तीन विभागांपैकीं प्रत्येकाच्या शेवटीं एकेक हृल्लेखा ( ह्रीं ), अशा प्रकारें हे मंत्रवर्ण तुझ्या नावाचे अवयव आहेत

टीपा -ही जी पंचदशाक्षरी विद्या प्रस्तुत श्लोकांत उद्धृत केली आहे ती 'कादिविद्या' आहे असें लक्ष्मीधर व कामराजसूरि म्हणतात पण कैवल्याश्रममतें ती 'हादिविद्या' होय आणि हेंच मत सयुक्तिक आहे कारण पुढील श्लोकांतच 'कादिविद्या' सांगून 'हादिविद्येचा' फरक स्पष्ट केला आहे म्हणून प्रस्तुत श्लोकांत हादिविद्याच सांगितल्याचे दिसतें वास्तविक ह्या हादिविद्या व कादिविद्या अत्यंत गोपनीय आहेत याविषयीं वचन असें आहे कीं—

सच्छिष्यायोपदेष्टव्या गुरुभक्ताय सा कला । म्हणजे सच्छिष्यानें सद्गुरूपासूनच ह्या विद्या घ्याव्यात त्रिपुरोपनिषदांत सांगितले आहे कीं—

'यस्य वा पश्चिमं जन्म यदि वा शंकरः स्वयम् ।
तेनैव लभ्यते विद्या श्रीमत्पञ्चदशाक्षरी ॥'

या वचनांत सांगितल्याप्रमाणें पंचदशाक्षरींतील वर्णापूर्वी 'श्री' हें बीजाक्षर जोडलें म्हणजे ती 'षोडशाक्षरी विद्या' होते. जो उपासक जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त झाला आहे त्यालाच ही विद्या प्राप्त होते. या पंचदशी विद्यानुष्ठानाचे प्रकार गुरुगम्य म्हणून 'गुह्याद् गुह्यतर' असल्यामुळें येथें अनिर्वचनीय आहेत. या विद्येस आधारभूत म्हणून विपुल वैदिक वचनें उद्धृत करून लक्ष्मीधरानें आपल्या टीकेंत ऊहापोह केला आहे. प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत एकंदर पंधरा तिथि. त्यांची नांवें येणेंप्रमाणें-दर्शा, दृष्टा, दर्शता, विश्वरूपा, सुदर्शना, आप्यायमाना, आप्यायमाना, आप्याया, सूनृता, इरा, आपूर्यमाणा, आपूर्यमाणा, पूरयन्ती, पूर्णा व पौर्णमासी. यांनाच कला म्हणतात. याला आधारभूत असें सुभगोदयांतील वचन पाहा—

'दर्शाद्याः पूर्णिमान्ताश्च कलाः पञ्चदशैव तु ।
षोडशी तु कला ज्ञेया सच्चिदानन्दरूपिणी ॥'

भगवतीच्याहि सोळा कला आहेत. कोणत्या तिथीला त्रिपुरसुंदरीच्या कोणत्या कलेची उपासना करावी हें लक्ष्मीधरानें आपल्या टीकेंत दिलें आहे तें असें--

'प्रतिपदि त्रिपुरसुन्दरीकला ध्येया । द्वितीयायां कामेश्वरीकला । तृतीयायां भगमालिनीकला । चतुर्थ्यां नित्यक्लिन्नाकला उपास्या । पञ्चम्यां भेरुण्डाख्या कला । षष्ठ्यां वह्निवासिनीकला । सप्तम्यां महाविद्ये ( वज्रे ) श्वरीकला । अष्टम्यां रौद्रीकला । नवम्यां त्वरिताकला । दशम्यां कुलसुन्दरीकला । एकादश्यां नीलपताकाख्या कला । द्वादश्यां विजयाख्या कला । त्रयोदश्यां सर्वमङ्गलाख्या कला । चतुर्दश्यां ज्वालाख्या कला । पञ्चदश्यां मालिन्याख्या कला ।'

ह्या श्रीविद्येचें अनुष्ठान दोन प्रकारें होतें—

( १ ) बहिर्मुख होऊन मूर्तीची किंवा यंत्राची बाह्यपूजा आणि ( २ ) अंतर्मुख होऊन भगवतीचें ध्यान करणें.

वाममार्गी व मिश्रकतंत्रानुसारी उपासक बाह्यपूजारत असतात. पण जे ब्रह्मजिज्ञासु वैदिकोपासक आहेत ते अंतराराधनपर असतात. ह्यास आधारभूत वचनें सनत्कुमारसंहितेंत आहेत, तीं पुढीलप्रमाणें--

'बाह्यपूजा न कर्तव्या कर्तव्या बाह्यजातिभिः ।
सा क्षुद्रफलदा नृणामैहिकार्थैकसाधनात् ॥

बाह्यपूजारता कौला क्षपणाश्च कपालिका ।
दिगम्बराश्चेतिहासा वामकास्तन्त्रवादिन ॥
आन्तरारावनपरा वैदिका ब्रह्मवादिन ।
जीवन्मुक्ताश्चरन्त्येते त्रिषु लोकेषु सर्वदा ॥ '

वरील श्लोकात उल्लेखिलेल्या श्रीविद्येच्या मन्त्रवर्णाचे तीन खंड आहेत (१)पञ्चाक्षरी(२) षडक्षरी व (३) चतुरक्षरी प्रत्येक खंडाच्या अंती ह्रींकार आहे भगवती ही वाग् रूपिणी असल्यामुळे मन्त्रवर्ण हेहि भगवतीचेच रूप आहे म्हणजे ते भगवतीमयच आहेत

तसेच त्रिलोकी हेहि भगवतीचेच रूप आहे त्या त्रिलोकी म्हणजे त्रैलोक्याच्या अधिष्ठात्री देवता--अग्नि, सोम व सूर्य ह्या आहेत मन्त्रातील तीन खण्डे हे तीन लोक व त्यांच्या देवताहि दर्शवितात म्हणूनच त्रिलोकी व अग्न्यादि देवतात्रय हीं भगवतीचींच रूपें होत पृथिवी, अंतरिक्ष व द्यु अचेतन आहेत व त्यांच्या अग्न्यादि देवता मात्र चेतना निर्माण करतात पञ्चदशीच्या तीन खण्डांतून ह्रींकार वगळून जे शेष राहतात ते त्रिलोकीचे दर्शक आहेत आणि प्रत्येक खंडाच्या अंतीं असलेला ह्रींकार अग्न्यादि देवतात्रयरूपानें त्रिलोकींत चैतन्यशक्ति निर्माण करतात म्हणून ह्या तीन देवतांच्या दर्शक असणाऱ्या तीन ह्रींकारांना प्राणशक्ति असे म्हटले आहे हे सर्व भगवतीमयच आहे ह्रींकाररहित मन्त्र निर्जीव असतात ह्रींकार हा त्यांत प्राणशक्ति निर्मितो मनुष्याच्या अचेतन देहात प्राण असेल तरच चैतन्य राहतें असें हें मन्त्रवर्णन किंवा मन्त्रमाहात्म्य आहे कामराजसूरींनीं आपल्या टीकेंत एतदर्थक पुढील श्लोक उद्धृत केले आहेत—

' शिवाविनाभूतशक्ति स्वतन्त्रा निरुपप्लवा ।
समस्त व्याप्य भुवनमीष्टे तेनेश्वरी मता ॥
व्यापृत तेन सकलमनया चिद्विलासया ।
यस्मादखिलजीवाना मन्त्राणामपि सर्वश ॥
हृदि लेखेव जागर्ति प्राणशक्तिरिय परा ।
हृल्लेखा कथ्यते तस्मान्मायेवाचिन्त्यवैभवा ॥
अनया रहिता सर्व निर्जीवा मन्त्रराशय ।
अतस्तु सर्वमन्त्राणामियमुद्ध धनी मता ॥ '

स्मरं योनिं लक्ष्मीं त्रितयमिदमादौ तव मनो-
र्निधायैके नित्ये निरवधिमहाभोगरसिकाः ।
भजन्ति त्वां चिन्तामणिगुणनिबद्धाक्षवलयाः
शिवाग्नौ जुह्वन्तः सुरभिघृतधाराहुतिशतैः ॥ ३४ ॥

जे उपासक अपरिमित ऐश्वर्य व सुख यांची इच्छा करणारे असतात, ते ह्या तुझ्या मत्राच्या प्रारंभीच्या तीन बीजांच्या स्थानी स्मर ( क ), योनि ( ए ), व लक्ष्मी ( ई ) हीं नरबीजें वापरून चिन्तामणि सूत्रामध्यें अक्षवलय बांधून व शिवाग्नीमध्यें कामधेनूच्या तुपाच्या शेंकडों धारांनी आहुति देऊन तुझें भजन करतात.

**टीपा** — प्रस्तुत श्लोकातील चिन्तामणिगुण अक्षवलय आणि शिवाग्नि ह्या शब्दांचे भिन्नभिन्न अर्थ टीकाकारांनी केले आहेत.

चिन्तामणि म्हणजे कमलबीजें असा अर्थ काहीं टीकाकार करतात. पण कांहींच्या मतें चिन्तामणिगुणनिबद्धाक्षवलय याचा निराळाच गूढार्थ आहे. अनेक चिन्तारूपी जे मणि आहेत त्यांचा अक्षमालिकेशीं योग करावयाचा अक्षमालिका म्हणजे मातृकावर्ण. ते अक्षानीं म्हणजे वर्णमालारंभीच्या ‘ अ ’ व अन्त्याक्षर ‘ क्ष ’ ह्यांनीं गुंफित करावयाचे म्हणजे सर्व चिन्ता दूर होतात. आणि अशा प्रकारचा मत्रजप हृदयात भगवतीच्या ध्यानाचे वेळी करावयाचा असतो ह्या ध्यानानें सर्व चिन्ता नष्ट होतात शिवाग्नि हा अग्नि अत्यत कल्याणकारी व अपरिमित ऐश्वर्य देणारा म्हणून त्यास शिवाग्नि म्हटले आहे. कादिविद्या ही मोक्षदात्री असूनहि अपरिमित ऐहिक भोगदात्रीहि आहे. ह्यास प्रमाणभूत श्लोक असा—

‘ यत्रास्ति मोक्षो न हि तत्र भोगो
यत्रास्ति भोगो न हि तत्र मोक्षः ।
श्रीसुन्दरीसेवनतत्पराणा
भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ॥ ’

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, पंचदशाक्षरी मत्राच्या प्रारभीं उपरिनिर्दिष्ट बीजें योजून चिन्तामणिरत्नाच्या मण्यांची माला हातांत धारण करून हृदयाच्या वेदीवर स्थापित केलेल्या शिवशक्तिस्वरूप अग्नीमध्यें मंत्ररूपी

कामधेनूच्या तुपाची आहुति देतात त्यांना ऐहिक ऐश्वर्य प्राप्त होऊन शेवटीं मोक्षप्राप्तीहि होते.

शरीरं त्वं शंभोः शशिमिहिरवक्षोरुहयुगं
नवात्मानं मन्ये भगवति नवात्मानमनघम् ।
अतः शेपः शेपीत्ययमुभयसाधारणतया
स्थितः संबन्धो वा समरसपरानन्दपरयोः ॥ ३५ ॥

हे भगवति, सूर्यचंद्ररूपी स्तनद्वय असलेलें तुझें अत्यंत रमणीय शरीर शिवाचेंच शरीर आहे असें वाटतें. म्हणून एकरूपतेच्या दृष्टीनें भगवान् शंकर व भगवती यांच्यामध्यें शेप व शेपी यांचा संबंध म्हणजे गौणमुख्यभाग उभयतांनाहि लागू पडतो.

टीपा—यापूर्वींच्या दोन श्लोकांत हादि व कादि विद्यांचें विवेचन आलें आहे. हादिविद्या ही मोक्षदात्री व कादिविद्या भोगदात्री आहे. या दोन विद्यांमध्यें वरीलप्रमाणें भेद दिसतो म्हणून शिवशक्तीमध्येंहि भेद मानणें युक्त नव्हें असें प्रस्तुत श्लोकांत सांगितलें आहे.

भगवती व भगवान् या दोन शब्दांचे भिन्न भिन्न अर्थ होऊं शकतात, याविषयीचें खालील दोन श्लोक पाहा—

'उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम् ।
वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥'
'ऐश्वर्यस्य समग्रस्य शौर्यस्य यशसः श्रियः ।
ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥'

यांतील प्रथमच्या श्लोकांत सांगितलेल्या उत्पत्त्यादिकांचें ज्ञान असलेला किंवा जो ऐश्वर्यादि षड्गुणांनीं संपन्न असतो त्यास भगवान् ही संज्ञा आहे. वरील दोन श्लोकांतील वर्णन श्रीत्रिपुरसुंदरीच्या बाबतींत अगदीं सार्थ असल्यामुळें तिला भगवती म्हटलें आहे. शिवाय शिव हा भगवान् आहे म्हणून त्याच्याशीं एकरूप असलेली शक्ति ही भगवती आहे. अरुणामोदिनीटीकेंत भग शब्दाचा आणखी एक अर्थ दिला आहे. तो असा—

'भगः शक्तिर्भगवान् काम ईशः' इति श्रुतिः

म्हणजे भग हा शक्तिवाचक शब्द आहे. भगानें म्हणजे शक्तीनें युक्त जो

ईश तो भगवान् म्हणजे कामेश्वर. कामेश्वरीरूपिणी देवी कामेश्वरशिवाशीं एकरूप असल्यानें तिला भगवती असें म्हटलें आहे.

सूर्य व चंद्र हे भगवतीचे स्तन असल्याचें प्रस्तुत श्लोकांत वर्णिलें आहे. ह्यास आधारभूत वचन असें—

'सूर्यचन्द्रौ स्तनौ देव्यास्तावेव नयने स्मृतौ।
उभौ ताटङ्कयुगलमित्येषा शाश्वती श्रुतिः॥'

आनन्दभैरव नांवाचें शंकराचें एक रूप आहे. त्याच्या नवव्यूहात्मक रूपात असलेल्या कालव्यूहांत सूर्य व चंद्र यांचा अंतर्भाव असल्यामुळें शिवाचें संबंधींहि वक्षोरूहयुगत्वारोपण हें योग्यच आहे.

प्रस्तुत श्लोकांत भगवतीस 'नवात्मा' म्हटलेलें आहे. या शब्दाचे भिन्न भिन्न अर्थ होतात. प्रथम त्याचे कांहीं अर्थ पुढें दिले आहेत. कालिदासानें शंकराच्या आठ मूर्ति शाकुंतलनाटकाच्या नांदीमध्यें ('या सृष्टिः स्रष्टुराद्या' इत्यादि) उल्लेखिल्या असून त्यांस नमन केलें आहे तेंच अष्टमूर्तित्व भगवती श्रीत्रिपुरसुंदरीचेंहि आहे हें सकलजननीस्तवांतील पुढील श्लोकावरून स्पष्ट होतें—

'भुवि पयसि कृशानौ मारुते खे शशाङ्के
सवितरि यजमानेऽप्यष्टधा शक्तिरेका।
वहसि कुचभराभ्यां या विनम्रापि विश्वं
सकलभुवनमातः पाहि मामित्यवोचम्॥'

याप्रमाणें शिवशक्ती या उभयतांचेंहि अष्टमूर्तित्व एकच आहे आणि सौंदर्यलहरींतील पहिल्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें शिव जर शक्तियुक्त असेल तरच तो कार्यक्षम असतो, नाहीं तर तो निष्क्रिय असतो. म्हणजेच शिवयोगें शक्ति ही कार्यकारिणी असते अशाच अर्थाचा सकलजननीस्तवांतील श्लोक पुढीलप्रमाणें आहे—

'त्वयासौ जानीते रचयति भवत्येव सकलं
त्वमेवैतत्सर्वं त्वमसि तनवोऽप्यस्य विविधाः।
गतः साम्यं शंभुर्वहति परमं व्योम वपुषा
तयाप्यर्धं भूत्वा विहरसि शिवस्येति किमिदम्॥'

वरील श्लोकात वर्णन केल्याप्रमाणें शंभु हाहि भगवतीचेंच मूर्तिरूप होय असें हें भगवतीचें नवमूर्तित्व प्रस्तुत श्लोकात भगवतीस 'नवात्मा' या नांवानें संबोधून उल्लेखिलें आहे

'नवात्मा' शब्दाचा अन्य अर्थ टीकाकारानें दिला आहे तो असा— शिवाचें आनंदभैरवनामक रूप नवव्यूहात्मक आहे म्हणून त्यास 'नवात्मा' असें म्हणतात ते नवव्यूह पुढीलप्रमाणें—

'कालव्यूहः कुलव्यूहो नामव्यूहस्तथैव च।
ज्ञानव्यूहस्तथा चित्तव्यूहः स्यात्तदनन्तरम्॥
नादव्यूहस्तथा बिन्दुव्यूहः स्यात्तदनन्तरम्।
कलाव्यूहस्तथा जीवव्यूहः स्यादिति ते नव॥'

(१) यातील कालव्यूह म्हणजे 'निमेषापासून कल्पातापर्यंतचा वाढत्या क्रमानें असलेला कालसमुदाय. सूर्य व चंद्र हे एका अर्थी ह्या कालाचें कारण असल्यामुळें त्याचाहि अंतर्भाव कालव्यूहात होतो

(२) कुलव्यूह म्हणजे नीलादिवर्णांनीं दिसणारा रूपसमुदाय उपनिषदांतील 'नामरूपे व्याकरवाणि' या वचनातील विविध रूपसमुच्चय हा कुलव्यूह होय.

(३) नामव्यूह हा वरील वचनातील नामात्मक ब्रह्मपरिणाम होय

(४) ज्ञानव्यूह म्हणजे उपनिषदोक्त 'आनन्दं ब्रह्मणो विद्वान्' या वचनातील आनन्द हा ज्ञानव्यूह होय

(५) चित्तव्यूह म्हणजे अहंकारादि पंचस्कंध अर्थात् अहंकार, चित्त, बुद्धि, महत् व मन या पांच स्कंधानीं युक्त तो चित्तव्यूह होय

(६) नादव्यूह म्हणजे परा, पश्यन्ती इत्यादि वाणीचीं रूपें व इच्छा, राग वगैरे मनाचे विकार यांना प्रयत्नस्कंध म्हणतात तोच नादव्यूह होय

(७) बिन्दुव्यूह म्हणजे मूलाधारादि षट्चक्रस्कन्ध

(८) कलाव्यूह म्हणजे पंचाशत् मातृका होत त्यास वर्णस्कन्ध असेंहि म्हणतात

(९) जीवव्यूह म्हणजे उपनिषदांतील 'अनेन जीवेन आत्मनानुप्रविश्य' यांत वर्णन केल्याप्रमाणें ब्रह्माचें जीवरूपानें सृष्टींत प्रविष्ट होणें व

जीवरूपानें जगांतील सुखदुःखाचें भोक्तृत्व ब्रह्मानें स्वीकृत करणें. याला भोक्तृस्कंध म्हणतात.

अशा प्रकारें नवव्यूहात्मक शिव शक्तीशीं एकरूप असल्यामुळें भगवतीला नवात्मा म्हटले आहे.

भगवतीला मातृका म्हणजे माता म्हणतात. ती विश्वांत मातृकारूपानें परिणत झाली आहे. ह्या मातृका पन्नास असून त्यांचे नऊ वर्ग आहेत—(१) अवर्ग, (२) कवर्ग, (३) चवर्ग, (४) टवर्ग, (५) तवर्ग, (६) पवर्ग, (७) यरलववर्ग, (८) शषसहवर्ग आणि (९) एकाक्षरी क्षवर्ग. ह्या नववर्गात्मक मातृका मातृरूपच म्हणजे भगवतीरूपच आहेत. म्हणूनहि भगवतीला नवात्मा म्हटलें आहे.

कुण्डलिनीमार्गातील सहाव्या आज्ञाचक्रानतर कुण्डलिनीरूप भगवतीला सहस्रदलकमलांत जाण्यापूर्वी नऊ बिंदूतून जावें लागतें. ते बिंदु असे—(१) बिंदु, (२) अर्धचन्द्र, (३) रोधिनी, (४) नाद, (५) नादान्त, (६) शक्ति, (७) व्यापिनी, (८) समना व (९) उन्मना. ह्या उन्मनींतून वर गेल्यावर कुण्डलिनी शक्ति शिवाशीं एकरूप होते. यास आधारभूत वचन सौंदर्यलहरींतीलच श्लोक ९ मधील असें—'सहस्रारे पद्मे सह रहसि पत्या विहरसे'

या सहस्रदलकमलांत पोहोंचण्यापूर्वी कुण्डलिनीला ज्या स्थानांतून जावें लागतें तीं शक्तिरूपच असल्यानें भगवतीला नवात्मा असें म्हटलें आहे.

श्रीचक्रहि नवचक्रात्मक आहे. शिव व शक्ति ही एकरूप असल्यानें या नवचक्रात्मक श्रीचक्राला भगवतीरूप मानून प्रस्तुत श्लोकांत नवात्मा भगवती असें वर्णिलें आहे

शक्ति ही विश्वरूपिणी आहे आणि उपासक हा शक्तिरूपच असतो. वामकेश्वरतंत्रांत सांगितल्याप्रमाणें उपासकाचा देह नऊ तत्त्वांनीं झाला आहे. तीं तत्त्वें अशीं—

त्वक्, असृक्, मांस, मेद व अस्थि हीं पांच तत्त्वें शक्तिरूप असून मज्जा, शुक्र, मन व जीव ही चार तत्त्वें शिवरूप आहेत. अशा प्रकारें शिव-शक्तिरूपिणी भगवती देहांत नऊ तत्त्वरूपांनीं राहिली आहे. म्हणूनहि भगवती नवात्मा आहे असें म्हणतां येईल.

याप्रमाणें भगवतीचें नानात्मत्व नानाप्रकारें सिद्ध होतें अशा रीतीनें नामदृष्ट्या व स्वरूपदृष्ट्या भगवान् शंकर व भगवती एकमेकांशीं पूर्णपणें समरस असल्यानें त्यांच्यांतील गौणमुख्यभाव उभयतामध्यें साधारण आहे दोघांपैकीं कोण मुख्य व कोण गौण हें सांगतां येणार नाहीं

मनस्त्वं व्योम त्वं मरुदसि मरुत्सारथिरसि
त्वमापस्त्वं भूमिस्त्वयि परिणतायां न हि परम् ।
त्वमेव स्वात्मानं परिणमयितुं विश्ववपुषा
चिदानन्दाकारं शिवयुवति भावेन बिभृषे ॥ ३६ ॥

हे शिवयुवति, तूच मन आहेस, तू आकाश आहेस, तू वायु, अग्नि, जल व पृथ्वी आहेस अशा प्रकारें तू परिणत झाल्यावर तुझ्याहून या विश्वांत अन्य कांहीं राहात नाहीं अशा प्रकारें विश्वरूपी शरीरानें परिणत होण्यासाठीं स्वच्छेनें चिद्रूप व आनंदरूप तू धारण करतेस

टीपा—उपरोक्त अर्थाच्या श्रुती पुढीलप्रमाणें आहेत—

'तदेवाग्निस्तद्वायुस्तत्सूर्यस्तदु चन्द्रमा ।'

'एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ।'

श्रीगणपत्यथर्वशीर्षांतहि अशाच प्रकारचें वर्णन आहे—

'त्वं ब्रह्मा त्वं विष्णुस्त्वं रुद्रस्त्वमिन्द्रस्त्वमग्निस्त्वं सूर्यस्त्वं चन्द्रमास्त्वं ब्रह्म भूर्भुवः स्वरोम् ।'

'त्वं भूमिरापोऽनलोऽनिलो नभः । त्वं चत्वारि वाक्पदानि ।'

पुरुषसूक्तांतील 'चन्द्रमा मनसो जातः' इत्यादि मन्त्रांनेंहि वरील विधानाला पुष्टि मिळते

भगवती ही त्रैलोक्योत्पत्तिकारिणी आहे हें दर्शविण्यासाठीं लक्ष्मीधरानें चतुःशतीमधील पुढील वचनें उद्धृत केली आहेत—

'शृणु देवी महाज्ञानं सर्वज्ञानोत्तमं प्रिये ।
येन विज्ञानमात्रेण भवाब्धौ न निमज्जति ॥
त्रिपुरा परमा शक्तिराद्या जाता महेश्वरी ।
स्थूलसूक्ष्मविभागेन त्रैलोक्योत्पत्तिमातृका ॥

कवलीकृतनिःशेषतत्त्वग्रामस्वरूपिणी ।
यस्या परिणतायां तु न किंचित्परिशिष्यते ॥ '

सकलजननीस्तवांतील पुढील श्लोक एतदर्थकच आहे तो पाहा—

' महीपाथोवह्निश्वसनवियदात्मेन्दुरविभि–
र्वपुर्भिर्मिस्ताशैरपि तव कियानम्ब महिमा ।
अमून्यालोक्यन्ते भगवति न कुत्राप्यणुतरा–
मवस्थां प्राप्तानि त्वयि तु परमव्योमवपुषि ॥ '

मन इत्यादि षट्तत्त्वाच्या रूपानें भगवती परिणत झाल्याचें वर्णन प्रस्तुत श्लोकांत आले आहे. त्या षट्तत्त्वांचें वर्णन पुढील सहा श्लोकांत सांगितले आहे

विश्व हें अचेतन असल्यामुळें तें सृष्टिसंहारादि विक्रियेला प्राप्त होतें, म्हणून तें विनाशी आहे असें कांहीं तत्त्वज्ञ म्हणतात. ब्रह्मसूत्रांतील ' जन्माद्यस्य यतः ' या सूत्रानुसार जगालाहि सृष्टि, स्थिति व लय आहेत. हीं दोन मतें स्थूलमानानें सारखीं वाटतात पण त्यांत भेद आहे पहिल्या प्रकारच्या तत्त्वज्ञानात सृष्ट्युत्पत्तीचें मूळ कारण कोणतें हे सांगितलें नाहीं. पण दुसऱ्या तत्त्वज्ञानाप्रमाणें सगुण ब्रह्म हें जगाचें आदिकारण असून जेव्हा जगाचा लय होतो तेव्हा हे बाह्य विश्व आपल्या मूलकारणात म्हणजे सगुण ब्रह्मांत विलीन होतें, पण नष्ट होत नाहीं. कारणरूपानें त्याच अस्तित्व चालूच असतें. कार्याचा कारणांत लय होणें हा मूल सिद्धान्तच आहे गीतेंतहि म्हटले आहे कीं, ' नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः । '

दुसऱ्या एका टीकाकारानें ह्या श्लोकात निर्दिष्ट केलेल्या सहा तत्त्वाचा कुण्डलिनीमार्गातल्या सहा चक्रांशीं सबध जोडून दाखविला आहे मागील एका लोकात ( श्लोक १० मध्यें ) सांगितलेच आहे कीं, शिवाशीं विहार करणारी शक्ति कुण्डलिनीमार्गानें खालीं येऊन मूलाधारचक्रात साडेतीन वेटोळीं करून निद्रित होते. याप्रमाणें पराशक्तीचें स्थान सहस्रदलकमल आहे व इतर मनादि सहा तत्त्वें जीं प्रस्तुत श्लोकात उल्लेखिलेलीं आहेत तीं कुण्डलिनीमार्गातल्या आज्ञादि मूलाधारान्त चक्रांशीं सबधित आहेत तसेंच भूः पासून सत्य पर्यंत जे सात लोक आहेत ते व त्याच्या देवता याचाहि मूलाधारादि चक्रांशीं सबध आहे, ते त्या टीकाकारानें कोष्टकरूपानें स्पष्ट केलें आहे तें कोष्टक असें—

| तत्त्वें | लोक | देवता | चक्रें |
|---|---|---|---|
| १ चित् | सत्य | परा शक्ति | सहस्रदलकमल |
| २ मन | तपस् | शिव | आज्ञाचक्र |
| ३ आकाश | जन | सदाशिव | विशुद्धिचक्र |
| ४ वायु | महस् | महेश्वर | अनाहतचक्र |
| ५ तेज | सुवस् | रुद्र | स्वाधिष्ठानचक्र |
| ६ अप् | भुवस् | विष्णु | मणिपूरचक्र |
| ७ पृथ्वी | भू | ब्रह्मा | मूलाधारचक्र |

उपरोक्त कोष्टकांतील वर्णन सर्व कांहीं चक्रवर्णनाशीं जुळत नाहीं. याचें स्पष्टीकरण पुढील श्लोकावरील टीपेंत केलें आहे.

शिवाशीं समरस होऊन परमानंद अनुभवणारी भगवती विश्वरूपानें कशी परिणत होते तें प्रस्तुत श्लोकांत सांगितलें आहे. वर उद्धृत केलेल्या सकलजननीस्तवांतील श्लोकांतहि हेंच सांगितलें आहे. तसेंच चतुःशती-मधील वर उद्धृत केलेल्या श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, भगवती ही निःशेषतत्त्वग्रामस्वरूपिणी आहे आणि ती परिणत झाली म्हणजे तिच्याहून अन्य कांहीं परिशेष राहात नाहीं. यावरून हें स्पष्ट आहे कीं, या स्तोत्रांत 'मायावादा' चा अंगीकार केला नाहीं. ज्याला आपण परिणामवाद म्हणतो तोच ह्या तत्त्वज्ञाला मान्य आहे. आद्य शंकराचार्य किंवा इतर कोणी शांकरपीठावरील आचार्य हे सौंदर्यलहरीचे कर्ते आहेत असें मानलें म्हणजे साहजिकच हें सिद्ध होतें कीं, हे स्तोत्रकार शंकराचार्य मायावादी नाहींत.

तवाज्ञाचक्रस्थं तपनशशिकोटिद्युतिधरं
परं शम्भुं वन्दे परिमिलितपार्श्वं परचिता ।
यमाराध्यन् भक्त्या रविशशिशुचीनामविषये
निरालोके लोके निवसति हि भालोकभवने ॥३७॥

हे भगवति, तुझ्या आज्ञाचक्रांत असलेल्या कोटिशः सूर्य, चंद्र व अग्नि यांचें तेज धारण करणाऱ्या आणि पराचिच्छक्तीशीं ज्याचा पार्श्वभाग एकरूप झाला आहे त्या शंभूला मी नमन करतों. त्याचें

भक्तीनें जो आराधन करतो, तो सूर्य, चंद्र व अग्नि हेहि जेथें पोहोंचूं शकत नाहींत आणि प्रकाश ज्या लोकीं राहात नसूनहि जो लोक स्वयंप्रकाशित आहे, अशा लोकांत वास करतो.

टीपा — ह्या व पुढील पांच श्लोकांत विश्वांतील षटतत्त्वांनीं ही भगवती देवी कशी परिणत झाली आहे तें सांगितलें आहे. प्रथम प्रस्तुत श्लोकांत आज्ञाचक्राचें वर्णन आहे. सर्वांत सूक्ष्म जे मनस्तत्त्व तें ह्या चक्राशीं संबद्ध आहे. त्या स्थानीं शंभु व परचित् रूपानें मूळ शिवशक्ति स्थित आहेत. ह्या देवता मागील श्लोकांवरील टीपेंत दिलेल्या कोष्टकांतील देवतांहून भिन्न आहेत. तसेंच ललितासहस्रनामांतहि षट्चक्रासंबंधीं उल्लेख आहे व तेथें भगवती त्रिपुरसुंदरी कोणत्या रूपानें आहे तेंहि सांगितलें आहे. ललितासहस्रनामांतील हें वर्णन पुढीलप्रमाणें आहे—

> ' आज्ञाचक्राब्जनिलया शुक्लवर्णा षडानना ॥
> मज्जासंस्था हंसवती मुख्यशक्तिसमन्विता ।
> हरिद्रान्नैकरसिका हाकिनीरूपधारिणी ॥ '

पण हाकिनी हें नांवहि मागील कोष्टकांत नाहीं. तसेंच योगमार्गीयांच्या कुण्डलिनी उत्थापनेच्या प्रकारांत षट्चक्रें-षट्कमलाकार चक्रें भिन्न भिन्न दलयुक्त, त्यांतील वर्णमालेचे वर्ण व त्या दलमध्यभागीं त्या चक्राची अधिष्ठात्री देवता ह्यांचें वर्णनहि वरील कोष्टकांतील ह्या स्तोत्रवर्णनाशीं व ललितासहस्रनामांतील वर्णनाशीं जुळत नाहीं. याविषयींचें संपूर्ण विवेचन श्लोक ४२ वरील टीपेंत केलें आहे.

प्रस्तुत श्लोकावरील अरुणामोदिनीटीकेंत असें म्हटलें आहे कीं, भगवतीला विशिष्ट रूप नाहीं. सहा तत्त्वें हीं परिणामरूप होत. भगवतीस आज्ञाचक्राचें रूप कसें आलें, याचें उत्तर हे कीं, उपासकांना साधनसौकर्य मिळावें म्हणून भगवतीनें हें रूप धारण केलें आहे असें समजावें. लक्ष्मीधर या टीकाकाराच्या मतें ' तवाज्ञाचक्रस्थं ' ह्यांतील साधकाच्या भ्रूमध्यान्तर्गत असलेलें आज्ञाचक्र श्लोक ११ मध्यें सांगितल्याप्रमाणें श्रीचक्रान्तर्गत चार शिवचक्रें समजावींत. आज्ञाचक्र हें द्विदलपद्म नव्हे. म्हणजे लक्ष्मीधराच्याहि मतें स्तोत्रान्तर्गत हें भगवतीचें वर्णन कुण्डलिनीयोगाशीं जमणारें नव्हें.

श्लोक १४ मध्यें सांगितल्याप्रमाणें मनस्तत्त्वामध्यें भगवतीचें चौसष्ट किरण आहेत. हें वर्णनहि द्विदल आज्ञाचक्रास लागूं नाहीं. म्हणूनच या सहा

श्लोकांत आज्ञादि चक्रांचें केलेलें वर्णन मनुष्यदेहान्तर्गत कुण्डलिनीमार्गाच्या चक्रांशीं जमत नाहीं. म्हणजेच या स्तोत्रांतील हीं सहा चक्रें वैयक्तिक षट्चक्रांशीं संबद्ध नाहींत.

विशुद्धौ ते शुद्धस्फटिकविशदं व्योमजनकं
शिवं सेवे देवीमपि शिवसमानव्यवसिताम् ।
ययोः कान्त्या यान्त्या शशिकिरणसारूप्यसरणि
विधूतान्तर्ध्वान्ता विलसति चकोरीव जगती ॥ ३८॥

विशुद्धिचक्रामध्यें शुद्ध स्फटिकासारखा निर्मल आणि आकाशतत्त्वाचा उत्पादक असा शिव आणि शिवासारखींच जिचीं कार्यें आहेत अशी देवी, ह्या उभयतांची मी उपासना करतों. चंद्रकिरणांशीं सदृश असणाऱ्या ह्या दोघांच्या दीप्तीनें जिचा अन्तर्मल निघून गेला आहे अशी त्रिलोकी चकोरीसारखी विलास करते.

टीपा—आज्ञाचक्रानंतरचें कंठस्थानीं असलेलें जें विशुद्धिचक्र आहे त्याचें माहात्म्य प्रस्तुत श्लोकांत सांगितलें आहे. भगवान् शिव हे व्योमतत्त्वाचें म्हणजे आकाशतत्त्वाचे जनक आहेत. यास आधारभूत असें श्रुतिवचन पुढीलप्रमाणें—

' तस्माद्वा एतस्मादात्मनः आकाशः संभूतः । '

विशुद्धिचक्रांत शिवांना व्योमेश्वर असें म्हणतात. तसेंच देवीला व्योमेश्वरी ही संज्ञा प्राप्त होते.

' शिवसमानव्यवसिताम् ' विश्वाची उत्पत्ति, स्थिति इत्यादि कार्यें जीं शिवाचीं आहेत तींहि तुझींच आहेत. वास्तविक भगवती ही ब्रह्मा, विष्णु व महेश यांना विश्वाचीं कार्यें नेमून देऊन त्यांच्याकडूनच ही कार्यें करवून घेत असते. विशुद्धिचक्रांत शिवशक्तीचें ध्यान केल्यानें तिची कृपा प्राप्त होऊन साधकाचें अज्ञान संपूर्ण नष्ट होतें आणि चंद्रप्रकाशांत चकोरी जशी आनंदमय होऊन राहते तशी स्थिति उपासकाला प्राप्त होते.

समुन्मीलत्संवित्कमलमकरन्दैकरसिकं
भजे हंसद्वन्द्वं किमपि महतां मानसचरम्।
यदालापादष्टादशगुणितविद्यापरिणति-
र्यदादत्ते दोषाद् गुणमखिलमद्भ्यः पय इव ॥ ३९ ॥

महान् उपासकांच्या मनोरूपी मानस सरोवरामध्यें विहार करणारें आणि विकास पावणाऱ्या 'संवित्' रूपी कमलांतील मधूचें आस्वादन करण्यांतच आनंदित होणारें जें हंसयुगल आहे त्याची मी भक्ति करतों. त्या हंसदांपत्याच्या आलापानें अठरा विद्या परिणत होतात. हंस जसें पाण्यापासून दूध वेगळें करून घेतात तसें तें हंसदांपत्य दोष बाजूस सारून सर्व गुण घेतें.

टीपा — हृदयाच्या नजीक असलेल्या अनाहतचक्राचें हें वर्णन आहे. त्याला संवित्कमल अशी संज्ञा आहे; कारण या ठिकाणीं साधकाला आत्मज्ञान प्राप्त होतें. संवित्कमलांतील मधूचें आस्वादन करणारे हे दोन हंस म्हणजे एक भगवान् शिव व दुसरी भगवती. या अनाहतचक्रामध्यें त्यांना हंसेश्वर व हंसेश्वरी अशीं नांवें प्राप्त होतात. या देवतांची उपासना केल्यानें त्यांची कृपा झाल्यावर अठरादि विद्या प्राप्त होतात. चार वेद, चार उपवेद, सहा वेदाङ्गें, चार शास्त्रें ह्या त्या अष्टादश विद्या होत. चार वेद म्हणजे ऋग्वेद यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद; चार उपवेद म्हणजे आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद व नीतिशास्त्र; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंदस व ज्योतिष हीं सहा वेदाङ्गें आणि पूर्वोत्तरमीमांसा, न्याय, पुराण व धर्मशास्त्र हीं चार शास्त्रें.

प्रस्तुत श्लोकांतील संदर्भाचा श्लोक अरुणामोदिनीटीकेंत आहे, तो असाः—

अनुपममनुभूतिस्त्वात्मसवेद्यमाद्य
विततसकलविद्यालापमन्योन्यमुख्यम्।
सकलनिगमसारं सोऽहमाकारगम्यं
हृदयकमलमध्ये हंसयुग्मं नमामि ॥

श्लोकांत आज्ञादि चक्रांचें केलेलें वर्णन मनुष्यदेहान्तर्गत कुण्डलिनीमार्गाच्या चक्रांशीं जमत नाहीं. म्हणजेच या स्तोत्रांतील हीं सहा चक्रें वैयक्तिक षट्चक्रांशीं संबद्ध नाहींत.

विशुद्धौ ते शुद्धस्फटिकविशदं व्योमजनकं
शिवं सेवे देवीमपि शिवसमानव्यवसिताम् ।
ययोः कान्त्या यान्त्या शशिकिरणसारूप्यसरणिं
विधूतान्तर्ध्वान्ता विलसति चकोरीव जगती ॥ ३८॥

विशुद्धिचक्रामध्यें शुद्ध स्फटिकासारखा निर्मल आणि आकाशतत्त्वाचा उत्पादक असा शिव आणि शिवासारखींच जिचीं कार्यें आहेत अशी देवी, ह्या उभयतांची मी उपासना करतों. चन्द्रकिरणांशी सदृश असणाऱ्या ह्या दोघांच्या दीप्तीनें जिचा अन्तर्मल निघून गेला आहे अशी त्रिलोकी चकोरीसारखी *विलास करते.*

टीपा—आज्ञाचक्रानंतरचें कंठस्थानीं असलेलें जें विशुद्धिचक्र आहे त्याचें माहात्म्य प्रस्तुत श्लोकांत सांगितलें आहे भगवान् शिव हे व्योमतत्त्वाचें म्हणजे आकाशतत्त्वाचे जनक आहेत. यास आधारभूत असें श्रुतिवचन पुढीलप्रमाणें—

'तस्माद्वा एतस्मादात्मनः आकाशः संभूतः।'

विशुद्धिचक्रांत शिवांना व्योमेश्वर असें म्हणतात. तसेंच देवीला व्योमेश्वरी ही संज्ञा प्राप्त होते.

'शिवसमानव्यवसिताम्' विश्वाची उत्पत्ति, स्थिति इत्यादि कार्यें जीं शिवाचीं आहेत तींहि तुझींच आहेत. वास्तविक भगवती ही ब्रह्मा, विष्णु व महेश यांना विश्वाचीं कार्यें नेमून देऊन त्याच्याकडूनच हीं कार्यें करवून घेत असते. विशुद्धिचक्रांत शिवशक्तीचें ध्यान केल्यानें तिची कृपा प्राप्त होऊन साधकाचें अज्ञान संपूर्ण नष्ट होतें आणि चंद्रप्रकाशांत चकोरी जशी आनंदमय होऊन राहते तशी स्थिति उपासकाला प्राप्त होते.

समुन्मीलत्संवित्कमलमकरन्दैकरसिकं
भजे हंसद्वन्द्वं किमपि महतां मानसचरम् ।
यदालापादष्टादशगुणितविद्यापरिणति-
र्यदादत्ते दोषाद् गुणमखिलमद्भ्यः पय इव ॥ ३९ ॥

महान् उपासकांच्या मनोरूपी मानस सरोवरामध्यें विहार करणारें आणि विकास पावणाऱ्या 'संवित्' रूपी कमलांतील मधूचें आस्वादन करण्यांतच आनंदित होणारें जें हंसयुगल आहे त्याची मी भक्ति करतों. त्या हंसदांपत्याच्या आलापानें अठरा विद्या परिणत होतात. हंस जसें पाण्यापासून दूध वेगळें करून घेतात तसें तें हंसदांपत्य दोष बाजूस सारून सर्व गुण घेतें.

टीपा — हृदयाच्या नजीक असलेल्या अनाहतचक्राचें हें वर्णन आहे. त्याला संवित्कमल अशी संज्ञा आहे; कारण या ठिकाणीं साधकाला आत्मज्ञान प्राप्त होतें. संवित्कमलांतील मधूचें आस्वादन करणारे हे दोन हंस म्हणजे एक भगवान् शिव व दुसरी भगवती. या अनाहतचक्रामध्यें त्यांना हंसेश्वर व हंसेश्वरी अशीं नांवें प्राप्त होतात. या देवतांची उपासना केल्यानें त्यांची कृपा झाल्यावर अठरावि विद्या प्राप्त होतात. चार वेद, चार उपवेद, सहा वेदाङ्गें, चार शास्त्रें ह्या त्या अष्टादश विद्या होत. चार वेद म्हणजे ऋग्वेद यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद; चार उपवेद म्हणजे आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद व नीतिशास्त्र, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंदस् व ज्योतिष हीं सहा वेदाङ्गें आणि पूर्वोत्तरमीमांसा, न्याय, पुराण व धर्मशास्त्र हीं चार शास्त्रें.

प्रस्तुत श्लोकातील संदर्भाचा श्लोक अरुणामोदिनीटीकेंत आहे, तो असा:—

अनुपममनुभूतिस्त्वात्मसंवेद्यमाय
विततसकलविद्यालापमन्योन्यमुख्यम् ।
सकलनिगमसारं सोऽहमाकारगम्यं
हृदयकमलमध्ये हंसयुग्मं नमामि ॥

श्लोकांत आज्ञादि चक्रांचें केलेलें वर्णन मनुष्यदेहान्तर्गत कुण्डलिनीमार्गाच्या चक्राशीं जमत नाहीं. म्हणजेच या स्तोत्रांतील हीं सहा चक्रें वैयक्तिक षट्चक्राशीं संबद्ध नाहींत.

विशुद्धौ ते शुद्धस्फटिकविशदं व्योमजनकं
शिवं सेवे देवीमपि शिवसमानव्यवसिताम् ।
ययोः कान्त्या यान्त्या शशिकिरणसारूप्यसरणिं
विधूतान्तर्ध्वान्ता विलसति चकोरीव जगती ॥ ३८॥

विशुद्धिचक्रामध्यें शुद्ध स्फटिकासारखा निर्मल आणि आकाशतत्त्वाचा उत्पादक असा शिव आणि शिवासारखींच जिचीं कार्यें आहेत अशी देवी, ह्या उभयतांची मी उपासना करतों. चंद्रकिरणांशीं सदृश असणाऱ्या ह्या दोघांच्या दीप्तीनें जिचा अन्तर्मल निघून गेला आहे अशी त्रिलोकी चकोरीसारखी विलास करते.

टीपा—आज्ञाचक्रानंतरचें कंठस्थानीं असलेलें जें विशुद्धिचक्र आहे त्याचें माहात्म्य प्रस्तुत श्लोकांत सांगितलें आहे भगवान् शिव हे व्योमतत्त्वाचें म्हणजे आकाशतत्त्वाचे जनक आहेत यास आधारभूत असें श्रुतिवचन पुढीलप्रमाणें—

'तस्माद्वा एतस्मादात्मनः आकाशः सभूतः।'

विशुद्धिचक्रांत शिवांना व्योमेश्वर असें म्हणतात तसेंच देवीला व्योमेश्वरी ही संज्ञा प्राप्त होते.

'शिवसमानव्यवसिताम्' विश्वाचीं उत्पत्ति, स्थिति इत्यादि कार्यें जीं शिवाचीं आहेत तींहि तुझींच आहेत वास्तविक भगवती ही ब्रह्मा, विष्णु व महेश यांना विश्वाचीं कार्यें नेमून देऊन त्यांच्याकडूनच ही कार्यें करवून घेत असते. विशुद्धिचक्रांत शिवशक्तीचें ध्यान केल्यानें तिची कृपा प्राप्त होऊन साधकाचें अज्ञान सपूर्ण नष्ट होतें आणि चंद्रप्रकाशांत चकोरी जशी आनंदमय होऊन राहते तशी स्थिति उपासकाला प्राप्त होते.

तव स्वाधिष्ठाने हुतवहमधिष्ठाय निरतं
तमीडे संवर्तं जननि महतीं तां च समयाम् ।
यदालोके लोकान्दहति महति क्रोधकलिते
दयार्द्रा या दृष्टिः शिशिरमुपचारं रचयति ॥ ४० ॥

हे भगवति माते, तुझ्या स्वाधिष्ठानचक्रांत अग्नितत्त्वाच्या ठिकाणीं सतत वास्तव्य करणाऱ्या संवर्तरूपी शिवाची मी स्तुति करतों. तसेंच जेव्हां त्याच्या महान् क्रोधयुक्त दृष्टीनें पृथ्वी आदि लोकांचा दाह होतो तेव्हां श्रेष्ठ अशा समया नावांच्या शक्तीचीहि मी स्तुति करतों, आणि तेव्हां त्या भगवतीची दयार्द्रदृष्टि त्या दग्ध होणाऱ्या लोकांवर शीतलोपचार करते.

टीपा — हें चवथें चक्र स्वाधिष्ठाननामक आहे असें प्रस्तुत श्लोकांत म्हटले आहे. इतर कुण्डलिनीउपासकांच्या मतें ह्या चक्राचें नांव मणिपूर असें आहे. आचार्यांनीं पुढील श्लोकांत पांचव्या चक्राचें नांव मणिपूर आहे असें म्हटले आहे. पण कुण्डलिनीउपासकांच्या मतें पांचव्यास स्वाधिष्ठानचक्र असें नांव आहे. याबद्दलचें स्पष्टीकरण प्रस्तावनेंत दिलेंच आहे.

स्वाधिष्ठानचक्रांमध्यें सतत वास्तव्य करणाऱ्या शिवाला सवर्तेश्वर असें म्हणतात, तर भगवती ही समयाम्बा या नावानें ओळखली जाते. या शिवशक्तीचें मी स्तवन करतों.

तटित्वन्तं शक्त्या तिमिरपरिपन्थिस्फुरणया
स्फुरन्नानारत्नाभरणपरिणद्धेन्द्रधनुषम् ।
तव श्यामं मेघं कमपि मणिपूरैकशरणं
निषेवे वर्षन्तं हरमिहिरतप्तं त्रिभुवनम् ॥ ४१ ॥

मणिपूरचक्र हें एक ज्याचें स्थान आहे व जो अग्नि व सूर्य यांच्या किरणांनीं तप्त झालेल्या त्रिभुवनावर उदकाचा वर्षाव करतो, जो अंधकाराचा नाश करण्यासाठीं स्फुरण पावणाऱ्या विद्युद्रूपी शक्तीनें युक्त आहे आणि जो विविध रत्नालंकाररूपी इंद्रधनुष्यानें सज्ज आहे, अशा त्या कृष्णमेघरूपी शिवाची मी सेवा करतो.

टीपा :—या श्लोकांत पांचव्या मणिपूर चक्राचें वर्णन आहे. यास योगमार्गानुयायी स्वाधिष्ठानचक्र हें नाव देतात. ह्या चक्रांत श्याममेघरूपी

प्रस्तुत श्लोकांवरील डिंडिमभाष्यांतहि असाच एक पुढील श्लोक उद्धृत केला आहे.

> ' पुंभावलीला पुरुपातु पञ्च
> याहच्छिक संलपित त्रयी ते ।
> अम्ब, त्वदंशोऽणुरयांशुमाली
> तत्रैव मन्दस्मितविन्दुरिन्दुः ॥ '

तसेंच इतर टीकाकारांच्या मतें ह्या श्लोकांत हंसमिथुनाच्या जपाचा निर्देश केला आहे.

' हसः सोऽहं स्वाहा ' हा जप वेदसिद्ध आहे. त्यांतील ' हसः ' व ' सोऽहं ' हीं पदें प्रत्येकी शिवशक्तीचीं निदर्शक आहेत, तीं अशीं— ' हं ' वर्णानें शिव व ' सः ' वर्णानें शक्ति व्यक्त होतात असें तज्ज्ञांचे मत आहे. याचा विस्तार अन्य तऱ्हेनेंहि करता येईल.

उषःकालीं उठून अजपाजप करावयाचा असतो. तेव्हा ' हंसः सोऽहं ' ह्या मन्त्राचा जप होतो असा गुरुसंप्रदाय आहे. ह्यासंबधीं सद्गुरुपरंपरेत ' दत्तात्रेयं श्रीगुरुपद्म प्रणतोऽस्मि ' ह्या पाटुपदाचे श्लोक आहेत त्याचा निर्देश प्रस्तावनेंत आलाच आहे तसेंच यात हसगायत्री आहे ती गुरुगम्य असून, गुरुमुखांतून दीक्षा घेऊन म्हणावयाची असल्यानें तिचा येथे उल्लेख केला नाहीं ' ह ' म्हणजे ' अह ' चे चिह्न ' अह ' म्हणजे अपासून हपर्यंतचीं अक्षरं आणि ' सः ' म्हणजे शक्ति ' अह ' हें शिवरूप आहे म्हणून ' हसः सोऽहं ' म्हणजे शिवशक्तिसमन्वय वर्णविवेकनामक ग्रथात वर्णमालेसंबधीं सर्व ऊहापोह आहे त्यात सर्वकष तत्त्वज्ञान आहे.

अपासून अः पर्यंतच्या स्वरांत शक्तित्व आहे आणि क् पासून ह् पर्यंतच्या व्यजनात शिवतत्त्व आहे व्यजनाचा स्पष्ट उच्चार स्वराखेरीज होत नाहीं व्यजन व स्वर मिळून अक्षर बनतें म्हणजे शक्तियुक्त शिव असेल तरच कार्य होतें, म्हणून सर्व वर्णमाला ही मूलत.च शिवशक्तिरूप आहे. त्यात इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति आहत, म्हणूनच ती प्रभावी आहे. ' एकोऽहं बहु स्याम् ' ह्या श्रुतिवाक्यात ' अह ' म्हणजे वर्णमालेचें प्रारभिक मूळरूप शिवशक्ति होय तें पुढें वर्णरूपानें विस्तृत होऊन प्रकट झालें या वर्णमालेविषयीं विस्तृत विवेचन प्रस्तावनेंत आलें आहे.

तव स्वाधिष्ठाने हुतवहमधिष्ठाय निरतं
तमीडे संवर्तं जननि महतीं तां च समयाम् ।
यदालोके लोकान्दहति महति क्रोधकलिते
दयार्द्रा या दृष्टिः शिशिरमुपचारं रचयति ॥ ४० ॥

हे भगवति माते, तुझ्या स्वाधिष्ठानचक्रांत अग्नितत्त्वाच्या ठिकाणीं सतत वास्तव्य करणाऱ्या संवर्तरूपी शिवाची मी स्तुति करतों. तसेंच जेव्हां त्याच्या महान् क्रोधयुक्त दृष्टीनें पृथ्वी आदि लोकांचा दाह होतो तेव्हां श्रेष्ठ अशा समया नावांच्या शक्तीचीहि मी स्तुति करतों, आणि तेव्हां त्या भगवतीची दयार्द्रदृष्टि त्या दग्ध होणाऱ्या लोकांवर शीतलोपचार करते.

टीपा — हें चवथें चक्र स्वाधिष्ठाननामक आहे असें प्रस्तुत श्लोकांत म्हटलें आहे. इतर कुण्डलिनीउपासकांच्या मतें ह्या चक्राचें नांव मणिपूर असें आहे. आचार्यांनीं पुढील श्लोकांत पांचव्या चक्राचें नांव मणिपूर आहे असें म्हटलें आहे पण कुण्डलिनीउपासकांच्या मतें पांचव्यास स्वाधिष्ठानचक्र असें नांव आहे. यावद्दलचें स्पष्टीकरण प्रस्तावनेंत दिलेंच आहे

स्वाधिष्ठानचक्रांमध्यें सतत वास्तव्य करणाऱ्या शिवाला संवर्तेश्वर असें म्हणतात, तर भगवती ही समयाम्बा या नांवानें ओळखली जाते. या शिव-शक्तींचें मी स्तवन करतों.

तटित्वन्तं शक्त्या तिमिरपरिपन्थिस्फुरणया
स्फुरन्नानारत्नाभरणपरिणद्धेन्द्रधनुषम् ।
तव श्यामं मेघं कमपि मणिपूरैकशरणं
निषेवे वर्षन्तं हरमिहिरतप्तं त्रिभुवनम् ॥ ४१ ॥

मणिपूरचक्र हें एक ज्याचें स्थान आहे व जो अग्नि व सूर्य यांच्या किरणांनीं तप्त झालेल्या त्रिभुवनावर उदकाचा वर्षाव करतो, जो अंधःकाराचा नाश करण्यासाठीं स्फुरण पावणाऱ्या विद्युद्रूपी शक्तीनें युक्त आहे आणि जो विविध रत्नालंकाररूपी इंद्रधनुष्यानें सज्ज आहे, अशा त्या कृष्णमेघरूपी शिवाची मी सेवा करतों.

टीपा :—या श्लोकांत पांचव्या मणिपूर चक्राचें वर्णन आहे. यास योगमार्गानुयायी स्वाधिष्ठानचक्र हें नाव देतात. ह्या चक्रांत श्याममेघरूपी

शिव व तद्दिद्रूपी शक्ति अशा देवता आहेत. मणिपूरचक्रांत वास्तव्य करणाऱ्या शिवाला मेघेश्वर किंवा अमृतेश्वर असें नांव आहे. आणि भगवती ही अमृतेश्वरी किंवा सौदामिनी या नांवानें तेथें वास करते.

या अर्थाला पूरक वचनें अरुणामोदिनीटीकेंत आहेत. तीं अशीं—

'मणिपूरकवसतिः प्रावृषेण्यः सदाशिवः।
अम्बुदात्मतया भाति स्थिरसौदामिनी शिवा॥
कवलीकृतनिःशेषतत्त्वग्रामस्वरूपिणी।'

याशीं समानार्थक गीतेंतील पुढील श्लोक असा—

'*अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते।*
आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः॥'

पृथ्वीवरच्या अग्नींत शास्त्रोक्त पद्धतीनें टाकलेली आहुति द्युलोकांतील सूर्याकडे जाते. सूर्यापासून अंतरिक्षांत पाऊस निर्माण होऊन तो पृथ्वीवर पडतो. पर्जन्यामुळें अन्नाचें उत्पादन होतें आणि अन्नामुळें प्रजा निर्माण होते. सगुण ब्रह्मानें तेज, पाणी व अन्न निर्माण करून त्यांत त्यानें स्वतः प्रवेश केला. ह्या आशयाचें श्रुतिवाक्य लक्ष्मीधरानें आपल्या टीकेंत उद्धृत केलें आहे तें असें—

'सुत्रामाणं पृथिवीं द्यामनेहस ँ
सुशर्माणमदितिं ँ सुप्रणीतिम्।
दैवीं नाव ँ स्वरित्रामनागस-
मस्रवन्तीमा रुहेमा स्वस्तये॥

मोक्ष म्हणजे निरतिशय सुख. त्याच्या प्राप्तीसाठीं भगवतीच्या उपासनेंत आम्ही निमग्न व्हावें. त्या उपासनेस वरील श्रुतिवाक्यांत दृढ किंवा अचल होडीची उपमा दिली आहे. स्वाधिष्ठानगत अग्नि, मूलाधारस्थित पृथ्वी, विशुद्धिस्थित गगन, आज्ञाचक्रांत असलेलें कालचक्रयुक्त मन, वायुतत्त्व आणि जलतत्त्व, ह्या सर्व तत्त्वांतून मोक्षाकडे प्रकर्षानें नेणाऱ्या सुदृढ अशा आचाररूपी वल्ह्याच्या आधारानें दुष्कर्मरूपी झंझावातांतहि अचल अशा उपासनारूपी दैवी नौकेवर आम्ही आरूढ होतो. सारांश, निरतिशय सुखाचें निधान असलेल्या मोक्षाच्या प्राप्तीसाठीं भगवतीची उपासना हेंच एक श्रेष्ठ साधन आहे.

तवाधारे मूले सह समयया लास्यपरया
नवात्मानं मन्ये नवरसमहाताण्डवनटम् ।
उभाभ्यामेताभ्यामुदयविधिमुद्दिश्य दयया
सनाथाभ्यां जज्ञे जनकजननीमज्जगदिदम् ॥४२॥

हे माते, तुझ्या मूलाधारचक्रांत लास्यनृत्य करण्यास उद्युक्त झालेल्या, समयानामक शक्तीसह नवरसांनीं ओथंबलेलें ताण्डवनृत्य करणाऱ्या व आनंद-भैरवरूप उत्कृष्ट नट असलेल्या शिवाची मी उपासना करतो. या उभयतांनीं सृष्टि उत्पन्न करण्याची दयादृष्टि दाखविल्यामुळें हें जगत् जनकजननीयुक्त आणि सनाथ झालें आहे.

**टीपा** — शिवशक्ति ह्या अखिल विश्वाची जनकजनकी आहेत असें या श्लोकांत सांगितलें आहे. मागील एका श्लोकावरील टीपेंत उल्लेखिलेला कालिदासविरचित रघुवंशांतील पहिलाच श्लोक प्रस्तुतच्या श्लोकांतील अर्थाशीं मिळताजुळता आहे. तो श्लोक असा—

'वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ॥'

लक्ष्मीधरटीकेंतहि एका तंत्रांतील पुढील वचन एतदर्थक म्हणून उद्धृत केलें आहे—

'जपाकुसुमसंकाशौ मदघूर्णितलोचनौ ।
जगतः पितरौ वन्दे भैरवीभैरवात्मकौ ॥'

वरील सहा श्लोकांत म्हणजे श्लोक ३७ ते ४२ मध्यें आज्ञाचक्रापासून मूलाधारचक्रापर्यंतच्या सहा चक्रांत विभिन्नरूपांनीं राहिलेल्या आणि मन इत्यादि सहा तत्त्वांनीं परिणत झालेल्या शिवशक्तींचें वर्णन आहे.

शिवशक्तींचें ऐक्य वर्णन करतांना लक्ष्मीधरटीकेंत पांच प्रकारचें साम्य पुढीलप्रमाणें दाखविलें आहे—

( १ ) अधिष्ठानसाम्य, ( २ ) अवस्थानसाम्य, ( ३ ) अनुष्ठानसाम्य, ( ४ ) रूपसाम्य, आणि ( ५ ) नामसाम्य.

( १ ) शिवशक्तींचीं सहाहि चक्रें सारखींच आधारभूत आहेत हें अधिष्ठानसाम्य.

(२) लास्य, ताण्डव वगैरे शब्दांनीं अवस्थानसाम्य दाखविलें आहे.

(३) जगदुत्पत्तीच्या क्रियेंत शिव व शक्ति समान भाग घेतात म्हणजे त्यांचा सारखा भाग असतो. हें क्रियारूप अनुष्ठानसाम्य होय.

(४) शिव आणि शक्ति हे नवात्म आहेत. हें रूपसाम्य होय.

(५) शिवशक्ती यांना शिव आणि शिवा, किंवा हंसद्वन्द्व, किंवा समय व समया इत्यादि नांवें दिलीं आहेत. तें नामसाम्य होय.

कुण्डलिनी ही मनुष्यदेहांत षट्चक्रांतून वर जाऊन 'सह रहसि पत्या विहरसे' या पूर्वोक्त श्लोकानुसार उत्थान पावते किंवा मूलाधारचक्रांत साडेतीन वेटोळीं करून निद्रित होते असें मागील श्लोकांत टीकाकारांनीं निरूपण केलें आहे. ती कुंडलिनी म्हणजे शक्ति होय असें त्यांचें प्रतिपादन असून कुण्डलिनीमार्गांतील जीं षट्चक्रें आहेत तींच सदर श्लोकांत असल्यानें त्यांचें नामसाम्य आहे. म्हणून कुण्डलिनी ही शक्तिरूप आहे असें विवेचन करतात. पण हें सयुक्तिक नाहीं. नॉर्मन ब्राऊन या अमेरिकन लेखकानें सौंदर्यलहरीची एक सुंदर आवृत्ति छापली आहे. त्याच्या मतें हें स्तोत्रगत षट्चक्रवर्णन व्यक्तिगत कुण्डलिनीमार्गांतील षट्चक्राशीं जुळत नाहीं. त्यासंबंधीं विस्तारशः विवेचन प्रस्तावनेंत आलेंच आहे. एक दोन मुद्दे थोडक्यांत येथें सांगणार आहे.

पहिली गोष्ट म्हणजे स्तोत्रामध्यें 'तवाधारे मूले', 'तवाज्ञाचक्रस्थं', 'विशुद्धौ ते', 'तव स्वाधिष्ठाने' इत्यादि शब्दांनीं हीं चक्रें भगवतीचीं आहेत असें स्पष्ट निरूपण केलें आहे. मनुष्यदेहांतील तीं आहेत असा मुळींच निर्देश नाहीं. तसेंच हीं चक्रें आज्ञाचक्रापासून क्रमानें मन इत्यादिकांची उत्पादक आहेत असें सांगितलें आहे. उदाहरणार्थ चक्राच्या वर्णनांत म्हटलें आहे कीं, 'विशुद्धौ ते शुद्धस्फटिकविशदं व्योमजनकं, शिवं सेवे देवीमपि' (श्लोक ३७), तसेंच 'तव स्वाधिष्ठाने हुतवहमधिष्ठाय निरतं' (श्लोक ३९) आणि तव श्यामं मेघं कमपि मणिपूरैकशरणं (श्लोक ४०) इत्यादि श्लोकांत विशुद्धि, स्वाधिष्ठान व मणिपूर या चक्रांत राहिलेली भगवती अनुक्रमें आकाश, अग्नि व जल हीं तत्त्वें निर्मिते असें स्पष्ट सांगितलें आहे. मानवदेहांतील कुण्डलिनीमार्गांतील या नांवांचीं चक्रें हीं पंचमहाभूतें निर्माण करूं शकत नाहीत, पण भगवती तीं निर्माण करते. मानवदेहांतील पंचतत्त्वें जीं आहेत, तीं त्या देहांतील चक्रांनीं कांहीं निर्माण केलीं नाहींत. योगमार्गीयांच्या मतें

मानवदेहांतील चक्रे कमलाच्या दलांनीं युक्त असून त्या दलांची संख्या भिन्न भिन्न आहे. मुलाधार चार दलें, स्वाधिष्ठान सहा दले, मणिपूर दहा दलें, अनाहत बारा दलें, विशुद्धि सोळा दलें, व आज्ञा दोन दले, याप्रमाणें आहेत. प्रस्तुत स्तोत्रांत मात्र असा कांहीं उल्लेख नाहीं. फक्त एका चक्रांत साम्य आहे तें ब्रह्मरन्ध्रस्थित कमलाविषयीं. ' सहस्रारे पद्मे सह रहसि पत्या विहरसे ' या श्लोकानुसार योगिजनहि ब्रह्मरन्ध्रस्थ कमलहि सहस्रदल आहे असे मानतात. याप्रमाणें फक्त एकाच कमलाच्या साम्याखेरीज इतर कोणत्याहि गोष्टींत साम्य नाहीं. स्तोत्रांतील वर्णित चक्रें कमलासारखीं आहेत असे म्हणण्याला मुळीच आधार नाहीं. शेवटीं एक महत्त्वाचा फरक म्हणजे तो चक्रातील देवतासंबंधीचा. स्तोत्रांत चक्रांतील देवता ह्या शिवशक्तीचीं रूपें होत; पण कुण्डलिनीमार्गी उपासकमतें त्या देवतांचीं नांवें विभिन्न आहेत. कांहींच्या मतें चक्रस्थ देवता दोन नसून एक आहे. कांहींच्या मतें त्या देवता दत्तात्रेयरूप आहेत. त्यासंबंधीं दत्तात्रेयाचा श्लोक व ललितासहस्रनामांतील तीं त्रिपुरसुदरीचीं रूपें आहेत. तीं नांवें भिन्न आहेत. हे सर्व प्रस्तावनेंत स्पष्ट केलें आहे. कांहीं दिवसांपूर्वी एका योगाभ्यासी मारुतिभक्ताची भेट झाल्यावेळीं त्यानें षट्चक्रांतील देवता मारुतीच्या भिन्न नांवांचीं भिन्न रूपें असल्याचें मला सांगितलें

` येथें सौंदर्यलहरीचा पूर्वार्ध समाप्त झाला. पूर्वार्धांत एकूण श्लोक १ ते ४२ असून कांहीं टीकाकार या भागाला आनन्दलहरी म्हणतात उदाहरणार्थ, अरुणामोदिनीकार म्हणतात, ' एवमानन्दलहरीसमाख्योऽशः समीरितः । ' इतर टीकाकार संपूर्ण स्तोत्रालाच सौंदर्यलहरी म्हणतात त्यांचें मतें पूर्वार्ध व उत्तरार्ध असे भाग नाहींत.

आनन्दलहरीमध्यें भगवतीच्या उपासनेसंबधीचें विवेचन म्हणजे उपासनेचीं साधनें व तिच्यामुळें प्राप्त होणारे फळ हें सांगितलें आहे. दुसऱ्या भागांत श्लोक ४३ पासून पुढें भगवतीच्या सौंदर्याचें आमस्तक वर्णन केलें आहे. फक्त सौंदर्यवर्णन एवढाच ह्याचा उद्देश नसून त्या सबधांत भगवतीच्या स्तुतीनें इष्टप्राप्ति करून घेतां येते हे दर्शविण्याचा हेतु आहे; व ती इष्टप्राप्ति म्हणजे अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति होय. भगवतीच्या स्तुतिस्तोत्रांचें गुणगान व चरणसेवा हीच एक प्रकारची उपासना आहे. ह्या उपासनेनें अर्थ व काम ह्यांची प्राप्ति होते. तो अभ्युदय होय. आणि ही उपासना अखंड

करीत राहिल्यानें ' अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।' या वचनानुसार मोक्ष किंवा निःश्रेयस प्राप्त होतो. ह्या उपासनेच्या मार्गानें मिळणारी परा गति म्हणजे भगवतीच्या स्थानीं उपासकानें तिच्या सांनिध्यांत वास करणें होय. ह्यालाच निःश्रेयस किंवा मोक्ष म्हणतात आणि उपासनेचें अंतिम ध्येय तर हेंच आहे. या उपासनेनें भगवतीच्या चरणापाशीं राहण्याऱ्या उपासकाच्या चार अवस्था आहेत. त्या अशा —( १ ) सलोकता, ( २ ) समीपता, ( ३ ) सरूपता व ( २ ) सायुज्य.

. उपासकाच्या योग्यतेनुसार त्यास ह्यांपैकीं एखादी अवस्था प्राप्त होते. या अवस्था चढत्या पायरीच्या होत. उपासक जर खालच्या पायरीवर असेल तर पुनः जन्म घेऊन उपासना करून भगवतीच्या कृपेनें वरच्या पायरीवर जाऊं शकतो. शेवटची पायरी गांठण्यास अनेक जन्मांची पुण्याई लागते, उपासना सतत चालू असावी लागते. म्हणूनच भगवद्गीतेनें सांगितलें आहे कीं,

' अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।'

वरील चार अवस्थांचें स्पष्टीकरण पुढें दिलें आहे—

सलोकता म्हणजे भगवतीच्या लोकीं जाऊन राहणें. उदाहरणार्थ, श्लोक ३८ मध्यें सांगितलें आहे कीं, भगवती मणिद्वीपांतील चिन्तामणिगृहांत राहते. सलोकता म्हणजे या मणिद्वीपात प्रवेश करून निवास करणें. भगवतीच्या लोकीं जाऊन राहण्यानें भगवतीचे स्वरूप समजत नाहीं व सायुज्यप्राप्तीहि होत नाहीं याचें उदाहरण म्हणून श्रीचक्र घेऊं. श्लोक २१ मध्यें श्रीचक्राचें वर्णन आहे. त्यांतील अन्तिम चरणांत श्रीचक्राच्या कोणांना भगवतीचें शरण (गृह) कोण म्हटलें आहे. शरण म्हणजे गृह. म्हणून श्रीचक्राचे कोण तेच भगवतीचे शरणकोण. ह्या कोणांच्या बाहेर तीन वर्तुळें व तीन भूपुरें आहेत. हीं भूपुरें-वर्तुळाकृति कमळें ह्यारूपानें भगवतीचे शरणकोण परिणत झाले आहेत. वर्तुळाच्या बाहेर अष्टदल व त्याबाहेर द्वादशदल कमलें आहेत. हें सर्व चक्र भगवतीचें निवासस्थान आहे. हीं तीन वर्तुळें व भूपुरें चतुरस्र आहेत. हें श्रीचक्र भगवतीचे गृह किंवा लोक. या गृहाच्या म्हणजे भगवतीच्या लोकाचा बाहेरचा भाग म्हणजे तीन वर्तुळें व तीन भूपुरें होत. म्हणून सलोकता म्हणजे या गृहाच्या बाहेर दोन कमलांत व तीन भूपुरात राहणें होय. हीं भूपुरें व दोन वर्तुळें तीन कमलांत व दोन कमलांत चतुरस्रें सुद्धां चढत्या क्रमानें आहेत. बाहेरील भूपुर व बाहेरील

चतुरस्र हीं सर्वांत खालची पायरी होय. उपासकाच्या योग्यतेनुरूप क्रमाक्रमानें आंतील चतुरस्रांत व कमलांत त्याचा प्रवेश होतो.

श्रीचक्राचे कोण हे मुख्य व आंतील भाग असून कमलें व चतुरस्रें हे बाहेरील भाग आहेत. कोणांना जें सामीप्य आहे तें बाहेरील भागांना नाहीं. अगदी पहिल्या पायरीच्या उपासकास ही समीपता प्राप्त होते, पण सायुज्यता प्राप्त होत नाही. अनेक जन्म उपासना केल्यावर तो या सर्वांत बाहेरील चतुरस्रांत येतो.

चतुरस्राच्या आंतील भागांत पोडशदल व अष्टदल कमलें आहेत. तीं कमलेंहि भगवतीच्या गृहाचे भागच असून बाहेरील वर्तुळें व चतुरस्र ह्या भागापेक्षां अधिक समीप आहेत. म्हणून वरच्या पायरीचा उपासक भगवतीच्या गृहाच्या ह्या भागांत येण्यास योग्य झाला म्हणजे समीपताहि मुक्ति मिळते. पुनः तो उपासक अनेक जन्म उपासना करून सरूपता या मुक्तीचा अधिकारी होतो.

श्लोक ११ मध्यें श्रीचक्राचें वर्णन आल्याचें आपण पाहिलेंच. पण प्रस्तुत विषयासंबंधीं पुढील एका श्लोकांत जें वर्णन आहे तो श्लोक असा—

'भूर्वेश्मगत्रिवृतषोडशनागशक्र-
दिग्युग्मवस्वनलकोणकबिन्दुमध्ये ।
सिंहासनोपरिगतां वरपीठमध्ये
प्रोत्फुल्लपद्मनयनां त्रिपुरां भजेऽहम् ॥'

या श्लोकाचा भावार्थ असा कीं, 'मी त्रिपुरेचें ध्यान करतों. ती सिंहासनपीठारूढ आहे व तें सिंहासन जेथें आहे त्या स्थानाचें वर्णन असें —

ह्या भगवतीचें श्रीचक्ररूप जें गृह आहे त्याच्या बाहेरील भागांत भूपुरें, चतुरस्रें व वर्तुळें आहेत. आंत तीन वर्तुळें आहेत. त्याच्या आंत षोडशदल व अष्टदल चक्रें आहेत. त्याच्या आंत चतुर्दशकोणात्मक चक्रें आहेत. त्याच्या आंत दशकोणात्मक दोन चक्रें आहेत. त्याच्या आंत अष्टदशकोण व तीन त्रिकोण आहेत व त्याच्या आंत बिंदु आहे. अशा प्रकारें हें भगवतीचें गृह आहे आणि आंत भगवतीच्या अनुयायिनी पण भगवतीरूप देवता आहेत. ह्या चक्राच्या आंत जाऊन राहणें ही सरूपता मुक्ति होय. सर्वांच्या आंत भगवती म्हणजे शिवशक्ति राहते. तिच्याशीं एकरूप होणें ही सायुज्य-

मुक्ति होय. ही सायुज्यप्राप्ति म्हणजे विधि, हरि व रुद्र यांना मिळालेल्या स्थितीपेक्षांहि वरील पायरी आहे हें श्लोक २२ मध्यें स्पष्ट केलें आहे. हीच सर्वश्रेष्ठ मुक्ति असून हेंच वैदिक धर्माचें निःश्रेयस होय.

भगवतीस शिवपत्नी असें सौंदर्यलहरींतील पुष्कळ श्लोकांत उल्लेखिलें आहे. उदाहरणार्थ —श्लोक ६, ७, ८, ९, ११, २२, २३, २४, २५, २६, २९, ३०, ४२, ५१, ५२, ५४, ६५, ६७, ७२, ७३, ७५, ७८, ७९, ८४, ८५, ८६, ९२ आणि ९३.

वरील श्लोकांत भगवतीस शिवाची अर्धांगी, पर्वतपुत्री, स्कन्दमाता, गणपतिमाता, त्रिपुरहरपत्नी इत्यादि नांवें आहेत. जगताची उत्पत्ति, स्थिति व संहार करणाऱ्या देवता ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या आहेत असें कित्येक श्लोकांत सांगितलें आहे. उदाहरणार्थ, श्लोक २ मध्यें सांगितलें आहे कीं, भगवतीच्या चरणाचा एक रजःकण घेऊन ब्रह्मदेव सृष्टि निर्मितो, विष्णु सहस्रशीर्षानीं विश्वाचें धारण करतो व हर विश्वाचें भस्म करून आपल्या शरीरास चार्चितो. पहिल्या श्लोकांत सांगितलें आहे कीं, हे तीनहि देव भगवतीची आराधना करतात. तसेंच पहिल्या श्लोकांतच शिव हा जगताचें आदिकारण आहे असा उल्लेख आहे. पण लगेंच दुसऱ्याच श्लोकांत तो जगताचा संहार करतो असें सांगितलें आहे. पुढें एका श्लोकांत भगवतीनें *शिवाच्या वामांगाचें हरण केल्याचाहि उल्लेख आहे ( श्लोक २३ पाहा ).* आणखी एका श्लोकांत सांगितलें आहे कीं, भगवती ही शंकराच्या मस्तकावरील गंगेची असूया करते. तसेंच भगवतीस स्कंद व गणपति ह्यांची माता म्हटलें आहे. हीं वर्णनें शिवशक्तीच्या वर्णनांशी विसंगत आहेत. कारण उपनिषदांत ज्याप्रमाणें ब्रह्माला जगताच्या सर्गस्थितिप्रलयांचें मूलकारण मानलें आहे तसेंच शिवशक्ति ही जगाच्या सर्गस्थितिप्रलयांचें आदिकारण आहे असें *प्रारंभीच्या श्लोकांत सांगितलें आहे. उपनिषदांतील जगताचें आदिकारण* जें ब्रह्म आहे तें सगुण ब्रह्म आहे. म्हणजे सत्त्व, रजस् व तमस् या गुणांनीं युक्त आहे हें स्पष्ट होतें. तसेंच प्रस्तुत श्लोकांतील शिवशक्ति ही आदिकारण सगुण आहे. म्हणजेच ब्रह्मदेव, विष्णु व शिव हे अनुक्रमें रजस, सत्त्व व तमस् या गुणांचें प्रतीक देव आहेत. आदिशिवशक्ति ही सगुण ब्रह्माप्रमाणें जगताचें आदिकारण आहे. पण उपनिषत्तत्त्वज्ञान व *शाक्ततत्त्वज्ञान यांत* एक फरक असा आहे कीं, *शाक्ततत्त्वज्ञानांत ह्या गुणांना* देवतारूप दिलें

आहे. याचा अर्थ असा कीं, रजोगुण ब्रह्मा सृष्टि निर्मितो, सत्त्वगुण विष्णु सृष्टीचें पालन करतो व तमोगुण शिव सृष्टीचा संहार करतो. तेव्हां अशा प्रकारें आद्यशिवशक्ति हें कारण व त्रिगुणात्मक ब्रह्मा, विष्णु व महेश हें कार्य. म्हणजेच शिवशक्ति व त्रिगुणात्मक देवता यांच्यांत कार्यकारण भेद उत्पन्न झाला आणि हा भेद जगताच्या अंतापर्यंत असाच राहणार. म्हणजे ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या त्रिगुणात्मक देवता कार्यरूपानें भिन्न राहणार. म्हणून आद्यशक्ति ही ह्या तीन देवतांपैकीं एकाची पत्नी होऊं शकणार नाहीं. कार्यकारणांचा अभेद असल्यामुळें आदिकारण शिव तोच संहारकर्त्या-हराशीं एकरूप होईल व ह्या दृष्टीनें आदिशक्तीला संहारकर्त्या शिवाची पत्नी म्हणतां येईल. पण ह्या तर्कपद्धतींत दोष असा आहे कीं, कार्यकारणाचें जरी ऐक्य असलें व संहारकर्त्या शिवाच्या पत्नीशीं आदिशक्तीचें ऐक्य मानलें तर सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाची पत्नी सरस्वती व स्थितिकर्त्या विष्णूची पत्नी लक्ष्मी ह्यांचेंहि आदिशिवशक्तीशीं ऐक्य मानणें आवश्यक आहे. म्हणजेच ब्रह्मा व विष्णु हे आदिशिवरूप आणि सरस्वती व लक्ष्मी ह्या आदिशक्तिरूप मानल्या पाहिजेत. पण प्रस्तुत स्तोत्रांत तसें मानलें गेलें नाहीं. संहारकर्त्या शिवाच्या पत्नीलाच आदिशक्तिरूप मानून त्याप्रमाणें स्तोत्रांत वर्णन केलें आहे. सरस्वती व लक्ष्मी ह्यांची भिन्नत्वाचीं वर्णनें आहेत, एकत्वाचीं नाहींत.

येथें सौन्दर्यलहरीचा पूर्वार्ध समाप्त झाला.

गतैर्माणिक्यत्वं गगनमणिभिः सान्द्रघटितं
किरीटं ते हैमं हिमगिरिसुते कीर्तयति यः ।
स नीडेयच्छायाच्छुरणशबलं चन्द्रशकलं
धनुः शौनासीरं किमिति न निबध्नाति धिषणाम् ॥४३॥

हे हिमगिरिसुते, तुझा सोनेरी मुकुट द्वादश आदित्यरूपी माणिक्य-रत्नांनीं भरदार व सुशोभित झालेला आहे. अगा या किरीटाचें जो वर्णन करतो तो खच्चून भरलेल्या व जवळजवळ असलेल्या रत्नखचित मुकुटावरील निरनिराळ्या रंगच्छटामुळें भासमान होणाऱ्या चंद्रकोराकृतीस इंद्रधनुष्या-प्रमाणें कां समजणार नाहीं ? अर्थात् तशी बुद्धि त्यास होईलच.

टीपा —या श्लोकापासून उत्तरार्ध सुरू असून त्यास सौन्दर्यलहरी असें नाव काहीं टीकाकार देतात आणि श्लोक १ ते ४२ पर्यंतच्या भागाला आनंदलहरी असें नाव देतात पण लक्ष्मीधर, भास्करराय, कैवल्याश्रम इत्यादि टीकाकार संपूर्ण स्तोत्राला सौंदर्यलहरी म्हणतात या श्लोकापासून देवी भगवतीच्या मस्तकापासून पायापर्यंतचें वर्णन सुरू झालें आहे प्रस्तुत श्लोकात उल्लेखिलेला माणिक्यरत्नविभूषित असा किरीट दाक्षिणात्य पद्धतीचा मानतात या श्लोकाशीं समानार्थी श्लोक ललितासहस्रनामाच्या प्रारंभीं आहे तो असा —

' सिन्दूरारुणविग्रहा त्रिनयना माणिक्यमौलिस्फुर
त्तारानायकशेखरा स्मितमुखीमापीनवक्षोरुहाम् ।
पाणिभ्यामलिपूर्णरत्नचषक रक्तोत्पल बिभ्रतीं
सौम्या रत्नघटस्थरक्तचरणा ध्यायेत्परामम्बिकाम् ॥'

मुकुटामध्यें बसविलेलीं विविध जातींचीं रत्नें विविध वर्णाच्या छटा इतस्ततः पसरवितात त्या छटा धनुष्याकार असलेल्या चन्द्रामध्यें प्रतिबिंबित होत असल्यानें तो चंद्र इंद्रधनुष्याप्रमाणें दिसतो असें येथें वर्णिलें आहे.

कैवल्याश्रमाच्या मतें या श्लोकात 'हेमकिरीटाय सहस्रादित्यतेजसे नमः' हा किरीटमन्त्र उद्धृत केला आहे

धुनोतु ध्वान्तं नस्तुलितदलितेन्दीवरवनं
घनस्निग्धश्लक्ष्णं चिकुरनिकुरुम्बं तव शिवे ।
यदीयं सौरभ्यं सहजमुपलब्धुं सुमनसो
वसन्त्यस्मिन्मन्ये वलमथनवाटीविटपिनाम् ॥ ४४ ॥

हे भगवति, तुझा धम्मिल्ल म्हणजे केशकलाप आमच्या अंतःकरणातील अज्ञानरूपी तिमिर दूर करो तो केशपाश घनदाट, स्नेहयुक्त आणि मृदु असून तो फुललेल्या नीलकमलाच्या समूहासारखा शोभून दिसत आहे त्याच्या अभिजात सुगंधाचा लाभ होण्यासाठीं, मला वाटतें, नंदनवनातील कल्पवृक्षाचीं फुलं वेणीच्या रूपानें तेथें वास्तव्य करीत आहेत

टीपा—इन्द्रानें वल नावाच्या राक्षसाचा नाश केल्यामुळें त्याला वलासुर किंवा प्रस्तुत श्लोकात वलमथन असें म्हटलें आहे इंद्राच्या उपवनाला

नंदनवन हें नामाभिधान असून तेथील वृक्षांना कल्पवृक्ष ही संज्ञा आहे. सर्वसाधारणपणें स्त्रिया आपल्या केशकलापाचें सौगन्ध्य व सौंदर्य वाढविण्यासाठीं फुलें किंवा फुलांच्या वेण्या वापरतात. परंतु भगवतीच्या बाबतींत उलट आहे. भगवतीच्या केशकलापाचें सौंदर्य व सौगन्ध्य इतकें अपूर्व आहे कीं, प्रत्यक्ष इंद्राच्या नंदनवनांतील कल्पवृक्षांचीं फुलें त्या सौगन्ध्याचा लाभ व्हावा म्हणून भगवतीच्या केशकलापांत सतत वास करून आहेत.

वहन्ती सिन्दूरं प्रबलकबरीभारतिमिर-
द्विषां वृन्दैर्वन्दीकृतमिव नवीनार्ककिरणम् ।
तनोतु क्षेमं नस्तव वदनसौन्दर्यलहरी-
परीवाहस्रोतःसरणिरिव सीमन्तसरणिः ॥ ४५ ॥

हे भगवति, तुझ्या मुखसौंदर्यलहरीच्या प्रवाहाच्या मार्गासारखा घनदाट दिसणारा केशसंभाराचा भांग हा शत्रूंच्या अंधकाररूपी समूहानें जणुं कांहीं बंदिस्त केलेल्या उदयोन्मुख सूर्याच्या कोमल किरणांप्रमाणेंच असलेल्या सिंदूरास धारण करणारा आहे. तुझा हा भांग आमचें कल्याण करो.

टीपा— भांगामध्यें सौभाग्यालंकार म्हणून स्त्रिया सिंदूराचें चूर्ण धारण करतात हें आपल्या माहितीचेंच आहे. प्रस्तुत श्लोकांत आचार्यांनीं भगवतीच्या भांगांतील सिंदूरावर केलेली उत्प्रेक्षा फारच बहारदार आहे. भगवतीचा केशसंभार हा अंधकारासारखा काळा आहे आणि सूर्याचे किरण तर अंधकाराचा नाश करतात. म्हणून उदयोन्मुख सूर्यकिरणांना भगवतीच्या केशसंभाराचा शत्रू मानलें आहे. भांगामध्यें धारण केलेला सिंदूर सूर्यकिरणांसारखा दिसतो. या सूर्यकिरणरूपी सिंदुराला केशसंभाररूपी शत्रूनें बंदिस्त करून ठेवलें आहे ही आचार्यांनी कल्पना केली आहे.

मागील श्लोकांत भगवतीचें सौंदर्यवर्णन करून प्रस्तुत श्लोकांत भगवतीविषयक भक्तिभावाचें महत्त्व सांगितलें आहे. या श्लोकांत म्हटलें आहे कीं, भगवतीची भक्ति केल्यानें अज्ञानरूपी अंधकार दूर होतो आणि मोक्षाचें साधन असलेल्या ज्ञानाची प्राप्ति होते.

या स्तोत्राच्या उत्तरार्धाला दिलेल्या नांवाचें सार्थक्य दाखविणारा सौंदर्यलहरी हा शब्द या श्लोकांत आला आहे व तो लक्षवेधक आहे

अरालैः स्वाभाव्यादलिकुलहसश्रीभिरलकैः
परीतं ते वक्त्रं परिहसति पङ्केरुहरुचिम् ।
दरस्मेरे यस्मिन् दशनरुचिकिञ्जल्करुचिरे
सुगन्धौ माद्यन्ति स्मरमथनचक्षुर्मधुलिहः ॥ ४६ ॥

स्वभावतःच कुटिल म्हणजे कुरळे आणि भ्रमरसमुहाच्या शोभेलाहि मागें टाकणाऱ्या केसांनीं वेष्टित असलेलें तुझें मुख कमलाच्या कांतीला तुच्छ लेखतें. तूं किंचित् स्मित करतेवेळीं कमलाच्या केसरासारख्या सुंदर दंतकांतीनें शोभणाऱ्या व सुगंधित असलेल्या तुझ्या मुखकमलानें आकर्षित होऊन मदनाचें दहन करणाऱ्या शिवाचे नयनरूपी भ्रमर मत्त होतात.

टीपा— मदनालाहि जाळणाऱ्या शंकराचे नेत्र स्मितहास्य करणाऱ्या तुझ्या मुखानें मोहित होऊन मत्त होतात. तुझ्या मुखाचें सौंदर्य असें अलौकिक आहे, हा प्रस्तुत श्लोकाचा भावार्थ.

ललाटं लावण्यद्युतिविमलमाभाति तव यद्—
द्वितीयं तन्मन्ये मकुटघटितं चन्द्रशकलम् ।
विपर्यासन्यासादुभयमपि संभूय च मिथः
सुधालेपस्यूतिः परिणमति राकाहिमकरः ॥४७॥

सौंदर्य व कान्ति यांनीं विलसित झालेलें तुझें ललाट जणूं काय तुझ्या मुकुटांत असलेली दुसरी चंद्रकोरच आहे असे मला वाटतें हे दोन्हीं चंद्रार्धे उलट करून ठेवले म्हणजे दोन्ही मिळून अमृताचा वर्षाव करणाऱ्या पूर्णिमेच्या चंद्रासारखे दिसतात.

टीपा —ललाट हें अधोमुख अर्धवर्तुळासारखें आहे, तर मुकुटातील चंद्र ऊर्ध्वमुख अर्धवर्तुळासारखा आहे ललाटरूपी चंद्रार्ध व मुकुटांतील चंद्रार्ध विरुद्ध दिशांनीं स्थित आहेत हे दोन्ही चंद्रार्धे उलट करून जुळवून ठेवले म्हणजे पूर्णिमेच्या चंद्राप्रमाणें संपूर्ण चंद्रबिंब होतें. प्रस्तुत श्लोकात वर्णन केलेल्या पूर्ण चंद्राकृतीमध्यें थोडीशी पोकळीहि राहिलेली दिसते. ती जणूं चंद्राचा कलंकच आहे तसेंच श्लोकामध्यें ‘ सुधा ’ शब्दहि सुंदर रीतीनें द्व्यर्थी वापरलेला आहे सुधा म्हणजे अमृत हें तर प्रसिद्धच आहे. सुधाचा

दुसरा अर्थ चुना असा आहे गृहरचना करतेवेळीं शिला वगैरे साधण्यास चुन्याचा उपयोग करतात तद्वतच भगवतीच्या मुकुटांतील चन्द्राचें शकल व तिचें ललाटरूपी असलेले दुसर चन्द्रशकल, हीं दोन्हीं शकलें साधण्यास सुधेचा म्हणजे चुन्याचा उपयोग केला आहे, हा आशय

भ्रुवौ भुग्ने किंचिद्भुवनभयभङ्गव्यसनिनि
त्वदीये नेत्राभ्या मधुकररुचिभ्यां धृतगुणम् ।
धनुर्मन्ये सव्येतरकरगृहीतं रतिपतेः
प्रकोष्ठे मुष्टौ च स्थगयति निगूढान्तरमुमे ॥ ४८ ॥

ससारभयाचा नाश करण्यास नेहमीं तत्पर असलेल्या उमे, तुझ्या वक्र भ्रुकुटी म्हणजे जणू काहीं मदनाचें धनुष्य असून भ्रमराप्रमाणें असणारे तुझे कृष्णवर्ण डोळे हे जणू त्या धनुष्याची दोरी आहे त धनुष्य मदनानें आपल्या डाव्या हातात धरल्यामुळें त्याचा मध्यभाग डार्ई मनगट व मूठ यानीं झाकला गेला असल्यामुळ दिसत नाहीं

टीपा—प्रस्तुत श्लोकाचा भावार्थ असा आहे की, भगवतीच्या नेत्र कटाक्षानें कामदेवाचें धनुष्य धरून तिनें ताब्यात ठेवलें आहे त्यामुळें कामलोलुप म्हणजे विषयलपट ससारी जनाना देवीच्या कृपाकटाक्षानें कोणत्याहि तऱ्हेची उच्छृखल बाधा होत नाहीं भगवद्गीता सागते कीं, ससारी जनाला काम हा एक बलाढ्य शत्रु आहे परतु त्याच्यावर ताबा मिळवावयाचा म्हणजे भगवतीच्या कृपाकटाक्षाची जरुरी आहे हें कार्य इतकें कठीण आहे कीं, भगवतीची कृपा असल्याखेरीज तें साध्य होत नाहीं

अहः सूते सव्य तव नयनमर्कात्मकतया
त्रियामा वामं ते सृजति रजनीनायकतया
तृतीया ते दृष्टिर्दरदलितहेमाम्बुजरुचिः
समाधत्ते संध्या दिवसनिशयोरन्तरचरीम् ॥४९॥

तुझा उजवा डोळा हा सूर्यरूप असल्यामुळ तो दिवस निर्माण करतो आणि डावा डोळा चद्ररूप असल्यामुळें रात्र निर्मितो तुझा तिसरा डोळा

किंचित् उमललेल्या सुवर्णकमलाची शोभा दाखवतो व तो दिवस व रात्र यामधील संध्या निर्माण करतो.

टीपा— मागील श्लोकांत भगवतीच्या भ्रुकुटीचें वर्णन आहे, तर या श्लोकांत तिच्या नेत्रांचें वर्णन आहे. भगवती ही भगवान् शंकराप्रमाणेंच त्रिनेत्र आहे. असें असल्यामुळें त्या उभयतांचें ऐक्य येथें सूचित केलें आहे. तसेंच भगवतीनें आपल्या त्रिनेत्रांनीं तिन्ही काळ म्हणजे दिवस, रात्र व संधिकाल निर्मिल्यानें ती भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही कालाची स्वामिनी आहे असें सूचित केलें आहे भगवती स्वतः मात्र कालातीत आहे.

अरुणामोदिनीटीकाकारानें भगवतीच्या तिन्ही नेत्रांचें कार्य दिलें आहे तें असें—एक नेत्र सूर्यरूप असल्यानें तो सर्व विश्वाला प्रकाशित करतो व जनांना उपासनादि कार्याकडे प्रवृत्त करतो. दुसरा चंद्ररूपानें सर्व जगताला आल्हादित करतो आणि तिसरा नेत्र अग्नीच्या रूपानें अग्निहोत्रादि कार्ये प्रवर्तित करतो.

विशाला कल्याणी स्फुटरुचिरयोध्या कुवलयैः
कृपाधाराधारा किमपि मधुरा भोगवतिका ।
अवन्ती दृष्टिस्ते बहुनगरविस्तारविजया
ध्रुवं तत्तन्नामव्यवहरणयोग्या विजयते ॥५०॥

हे भगवति, तुझी दृष्टि विशाल म्हणजे विस्तारयुक्त अर्थात् व्यापक आहे (विशाला) ती कल्याण करणारी आहे (कल्याणी) तसेंच प्रस्फुट कांतियुक्त कमलाच्याकडून न जिंकली गेलेली (अयोध्या), कृपादृष्टीच्या धारेस आधारभूत असलेली (धारा) आणि अवर्णनीय मधुरता (मधुरा) युक्त, अनिर्वचनीय सुखानुभव (भोगवती) देणारी, रक्षण करणारी (अवन्ती) आणि अनेक नगराच्या विस्तारामुळें विजय पावणारी (विजयानगरी) तुझी दृष्टि खरोखर त्या त्या नांवानें वर्णन करण्यास योग्य आहे

टीपा— ह्या श्लोकात विशालापासून विजयापर्यंत आठ नगरींचीं नावें देऊन भगवतीच्या दृष्टीचें आठ प्रकारानीं वर्णन केलें आहे म्हणून नगरींचीं तीं तीं नावें द्व्यर्थी म्हणजे श्लेषयुक्त आहेत त्या नगरींची व दृष्टींचीं अन्वर्थक वर्णनें अशीं—

(१) विशाला हें एका नगरीचें नांव आहे. भगवतीची दृष्टि विशाला म्हणजे सर्वव्यापी आहे. ही दृष्टि अन्तर्विकासरूपा आहे. (२) कल्याणी ही एक नगरी. देवी भगवतीची दृष्टि असूयादि दोषांपासून रहित असून नित्य प्रसन्न असते. साधकांचें कल्याण करणारी ही दृष्टि आहे. लक्ष्मीधरानें ह्या दृष्टीला विस्मिता असें म्हटलें आहे. (३) अयोध्या ही एक नगरी. देवी भगवतीची दृष्टि स्फुटरुचि म्हणजे जिची कान्ति अत्यंत स्पष्ट आहे. त्यामुळें नीलकमलांनाहि ह्या दृष्टीचा पराभव करतां येत नाहीं, इतकी ही अनुपमसौंदर्यवती आहे. हिला लक्ष्मीधर स्मेरकनीनिका हें नांव देतो. (४) धारा ही एक नगरी. भगवतीची दृष्टि कृपेच्या धारावर्षावाला आधार आहे. म्हणजे ती नेहमी करुणापरिपूर्ण आहे. ह्या दृष्टीला लक्ष्मीधर अलसादृष्टि म्हणतो. (५) मधुरा ( मथुरा ) ही एक नगरी आहे. कांहीं टीकाकारांच्या मतें ही मथुरा, तर कांहींच्या मतें ही मदुरा आहे. भगवतीची दृष्टि किमपि मधुरा म्हणजे जिच्याविषयीं कांहीं वर्णन करतां येत नाहीं म्हणजेच अवर्णनीय आणि जी दयायुक्त आहे हिला वलिता असेंहि म्हणतात. (६) भोगवती ही एक नगरी आहे. भगवतीची दृष्टि ही सर्व प्रकारचे सुखोपभोग देणारी आहे. कामेश्वरसूरि या दृष्टीचें वर्णन कामेश्वरविषयहेलाविलासवती असें करतो, तर लक्ष्मीधर हिला स्निग्धा असें नांव देतो. (७) अवन्ती ही एक नगरी आहे भगवतीची दृष्टि ही अवन्ती म्हणजे भक्तजनांचें रक्षण करणारी आहे. लक्ष्मीधर या दृष्टीला मुग्धा असें नांव देतो. (८) विजया ही नगरी आहे भगवतीची ही दृष्टि सर्वत्र विजय देणारी आहे प्रान्तकनीनिका ही या दृष्टीची अवस्था असून तिला आकेकरा असें लक्ष्मीधरानें नाव दिले आहे

अशा प्रकारें ह्या अष्ट नगरींच्या नांवांनीं वर्णन करण्यास योग्य अशी भगवतीची अष्टविधा दृष्टि आहे. ह्या आठ दृष्टींचीं कार्ये लक्ष्मीधरानें खालील-प्रमाणें दिलीं आहेत.—

'एताः दृष्टयः सक्षोभण–आकर्षण – द्रावण – उन्माद–वश्य – उच्चाटन – विद्वेषण – मारणक्रियासु संभिन्नाः ।'

वरील नगरींपैकीं कांहीं नगरींविषयीं ऐतिहासिक माहिती उपलब्ध आहे. तिचा प्रस्तावनेंत उल्लेख केला आहे.

भगवतीची जशी अष्टविधा दृष्टि आहे, तसेंच शिवाच्या अष्टमूर्तित्वाचें वर्णन कालिदासानें शाकुंतल नाटकाच्या नांदीश्लोकांत दिलें आहे. तो श्लोक असा —

'या सृष्टिः स्रष्टुराद्या वहति विधिहुतं या हविर्या च होत्री
ये द्वे कालं विधत्तः श्रुतिविषयगुणा या स्थिता व्याप्य विश्वम्।
यामाहुः सर्वभूतप्रकृतिरिति यया प्राणिनः प्राणवन्तः
प्रत्यक्षाभिः प्रपन्नस्तनुभिरवतु वस्ताभिरष्टाभिरीशः ॥'

ब्रह्मदेवाची जी आद्यसृष्टि (जल), विधिपूर्वक यज्ञांत टाकलेल्या आहुतीचा जी स्वीकार करते (अग्नि), जी आहुति टाकते (यजमान), ज्या दोघी कालाची उत्पत्ति करतात (चंद्र व सूर्य), श्रवणेंद्रियाचा विषय असलेला शब्द जिचा गुण आहे व जी विश्वाला व्यापून राहते (आकाश), जिला सर्व बीजांची प्रकृति म्हणतात (पृथ्वी), जिच्यामुळें जीव प्राणयुक्त होतो (वायु) अशा ह्या आठ प्रत्यक्ष मूर्तींनीं युक्त असलेला शिव आपलें रक्षण करो.

भगवान् शिव जसे याप्रमाणें अष्टमूर्ति आहेत, तशी भगवती शिवा म्हणजे शक्ति हीसुद्धां अष्टदृष्टि आहे. मागील एका श्लोकांत (श्लोक ३६) सांगितलेंच आहे कीं, मन आदि सृष्टिरूपानें परिणत होण्यासाठी चिदानंद-रूप भगवतीनें शिवयुतत्व धारण केलें, तसेंच ती हरार्ध असल्याचा उल्लेखहि आपण श्लोक २३ मध्यें पाहिला. म्हणून भगवान् शिवाप्रमाणें भगवतीलाहि एका प्रकारें अष्टविधत्व असणें युक्तच होय.

कवीनां संदर्भस्तबकमकरन्दैकरसिकं
कटाक्षव्याक्षेपभ्रमरकलभौ कर्णयुगलम् ।
अमुञ्चन्तौ दृष्ट्वा तव नवरसास्वादतरला-
वसूयासंसर्गादलिकनयनः किंचिदरुणम् ॥५१॥

हे भगवति, तुझ्या भालप्रदेशीं असलेला तुझा तृतीय नेत्र दुसऱ्या दोन नेत्रांबद्दल मत्सरानें ग्रासल्यामुळें किंचित् लालसर आहे. असूयेचें कारण मला असें वाटतें कीं, वाल्मीकिव्यासप्रभृति कवीश्वरांचे काव्यग्रंथरूपी पुष्प-गुच्छांतील मधासंबंधीं अत्यंत लोलुप असलेल्या तुझ्या कानांना, शृंगारादि

नवरसांचा आस्वाद घेण्यासाठीं अत्यंत उत्सुक झालेलें तुझे नेत्रकटाक्षरूपी अमरशिशु मुळींच सोडत नाहींत हें होय.

टीपा— भगवती आकर्णान्तनेत्रा असल्यामुळें तिचे दोन्ही नेत्र कानांबरोबर काव्यग्रंथांतील नवरसांचा आस्वाद लुटत असल्यामुळें व तें सुख तृतीय नेत्राला मिळत नसल्यामुळें त्याला मत्सर वाटत आहे हा या श्लोकाचा भावार्थ.

अरुणामोदिनीटीकाकाराच्या मतें 'नवरस' म्हणजे 'नऊ रस' असा अर्थ नसून 'नवीन रस' असा आहे. नऊ रस खालील श्लोकांत दिले आहेत—

'शृङ्गारहास्यकरुणा रौद्रवीरभयानकाः ।
बीभत्साद्भुतशान्ताख्या रसा नव समीरिताः ॥'

प्राचीन ग्रंथकारांच्या मतें एकूण आठच रस असून शान्तरस हा नववा रस नतर कल्पिला आहे. काव्य हें नवरसांनीं युक्त असावें असा संकेत आहे. हा नवरसांचा उल्लेख सौंदर्यलहरीच्या कालनिर्णयाच्या संबंधांत फार महत्त्वाचा आहे. ह्या संबंधीचें विवेचन प्रस्तावनेंत केलें आहे.

शिवे शृङ्गारार्द्रा तदितरमुखे कुत्सनपरा
सरोषा गङ्गायां गिरिशनयने विस्मयवती ।
हराहिभ्यो भीता सरसिरुहसौभाग्यजननी
सखीषु स्मेरा ते मयि जननि दृष्टिः सकरुणा ॥५२॥

हे माते, तुझी दृष्टि शकराविषयीं शृंगाररसानें आर्द्र झालेली असते, शिवाहून देवांविषयीं बीभत्सरसानें युक्त असते, गंगेसंबंधीं सरोष म्हणजे क्रोधानें रौद्ररसानें खवळलेली असते, शिवाच्या तृतीय नेत्राविषयीं विस्मित म्हणजे अद्भुतरसयुक्त झालेली असते, शिवानें धारण केलेल्या सर्पाविषयीं भीतियुक्त म्हणजे भयानक रसयुक्त असते, कमलांना सौंदर्य निर्माण करणारी वीररसयुक्त असते आणि सखीसंबंधीं स्मित म्हणजे हास्यरसयुक्त असते. अशी ही अनेक रसात्मक असणारी तुझी दृष्टि माझ्याविषयीं करुणरसपर असो.

टीपा— ह्या श्लोकांत भगवतीच्या दृष्टीचें नवरसात्मक वर्णन आहे. यांत सर्व रस आहेत. तरीपण शान्तरस अनुपयुक्त आहे म्हणून येथें वर्णिला

नाहीं. शिवाच्या शृंगाररसप्रधान श्लोकांतील वर्णनांत त्याची जरुरी नाहीं. शान्तरस शमप्रधान आहे. ह्यासंबंधीं प्रमाणभूत म्हणून दशरूपकनामक अलंकारविषयक ग्रंथांतील एक श्लोक कैवल्याश्रमानें उद्धृत केला आहे, तो असा—

> ' न यत्र दुःखं न सुखं न चिन्ता
> न द्वेषरागौ न च काचिदिच्छा ।
> रसः स शान्तः कथितो मुनीन्द्रैः
> सर्वेषु भावेषु शमप्रधानः ॥ '

रस आठच आहेत. ह्यासंबंधीं लक्ष्मीधरानें पुढील आधार दिला आहे—

' विक्रियाजनका एव रसाः ' इत्यष्टौ रसाः ।

रस हे विक्रियाजनकच आहेत. पण शान्तरसांत विकाराचा अभाव असतो म्हणून शान्तरस हा रस मानूं नये अशा अर्थाचें भरतवचन असें—

' शान्तस्य निर्विकारत्वान्न शान्तं मेनिरे रसम् । '

प्रस्तुत श्लोकांत रसांचें अष्टविधत्वच उद्दिष्ट असावें, हें अनुमान सयुक्तिक वाटतें. यापुढील श्लोकांत आचार्य सांगतात कीं, भगवतीचें नेत्र शिवाच्या चित्तांतील शान्तस्थितीला दूर करून चित्ताला उन्मत्त करतात. येथें शान्तरसाचा अभाव व्यंग्य आहे. तसेंच प्रस्तुत श्लोकांत भगवतीच्या दृष्टीचें अष्टविधच वर्णन आहे. रसाचें हें अष्टविधत्व आणखीहि एका कारणामुळें संभाव्य वाटतें. शक्ति ही त्रिविध आहे. इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति. यांपैकीं क्रियाशक्तीच्या सामर्थ्यानें विश्वोत्पत्ति होते. शिवशक्ति ही सत्त्व, रजस् व तमस या त्रिगुणांनीं संपन्न आहे. विश्वोत्पत्तीच्या वेळीं क्रियाशक्तीला प्राधान्य असतें आणि तींत रजस् व तमस् या गुणांचें प्राधान्य असतें. सत्त्वगुण अत्यंत अप्रधान असतो. म्हणजेच शान्तरसाला अप्राधान्य असतें. म्हणूनहि शृंगाराच्या वर्णनसमयीं शान्तरसाचा उल्लेख नसल्यास त्यांत अनुचित कांहीं नाहीं.

याच अर्थाचें समर्थन श्रीरामकवीनें आपल्या डिण्डिमभाष्यांत केलें आहे तें असें—

' अत्र श्लोके शृङ्गारादीनामष्टानाम् अनाधरसानां संसारानाथे नियोगित्वात् महानटी प्रकृतिभट्टारिकामेवाश्रित्य वृत्तिरुक्ता, शान्तस्य तु नवमस्य

रसस्य प्रबोधचन्द्रव्यज्यमानवपुषः संसारसुखदुःखानुभवात्मकबहुचित्तव्याक्षेपजनितेन निर्वेदनाम्ना स्थायिभावेन सततमुपेतस्य सकलचेष्टाध्वंसात्मकस्य निर्वेदव्यतिरिक्तसर्वसंसारभावरहितस्य एकरूपस्याखण्डात्मकस्य महादेवैकाश्रयत्वात् भगवतीति चरित्रैकपात्रे न प्रतिपादनम्।'

प्रस्तुत श्लोकाच्याच अर्थाचा दुसरा श्लोक शृंगारतिलकनामक ग्रंथात शंकरवर्णनपर आहे तो असा —

'शृङ्गारी गिरिजानने सकरुणो रत्या प्रवीरः स्मरे
बीभत्सोऽस्थिभिरुत्फणी च भयकृन्मूर्त्याद्भुतस्तुङ्गया ।
रौद्रो दक्षविमर्दने च हसकृन्नग्नः प्रशान्तश्चिरा
दित्थ सर्वरसात्मकः पशुपतिर्भूयात्सता भूतये ॥'

अशाच प्रकारचें वर्णन असणारा रामवर्णनपर श्लोक कैवल्याश्रमानें उद्धृत केला आहे तो असा—

'सक्रोधा दशकधरे सकरुणा तस्यानुजे सस्मिता
प्रोत्फाले पवनौकसां सकुतुका युद्धे सनिन्दाम्बुधौ ।
साश्चर्या हनुमत्कृते सचकिता ब्रह्मान्वयोच्छेदने
सोद्वेगा दयितास्मृतौ मुकुलिता रामस्य दृष्टिः स्थिता ॥'

**गते कर्णाभ्यर्णं गरुत इव पक्ष्माणि दधती**
**पुरां भेत्तुश्चित्तप्रशमरसविद्रावणफले ।**
**इमे नेत्रे गोत्राधरपतिकुलोत्तंसकलिके**
**तवाकर्णाकृष्टस्मरशरविलासं कलयतः ॥ ५२ ॥**

हे भगवति, पर्वतराज हिमालय याच कुळ हाच कल्पवृक्ष, त्याची तू सुंदर कलिका ( कळी ) आहेस. तुझे कानापर्यंत जाऊन भिडलेले दोन नेत्र त्रिपुरासुराचा वध करणाऱ्या शिवाच्या अंतःकरणातील शांतरसाचा नाश करण्यास समर्थ आहेत. तुझे हे दोन्ही नेत्र जणू काहीं मदनानें आपले धनुष्यच कानापर्यंत खेचून धरलेल्या बाणाची शोभा धारण करीत आहेत असें वाटतें.

टीपा—हे भगवति, तुझे नेत्रकटाक्ष बाणाच्या टोंकाप्रमाणें तीक्ष्ण असून, तुझ्या पापण्या ह्या बाणाच्या पिसाप्रमाणें आहेत. तुझे नेत्र दीर्घ असल्यानें कानापर्यंत जाऊन भिडलेले असल्यामुळें ते जणूं कांहीं शरसंधान करण्यासाठीं मदनानें कानापर्यंत खेचलेल्या बाणाप्रमाणें शोभून दिसतात.

ह्या श्लोकांतहि शान्तरसाचा अभावच वर्णिला असून मागील श्लोकांतील कल्पनेचा पाठपुरावा केला आहे. सृष्टोत्पत्तीच्यापूर्वी भगवान् शिव निष्क्रिय म्हणजे उदासीन व शांत असतात. भगवतीच्या कटाक्षामुळेंच शिवशक्तींचें ऐक्य होऊन अखिल विश्वाची निर्मिति होते. अशा प्रकारें विश्वाच्या अस्तित्वकाळीं शान्तरसाचा नाश होऊन त्याच्याशिवाय इतर आठ रसच प्रभाव पावतात हें ह्या श्लोकांतील 'प्रशमरसविद्रावण' या सामासिक पदानें सुचविलें आहे.

भगवान् शिवाला पुरांचा नाश करणारा असें म्हटलें आहे. त्रिपुर म्हणजे त्रिपुरासुर असा सामान्य अर्थ आहे. दुसरा एक तात्त्विक अर्थ सांगतां येईल. जगत् हें त्रिगुणात्मक आहे. म्हणजे तें सत्त्व, रजस्, व तमस्, या तीन गुणांनीं युक्त आहे. जगताच्या सृष्टि, स्थिति व लय या तीन अवस्था व ह्या तीन अवस्थांच्या देवता ब्रह्मा, विष्णु व महेश या होत. शिवाच्या मूळ शक्ति तीनच आणि त्या म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया ह्या होत. तसेंच विश्वाचे तीन विभाग असून ( भूमि, अंतरिक्ष व द्यु ) त्यांच्याहि तीन देवता आहेत ( अग्नि, चंद्र व सूर्य ). भगवतीला भक्त त्रिपुरा म्हणतात. हें सर्व सांगणारा एक श्लोक लघुस्तवस्तोत्रांत आहे तो असा—

'देवानां त्रितयी त्रयी हुतभुजां शक्तित्रयं त्रिस्वरा-<br>
स्त्रैलोक्यं त्रिपदी त्रिपुष्करमथो त्रिब्रह्म वर्णास्त्रयः।<br>
यत्किञ्चिज्जगति त्रिधा नियमितं वस्तु त्रिवर्गादिकं<br>
तत्सर्वं त्रिपुरेति नाम भगवत्यन्वेति ते तत्त्वतः॥

शिवांनीं कामदेवास भस्म केलें. तो सजीव पण शरीररहित राहिला असल्यानें त्यास अनङ्ग म्हणतात. भगवतीच्या नेत्रकटाक्षांत कामदेव सजीव करण्याचें सामर्थ्य येथें दिसून येतें. इतकेंच नव्हे तर शिवाची विरक्ति नाहींशी करून सृष्टोत्पत्तीला योग्य वातावरण उत्पन्न करण्याचेंहि सामर्थ्य भगवतीच्या नेत्रकटाक्षांत आहे या श्लोकावरून दिसून येतें.

त्रिभक्तत्रैवर्ण्यं व्यतिकरितलीलाञ्जनतया
विभाति त्वन्नेत्रत्रितयमिदमीशानदयिते ।
पुनः स्रष्टुं देवान् द्रुहिणहरिरुद्रानुपरतान्
रजः सत्त्वं बिभ्रत्तम इव गुणानां त्रयमिव ॥ ५४ ॥

हे शिवपत्नि, तुझे त्रिनेत्र तीन वर्णांचे म्हणजे श्वेत, रक्त व श्यामवर्णांचे आहेत. त्यांना निळ्या रंगाचें अंजन ( काजळ ) लावलें आहे म्हणून हे तुझे त्रिनेत्र विश्वसंहारकालीं नष्ट झालेल्या ब्रह्मा, विष्णु व रुद्र ह्या देवतांना पुनः उत्पन्न करण्यास रजस्, सत्त्व व तमस् या तीन गुणांनाच धारण करीत आहेत.

**टीपा** —भगवतीच्या तीन नेत्रांचे वर्ण शुक्ल, रक्त व नील हे आहेत आणि हे तीन वर्ण तीन गुणांचें द्योतक आहेत. सत्त्वगुण हा शुक्लवर्ण आहे, रजोगुण हा रक्तवर्ण आहे, तर तमोगुण हा नीलवर्ण आहे. भगवतीचे तीन नेत्र अग्नि, चंद्र व सूर्यरूप असल्यामुळें तिच्या नेत्रांमध्येंहि अग्नि, चंद्र व सूर्य यांचे रक्त, नील व शुक्ल हे तीन वर्ण आहेत.

प्रलयकालीं ब्रह्मा, विष्णु व रुद्र आपलें मूळ कारण जो शिव त्यांत विलीन होतात, म्हणून त्यांना 'उपरतान्' असें प्रस्तुत श्लोकांत म्हटलें आहे. सृष्टोत्पत्तिसमयीं भगवतीच्या तीन गुणांपासून ह्या तीन देवता उत्पन्न होतात. रजोगुणापासून ब्रह्मदेव, सत्त्वगुणापासून विष्णु व तमोगुणापासून शिव उत्पन्न होतात आणि म्हणूनच ब्रह्मा, विष्णु व महेश यांना उत्पन्न करण्यासाठीं भगवतीच्या तीन नेत्रांनीं तीन गुण धारण केले आहेत असें प्रस्तुत श्लोकांत म्हटले आहे.

पवित्रीकर्तुं नः पशुपतिपराधीनहृदये
दयामित्रैर्नेत्रैररुणधवलश्यामरुचिभिः ।
नदः शोणो गङ्गा तपनतनयेति ध्रुवममुं
त्रयाणां तीर्थानामुपनयसि संभेदमनघम् ॥ ५५ ॥

हे भगवति, तूं आपलें चित्त पशुपति जो महादेव त्याच्या आधीन केलें आहेस. दयेनें ओथंबलेल्या तुझ्या डोळ्यांचे वर्ण तांबूस, पांढरा व श्यामल आहेत.

जणूं कांहीं शोणनद, गंगानदी व सूर्यतनया यमुना ह्या तीन तीर्थांचे एकत्रीकरण तुझ्या मुखकमलाचें ठिकाणीं आम्हांला पावन करण्यासाठीं केलें आहेस.

टीपा— भगवतीच्या कृपाकटाक्षानें उपासक पवित्र होतो. तीर्थस्नानानेंहि पवित्रता प्राप्त होते. म्हणून भगवतीच्या कृपाकटाक्षास तीर्थांची उपमा दिली आहे. शोण हा पवित्र नद आहे. गंगानदीचें पावित्र्य सर्व विश्रुतच आहे आणि यमुनानदी तर तीर्थच आहे. ह्या तीन नद्यांचा वर्ण रक्त, शुक्र व नील आहे. भगवतीच्या तीन नेत्रांचे वर्णहि तीनच आहेत म्हणून या तीन नद्यांचा संगम भगवतीच्या मुखकमलाचें ठिकाणीं झाला आहे असें म्हटलें आहे.

प्रस्तुत श्लोकांत शिवास पशुपति म्हटलें आहे. या सृष्टींतील अज्ञानी जीव म्हणजे पशु. त्यांना उत्पन्न करणारा अधिपति तो पशुपति किंवा पशुपति या शब्दाचें स्पष्टीकरण खालीलप्रमाणेंहि करता येईल. जीव अज्ञानी असल्यामुळें त्याला पशु असें म्हटलें आहे आणि त्याला अज्ञानांतून मुक्त करणारा शिव तो पशुपति. शिवशक्तीच्या उपासनेनें अज्ञान दूर होतें हें सांगणारा खालील श्लोक पाहा—

'आरोग्यं भास्करादिच्छेद् धनमिच्छेत्कुबेरतः ।
ज्ञानं महेश्वरादिच्छेन् मोक्षमिच्छेज्जनार्दनात् ॥'

तवापर्णे कर्णेजपनयनपैशुन्यचकिता
निलीयन्ते तोये नियतमनिमेषाः शफरिकाः ।
इयं च श्रीर्बद्धच्छदपुटकवाटं कुवलयं
जहाति प्रत्यूषे निशि च विघटय्य प्रविशति ॥ ५६ ॥

हे पार्वति, तुझे नेत्र कानापर्यंत पोहोंचले असल्याकारणानें जणूं कांहीं आपल्याविरूद्ध चहाडी करतात असें वाटून भयभीत झालेल्या मत्स्यस्त्रिया आपले डोळे उघडझांप न करतां ( अनिमिष ) पाण्यामध्यें अदृश्य होतात; व ही लक्ष्मीसुद्धां तुझ्या नेत्रकमळाचें सौंदर्य पाहून लज्जित झाल्यामुळें आपले निवासस्थान जें नीलकमल त्याचा प्रातःकालीं त्याग करते व रात्रीं तें उघडून त्यांत वास करते.

टीपा— भगवतीचें नेत्र मत्स्यस्त्रियांप्रमाणें तरल आणि नीलकमलाप्रमाणें सुंदर आहेत हेंच सांगण्याचा प्रस्तुत श्लोकाचा उद्देश आहे व आचार्यांनीं तो अलकारिक पद्धतीनें सांगितला आहे. मत्स्य आपल्या डोळ्यांची उघडझांप न करतां पाण्यांत राहतात व नीलकमलें दिवसा निमीलित असून रात्रीं उन्मीलित होतात. यांच्या अनुषंगानें भगवतीच्या नेत्रांचें हें वर्णन आहे.

निमेषोन्मेषाभ्यां प्रलयमुदयं याति जगती
तवेत्याहुः सन्तो धरणिधरराजन्यतनये ।
त्वदुन्मेषाज्जातं जगदिदमशेषं प्रलयतः
परित्रातुं शङ्के परिहृतनिमेषास्तव दृशः ॥ ५७ ॥

हे पर्वतराजहिमालयकन्ये भगवति, तुझ्या नेत्रांच्या निमेषोन्मेषांनीं म्हणजे तुझ्या डोळ्यांच्या पापण्या झांकणें व उघडणें या क्रियांनीं सृष्टीचा प्रलय व उत्पत्ति ही होतात असें तत्त्वज्ञानी सांगतात. तुझ्या नेत्रोन्मेषानें उत्पन्न झालेली ही अखिल सृष्टि, तिचें संहारापासून संरक्षण करण्यासाठीं तुझ्या नेत्रांनीं पापण्या मिटण्याचें कार्य सोडून दिलें आहे, म्हणजेच तुझी दृष्टि अनिमिष राहिली आहे

टीपा— देवता अनिमिष आहेत अशी कल्पना आहे या कल्पनेच्याच आधारें प्रस्तुत श्लोकांतील वर्णन आहे अशाच अर्थाचा वत्सराजकृत कामसिद्धिस्तोत्रांतील एक श्लोक कामेश्वरसूरीनें उद्धृत केला आहे तो असा—

'लोकाश्चतुर्दश महेन्द्रमुखाश्च देवा
मूर्तित्रय मुनिगणाश्च वसिष्ठमुख्याः ।
सद्यो भवन्ति न भवन्ति समस्तमूर्ते-
रुन्मीलनेन तव देवि निमीलनेन ॥'

दृशा द्राघीयस्या दरदलितनीलोत्पलरुचा
दवीयांसं दीनं स्नपय कृपया मामपि शिवे ।
अनेनायं धन्यो भवति न च ते हानिरियता

हे शिवे, तुझ्या दीर्घ आणि किंचित् उमललेल्या निळ्या कमलाची शोभा धारण करणाऱ्या दृष्टीचा क्षेप ( कटाक्ष ) अत्यंत दूर असलेल्या दीन अशा माझ्यावर नूं करून तुझ्या कृपेच्या वर्षावानें मला स्नान घाल. त्यामुळें हा मी धन्य होईन आणि त्यामुळें तुझी कांहीं हानि होणार नाहीं. कारण शीतकिरणयुक्त चंद्र अरण्यावर किंवा राजवाड्यावर सारखाच प्रकाश टाकतो.

टीपा — या श्लोकांत सुंदर अर्थान्तरन्यास अलंकार आहे. भगवतीची दृष्टि सर्वांविषयीं सम आहे, त्यांत पक्षपात नाहीं हेंच अर्थांतरन्यास अलंकाराची योजना करून सांगितलें आहे.

तसेंच भगवतीच्या दृष्टीला योजिलेलें 'दीर्घ' हें विशेषणहि साभिप्राय आहे. भगवतीच्या दृष्टीला दूर असें कांहींच नाहीं तर सर्व कांहीं तिच्या दृष्टिपथांतच असतें, हें 'दीर्घ' या विशेषणानें सुचविलें आहे.

अरालं ते पालीयुगलमगराजन्यतनये
न केषामाधत्ते कुसुमशरकोदण्डकुतुकम् ।
तिरश्चीनो यत्र श्रवणपथमुल्लङ्घ्य विलस-
न्नपाङ्गव्यासङ्गो दिशति शरसंधानधिषणाम् ॥ ५९ ॥

हे पर्वतराजपुत्रि, तुझ्या दोन्ही कानांच्या धनुष्याकार वांकड्या पाळी कामदेवाचें पुष्पबाणयुक्त धनुष्य आहे असें कुतूहल कोणाच्या मनांत उत्पन्न करीत नाहीं ? कारण तुझ्या डोळ्यांचे कुटिल भेदक कटाक्ष कानाच्याहि पलीकडे जाऊन जणूं कांहीं तो मदनानें धनुष्याला जोडलेला बाणच आहे कीं काय असा भ्रम निर्माण करीत आहे.

टीपा—भगवतीच्या कानांच्या पाळी आणि तिचे कटाक्ष अत्यंत सुंदर असल्यामुळें त्यांना अनुक्रमें कामदेवाच्या धनुष्याची व धनुष्यावर जोडलेल्या बाणाची उपमा दिलेली आहे.

स्फुरद्गण्डाभोगप्रतिफलिततातङ्कयुगलं
चतुश्चक्रं मन्ये तव मुखमिदं मन्मथरथम् ।
यमारुह्य द्रुह्यत्यवनिरथमर्केन्दुचरणं
महावीरो मारः प्रमथपतये सज्जितवते ॥ ६० ॥

हे भगवति, ज्याच्या दिव्य प्रभावयुक्त गंडस्थळामध्यें – गालांमध्यें कर्णभूषणांचें प्रतिबिंब पडलें आहे असें तुझें मुख चार चक्रें असलेला कामदेवाचा रथ आहे असें मला वाटतें. कारण त्या मुखरूपी रथांत बसून महापराक्रमी कामदेव आपल्याला जिंकणारा आणि सूर्यचन्द्ररूपी चक्रें असलेल्या पृथ्वीरूपी रथांत बसलेला प्रमथगणांचा अधिपति जो महादेव त्याच्यावर शरसंधान करण्यासाठीं तयार झाला आहे.

टीपा—भगवतीच्या मुखकमलाचें सौंदर्य अप्रतिम आहे हा या श्लोकाचा भावार्थ. भगवतीनें आपल्या कानांमध्यें घातलेलीं वर्तुळाकार कर्णभूषणें हीं दोन रथचक्रें आणि भगवतीच्या निर्मल अशा कपोलावर त्या कर्णभूषणांचें पडलेलें वर्तुळाकार प्रतिबिंब हीं दुसरीं दोन रथचक्रें अशी कल्पना करून भगवतीच्या मुखाला रथाची उपमा दिली आहे.

'यमारुह्य' या ऐवजीं 'यमाश्रित्य' हा पाठ अधिक उचित असें कवल्यांश्रमानें म्हटलें असून त्याचें कारण त्यानें असें दिलें आहे— 'अत्र यमाश्रित्येति युक्तः पाठः। मदनस्य जगदम्बिकामुखारोहणमापाततोऽनुचितमिति यदुचितं तत्सद्भिर्ग्राह्यम्।'

सरस्वत्याः सूक्तीरमृतलहरीकौशलहरीः
पिबन्त्याः शर्वाणि श्रवणचुलुकाभ्यामविरतम् ।
चमत्कारश्लाघाचलितशिरसः कुण्डलगणो
झणत्कारैस्तारैः प्रतिवचनमाचष्ट इव ते ॥ ६१ ॥

हे शिवपत्नि भगवति, तूं कर्णरूपी पात्रानें सरस्वतीनें केलेल्या अमृताहून अधिक मधुर अशा सूक्तींचें अविरत प्राशन–पान करीत आहेस आणि त्या वेळीं सरस्वतीच्या वाणीच्या चमत्काराची स्तुति करण्याकरितां मस्तक डोलावतेस, तेव्हां तुझीं कर्णभूषणें मोठा झणत्कार करतात जणुं काय, तूं सरस्वतीची स्तुति करीत आहेस त्या स्तुतीस तें अनुमोदनच देत आहेत.

टीपा—ह्या श्लोकावरील लक्ष्मीधरटीकेंत निराळाच अर्थ अभिप्रेत आहे. तो त्यानें केलेल्या पुढील पदयोजनेवरून स्पष्ट होईल.

'हे शर्वाणि, ते अमृतलहरीकौशलहरीः सूक्तीः श्रवणचुलुकाभ्याम विरलं पिबन्त्याः चमत्कारश्लाघाचलितशिरसः सरस्वत्याः कुण्डलगणः तारैः झणत्कारैः प्रतिवचनमाचष्ट इव ।'

याचा मथितार्थ असा कीं, हें भगवति, तुझीं वचनें अमृताहून अधिक मधुर आहेत. सरस्वती आपल्या कर्णसपुटांनीं त्यांचे पान करून मस्तक डोलावतें. म्हणून तिचीं कुंडलें आपल्या झणत्कारानें जणुं काय प्रत्युत्तरच देत आहेत.

असौ नासावंशस्तुहिनगिरिवंशध्वजपटि
त्वदीयो नेदीयः फलतु फलमस्माकमुचितम् ।
वहत्यन्तर्मुक्ताः शिशिरकरनिश्वासगलितं
समृद्ध्या यस्तासां बहिरपि च मुक्तामणिधरः ॥ ६२ ॥

हे भगवति, तूं हिमालय पर्वताच्या वंशाची पताका आहेस. तुझा नासिकारूपी दंड आम्हांला अत्यंत इष्ट असे फल देवो. तुझा नासिकारूपी दंड अत्यंत शीत अर्थात् थड अशा निःश्वासानें संपन्न मोत्यांना धारण करतो आणि त्या मोत्यांची इतकी समृद्धि आहे कीं, तो नासिकादंड बाहेरच्या बाजूसहि मोतीं धारण करतो.

टीपा—इष्ट फल म्हणजे धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ति. भगवतीच्या भक्तांना हें फळ विनायासें हस्तगत होतें. श्रीपूजार्चामधील पुढील श्लोकात ह्याचेंच वर्णन केलेले दिसेल.

'यत्रास्ति मोक्षो न हि तत्र भोगो
यत्रास्ति भोगो न हि तत्र मोक्षः ।
श्रीसुन्दरीसेवनतत्पराणां
भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ॥'

कांहीं टीकाकारांच्या मतें 'शिशिरकरनिश्वासगलितं' इत्यादि वचनानें कुण्डलिनीमार्गातील चन्द्रनाडीचा उल्लेख आहे. उजव्या नाकपुडींतून सूर्यनाडी व डाव्या नाकपुडींतून चन्द्रनाडी वाहते. चंद्रनाडींतून शीत व सूर्यनाडींतून उष्ण श्वास त्यांच्या प्रकृतिगुणधर्मानुरूप अनुक्रमें डाव्या व उजव्या नाकपुडींतून वाहतो.

कविसंकेताप्रमाणें बांबूच्या ( वशाच्या ) आंतच मोती असतात पण देवी भगवतीचा नासावंश असा आहे कीं, त्याच्या आंत व बाहेर दोन्ही बाजूंस मोती आहेत. चंद्रनाडी डाव्या बाजूस असल्यामुळें स्त्रियांच्या नाकाच्या डाव्या बाजूस टोंचूनच मोत्यांची नथ घालतात.

प्रकृत्यारक्तायास्तव सुदति दन्तच्छदरुचेः
प्रवक्ष्ये सादृश्यं जनयतु फलं विद्रुमलता ।
न बिम्बं तद्बिम्बप्रतिफलनरागादरुणितं
तुलामध्यारोढुं कथमिव विलज्जेत कलया ॥ ६३ ॥

*हे शोभायुक्त दांत असलेल्या भगवति, तुझ्या दांतांना झांकून टाकणाऱ्या* स्वाभाविक लालसर रंगाच्या ओठांचें सादृश्य मी सांगेन. पण केव्हां? पोवळ्यांच्या वेली जेव्हां पोंवळीरूपी फल निर्माण करतील तरच तुझ्या अधरोष्ठांशीं त्या पोंवळ्यांचें सादृश्य होईल. बिंबफलाशीहि तुझ्या ओठांचें सादृश्य होत नाहीं. कारण तुझ्या ओठांच्या लालसर—अरुणवर्णाचें तें फक्त *प्रतिबिंब आहे. त्याची तुझ्या ओठांशीं जर तुलना केली तर त्याचा एक* अंशहि त्यांत येणार नाहीं म्हणून तें बींबफल लाजणार नाही काय ?

टीपा— ह्या श्लोकाचें तात्पर्य हें कीं, भगवतीच्या ओठांशीं ज्याची तुलना करतां येईल अशी अखिल विश्वांत एकहि वस्तु नाहीं. भगवतीच्या *शरीराच्या अरुणवर्णानें जगांतील सर्व पदार्थांना अरुणिमा प्राप्त झाल्यामुळें लालसर वर्णाच्या जावतींत कोणत्याहि वस्तूंची तिच्या अधरोष्ठांशीं तुलना करतां* येणार नाहीं आणि म्हणूनच आचार्य म्हणतात कीं, प्रवालाच्या वेलीला जर फळ लागेल तर कदाचित् त्या फलाचीं भगवतीच्या ओष्ठद्वयांशीं तुलना करतां येईल. परंतु प्रवालाच्या वेलीला फळें आल्याचें कोणाच्या ऐकण्यांत *किंवा पाहण्यांत आलेलें नाहीं. बिंबफलाचीहि भगवतीच्या ओठांशीं तुलना* करतां येणार नाहीं हें आपण वर पाहिलेंच आहे.

स्मितज्योत्स्नाजालं तव वदनचन्द्रस्य पिबतां
चकोराणामासीदतिरसतया चञ्चुजडिमा ।
अतस्ते शीतांशोरमृतलहरीमाम्लरुचयः
पिबन्ति स्वच्छन्दं निशि निशि भृशं काञ्जिकधिया ॥६४॥

हे भगवति, तुझ्या मुखरूपी चंद्राच्या स्मितरूपी चंद्रिकेचें मुबलक पान करण्यामुळें चकोरांची चोंच अतिशय जड झाली आहे. म्हणून ते चकोर आंबट खाण्याच्या इच्छेनें रोज रात्रीं थंड अशा चंद्रकिरणांचें कांजी समजून यथेच्छ प्राशन करतात.

सेवनानें जिभेस जडता आली तर ती रसास्वादनाला प्रतिबंधक होते त्याच्या निराकरणासाठीं आयुर्वेदानें आम्लरससेवनाचा उपचार सांगितला आहे श्रीभगवतींची स्मितज्योत्स्ना अत्यंत मधुर आहे आणि तिच्या तुलनेने चंद्रज्योत्स्ना आंबट आहे म्हणून भगवतीच्या स्मितज्योत्स्नेच पान करून चकोरांची जीभ जड झाल्यामुळें जाड्यतानिवारणासाठीं चकोर जलयुक्त चंद्रज्योत्स्ना प्राशन करतात हें सयुक्तिकच आहे ' चकोरा एव चतुराश्चन्द्रिकापानकर्मणि । ' असा एक कविसंकेत आहे

श्लोकाचं तात्पर्य असं कीं, आकाशातील चंद्रापेक्षाहि भगवतीच्या मुखचंद्राचें माधुर्य अधिक आहे

अविश्रान्तं पत्युर्गुणगणकथाम्रेडनजपा
जपापुष्पच्छाया तव जननि जिह्वा जयति सा ।
यदग्रासीनायाः स्फटिकदृषदच्छच्छविमयी
सरस्वत्या मूर्तिः परिणमति माणिक्यवपुषा ॥ ६५ ॥

हे माते, आपल्या पतीच्या म्हणजे शिवाच्या गुणसमुच्चयाच्या कथाचें वारंवार सतत वर्णन हाच जप, तुझा जप असून तो करणाऱ्या तुझ्या जिह्वेची कान्ति जास्वंदीच्या फुलाप्रमाणें आरक्तवर्ण आहे तुझ्या जिह्वेच्या अग्रभागीं बसलेल्या श्रीसरस्वतीची स्फटिकाच्या मण्याप्रमाणें स्वच्छ व शुभ्र कांतीनें युक्त असलेली मूर्ति माणिक्यरत्नाच्या वर्णानें म्हणजे रक्तवर्णानें परिणत झालेली दिसून येते

टीपा—भगवतीच्या जिह्वेच्या रक्तवर्णामुळें सरस्वतीची स्फटिकासारखी असलेली मूर्ति माणकाच्या मूर्तीप्रमाणें लालसर दिसते इतका अवर्णनीय रक्तिमा भगवतीच्या जिह्वेचा आहे हें प्रस्तुत श्लोकाचें तात्पर्य

रणे जित्वा दैत्यानपहृतशिरस्त्रैः कवचिभि–
र्निवृत्तैश्चण्डांशत्रिपुरहरनिर्माल्यविमुखैः ।
विशाखेन्द्रोपेन्द्रैः शशिविशदकर्पूरशकला
विलीयन्ते मातस्तव वदनताम्बूलकवलाः ॥ ६६ ॥

हे माते, युद्धामध्यें दैत्यांना जिंकून त्यांची शिरस्त्राणें ज्यांनीं काढून घेतलीं आहेत आणि ज्यांनीं कवचें धारण केलीं आहेत असे स्कंद, इंद्र व विष्णु, त्रिपुराचा नाश करणाऱ्या शंकराच्या निर्माल्याचा भाग चंडाचा असल्यामुळें, त्यांना तो न मिळाल्यामुळें तुझ्या मुखकमलांतील चंद्राप्रमाणें स्वच्छ दिसणाऱ्या कर्पूरखंडांनीं युक्त असलेले विड्याचे अंश वाटून घेतात.

टीप—शिवाच्या देवालयांत शिवाची मूर्ति पूर्वाभिमुख असून, समोर नंदी व त्याच्या उजव्या बाजूस म्हणजे देवालयाच्या ईशान्येस चंडाचें स्थान असतें. त्या चंडास शिवाचें निर्माल्य देतात. तो इतरांनीं स्वीकारू नये या अर्थाचें स्मृतिवचन पुढीलप्रमाणें आहे—

'हरनिर्माल्यं परित्याज्यम् ।'

त्रिपुरासुरावर विजय मिळवून इन्द्रादि देव शिवशक्तिरूप अशा अर्धनारीनटेश्वराच्या दर्शनास प्रसादाच्या अपेक्षेनें आले. पण शिवनिर्माल्यरूपी प्रसादाचा अधिकारी चंड नांवाचा गण असल्यामुळें ते देव विमुख होऊन भगवतीच्या मुखांतील विड्याचा अंश हा प्रसाद म्हणून ग्रहण करते झाले.

कैवल्याश्रमटीकेंत 'महादेवशिरःस्थितचन्द्रकौमुदीं शिवनिर्माल्यमिति त्यक्त्वा ताम्बूलशलाका एव विलिप्यन्ते' हा उल्लेख आहे. शिवाच्या मस्तकावरील चंद्रकोर म्हणजेच निर्माल्य असा आशय वरील वाक्यात आहे. पण तो योग्य नाहीं.

विपञ्च्या गायन्ती विविधमपदानं पशुपते–
स्त्वयारब्धे वक्तुं चलितशिरसा साधुवचने ।
तदीयैर्माधुर्यैरपलपिततन्त्रीकलरवां
निजां वीणां वाणी निचुलयति चोलेन निभृतम् ॥ ६७ ॥

टीपा—प्रत्यक्ष सरस्वतीदेवी आपल्या तंबोऱ्यावर शिवाच्या चरित्राचें गान करते त्या वेळीं 'साधु, सम्यग्गीतं भवत्या' असें धन्योद्गार भगवती काढते. त्या तिच्या शब्दांचें माधुर्य सरस्वतीच्या गीतापेक्षां आणि तंबोऱ्याच्या स्वरापेक्षांहि अधिक आहे हे प्रस्तुतच्या श्लोकाचें तात्पर्य.

कराग्रेण स्पृष्टं तुहिनगिरिणा वत्सलतया
गिरीशेनोदस्तं मुहुरधरपानाकुलतया ।
करग्राह्यं शंभोर्मुखमुकुरवृन्तं गिरिसुते
कथंकारं ब्रूमस्तव चिबुकमौपम्यरहितम् ॥ ६८ ॥

हे गिरिकन्ये, तुझा पिता जो हिमालयपर्वत त्यानें अपत्यप्रेमानें तुझी हनुवटी आपल्या हातानें कुरवाळली आहे. अधरामृतप्राशनासाठीं उत्सुक झालेल्या शिवानें ती उचलून वर घेतलेली आहे. मुखकमलरूपी आरशास आधारभूत असलेली अशी ती तुझी हनुवटी मी काय वर्णावी? तिला उपमा द्यावी असें या जगतांत दुसरें कांहींच नाहीं.

टीपा— भगवतीच्या हनुवटीचें ह्या श्लोकांत वर्णन आहे. ती औपम्य-रहित आहे. तिची हनुवटी ती लहान असतां हिमालयपर्वतानें पुत्रवात्सल्यानें कुरवाळली आहे आणि शिवानें अधरपानासाठीं ती वर उचलली आहे विश्वात प्रतिबिंबित झालेलें स्वतःचें रूप पाहण्यासाठींच जणुं भगवतीचा मुखरूपी आरसा शिवानें हनुवटीरूपी दट धरून हातात घेतला, अशी आचार्य कल्पना करतात.

भुजाश्लेषान्नित्यं पुरदमयितुः कण्टकवती
तव ग्रीवा धत्ते मुखकमलनालश्रियमियम् ।
स्वतः श्वेता कालागुरुबहुलजम्बालमलिना
मृणालीलालित्यं वहति यदधो हारलतिका ॥ ६९ ॥

हे भगवति, भगवान् शंकराच्या नित्य भुजालिंगनानें कण्टकित म्हणजे रोमांचित झालेली तुझी मान मुखरूपी कमलाच्या देठाची शोभा धारण करते. कारण मुखाच्या खालीं गळ्यात घातलेला मोत्याचा हार स्वभावतः पांढरा शुभ्र असूनहि नीलवर्णाच्या अगुरुकाष्ठाच्या दाट उटणेंरूपी चिखलानें मलिन झाल्यामुळें कमलिनीचें लालित्य म्हणजे सौंदर्य धारण करीत आहे.

टीपा –कमळाला खालीं देठ असतो. त्या देठाला काटे असून तो चिसलानें बरबटलेला असतो. भगवतीचें मुख म्हणजेच कमल. त्या मुख-कमलाला कंठरूपी देठ आहे. तो कंठरूपी कमलदेठ शिवबाहूंच्या मिठीमुळें रोमांचरूपी कंटकांनीं युक्त झाला आहे आणि अगुरुकाष्ठाचा उटणेंरूपी चिखलच त्याला लागलेला आहे. अशा प्रकारें भगवतीच्या मानेचें कमल-नालाशीं सादृश्य दाखविलें आहे. भगवान् शिव अर्धनारीनटेश्वररूप असल्यामुळें भगवतीचे आलिंगन त्याचें नित्याचें आहे. शरीर रोमांचित होणें हें सात्त्विक-तेचें लक्षण समजतात. भरताच्या नाट्यशास्त्रामधील खालील श्लोकांत हें लक्षण सांगितलें आहे.

'स्तम्भः स्वेदोऽथ रोमाञ्चः स्वरभङ्गोऽथ वेपथुः ।
वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥'

**गले रेखास्तिस्रो गतिगमकगीतैकनिपुणे**
**विवाहव्यानद्धत्रिगुणगुणसंख्याप्रतिभुवः ।**
**विराजन्ते नानाविधमधुररागाकरभुवां**
**त्रयाणां ग्रामाणां स्थितिनियमसीमान इव ते ॥ ७० ॥**

हे भगवति, गति, गमक व गीत या संगीतांतील प्रकारांत तूं अत्यंत निपुण आहेस. तुझ्या मानेवर विराजित झालेल्या तीन रेखा या जणुं कांहीं तुझ्या विवाहाच्या वेळीं बांधलेल्या मंगलसूत्राच्या तीन सूत्रांच्या त्या प्रतिनिधीच आहेत. नाना प्रकारच्या मधुर रागांचें मूलकारण असलेल्या तीन ग्रामांची स्थिति नियमित करण्यासाठीं निर्माण केलेल्या सीमारेखेप्रमाणें त्या रेखा शोभतात.

टीपा—'गतिगमकगीतैकनिपुणे' या विशेषणांत संगीतशास्त्राचे पारिभाषिक शब्द आले आहेत. अरुणामोदिनीटीकेंत या तिन्ही शब्दांच्या व्याख्या दिलेल्या आहेत. त्या खालीलप्रमाणें—

'गतिस्तु रागसंदर्भमालापः परिकीर्तितः ।
गमको मुख्यनादस्य परिपोषो रसात्मकः ।
गीतं प्रबन्धसन्दार्थ रञ्जकः शक्तिरुच्यते ॥'

गति म्हणजे लय. संगीतामध्यें स्वराला जितकें महत्त्व आहे तितकेंच गतीला म्हणजे लयीला महत्त्व आहे. सारख्या गतीनें ठोके दिल्यास दोन ठोक्यांत जें अंतर राहातें त्याला लय म्हणतात. या लयींत तीन प्रमुख प्रकार आहेत (पाहा-'त्रयो लयास्तु विज्ञेयाः' ) (१) विलंबित म्हणजे सावकाश गति, (२) मध्य म्हणजे मध्यगति, आणि (३) द्रुत म्हणजे जलदगति. या तिन्ही लयींत जी सारख्याच प्रभुत्वानें गायन करते अशी भगवती.

गायनामध्यें आलाप, बोलतान व तान असे प्रकार आहेत. गमक हा तानेचा एक प्रकार आहे. एक स्वर लांबवून तोच स्वर पुनः तानेंत घेऊन आरोह किंवा अवरोह केल्यास त्याला गमक म्हणतात. गमकाच्या उपयोगानें रागांत गांभीर्य प्रस्थापित होतें. गमक घेण्यास स्थिर व मोकळ्या आवाजाची आवश्यकता असते. उदाहरणार्थ– नी ऽ नी प ग मे ही गमक घेण्यात जी प्रवीण आहे अशी जगदंबा.

आकर्षक स्वरमालिकेंत गुंफलेल्या अर्थपूर्ण शब्दरचनेला गीत म्हणतात. यांत सर्व प्रकारचें काव्य येतें व त्यांत सर्व रसांचा समावेश होतो. गीतामुळें भावना स्पष्ट होण्यास मदत होते. गीत विविध तालांत असतें. गीत म्हणजे गेयकाव्य व गीत म्हणजे गायन. सुंदर काव्य सुंदर रीतीनें गाते अशी जगदंबा. म्हणजेच जी उत्कृष्ट काव्य – गीत गायनांतील गमक वगैरे अलंकार घेऊन सर्व लयींत म्हणजे गतीनें प्रभुत्वानें गाते अशी भगवती त्रिपुरसुंदरी.

भगवतीच्या मानेवरील तीन रेसा ह्या विवाहाचे वेळीं बांधलेल्या मंगलसूत्राच्या प्रतिनिधि आहेत असें म्हटलें आहे विवाहसमयीं वधूच्या वामहस्तांत एक सूत्र व कंठांत तीन पदरी मंगलसूत्र बांधण्याची पद्धत आहे. क्वचित् दोन पदरी मंगलसूत्र व एक पदरी एकसर घालतात. ह्यास गृह्य-सूत्रांतील पुढील श्लोक प्रमाण आहे—

टीपा —कमलाला खालीं देठ असतो त्या देठाला काटे असून तो चिखलानें बरबटलेला असतो भगवतीचें मुख म्हणजेच कमल त्या मुख कमलाला कंठरूपी देठ आहे तो कंठरूपी कमलदेठ शिवबाहूच्या मिठीमुळें रोमांचरूपी कंटकांनीं युक्त झाला आहे आणि अगुरुकाष्ठाचा उटणेंरूपी चिखलच त्याला लागलेला आहे अशा प्रकारें भगवतीच्या मानेचें कमल नालाशीं सादृश्य दाखविलें आहे भगवान् शिव अर्धनारीनटेश्वररूप असल्यामुळें भगवतीचें आलिंगन त्याचें नित्याचेंच आहे शरीर रोमांचित होणें हें सात्त्विक तेचें लक्षण समजतात भरताच्या नाट्यशास्त्रामधील खालील श्लोकांत हें लक्षण सांगितलें आहे

'स्तम्भः स्वेदोऽथ रोमाञ्चः स्वरभङ्गोऽथ वेपथुः ।
वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥'

गले रेखास्तिस्रो गतिगमकगीतैकनिपुणे
विवाहव्यानद्धत्रिगुणगुणसंख्याप्रतिभुवः ।
विराजन्ते नानाविधमधुररागाकरभुवां
त्रयाणां ग्रामाणां स्थितिनियमसीमान इव ते ॥ ७० ॥

हे भगवति, गति, गमक व गीत या संगीतांतील प्रकारांत तूं अत्यंत निपुण आहेस तुझ्या मानेवर विराजित झालेल्या तीन रेषा या जणू काहां तुझ्या विवाहाच्या वेळीं बांधलेल्या मंगलसूत्राच्या तीन सूत्रांच्या त्या प्रतिनिधीच आहेत नाना प्रकारच्या मधुर रागांचें मूलकारण असलेल्या तीन ग्रामांची स्थिति नियमित करण्यासाठीं निर्माण केलेल्या सीमारेषेप्रमाणें त्या रेषा शोभतात

टीपा—'गतिगमकगीतैकनिपुण' या विशेषणांत संगीतशास्त्राचे पारिभाषिक शब्द आले आहेत अरुणामादिनीटीकेंत या तिन्ही शब्दांच्या व्याख्या दिलेल्या आहेत त्या खालीलप्रमाणें—

'गतिस्तु रागसंदर्भमालापः परिकीर्तितः ।
गमको मुरयनादस्य परिभाषा रसात्मकः ।
गीतं प्रबन्धरूढार्थं रञ्जकं शक्तिरुच्यते ॥'

भगवतीच्या गळ्यावरील तीन रेषा वर्णन करण्याच्या संदर्भात तिची संगीत-रसिकता प्रस्तुत श्लोकांत वर्णन केली आहे.

मृणालीमृद्वीनां तव भुजलतानां चतसृणां
चतुर्भिः सौन्दर्यं सरसिजभवः स्तौति वदनैः ।
नखेभ्यः संत्रस्यन् प्रथममथनादन्धकरिपो-
श्चतुर्णां शीर्षाणां सममभयहस्तार्पणधिया ॥ ७१ ॥

अंधकासुराला मारणाऱ्या भगवान् शंकराच्या नखांनीं आपल्या एका मुखाला कापून टाकलें म्हणून भयभीत झालेला ब्रह्मदेव आपल्या राहिलेल्या चार मुखांचें रक्षणासाठी हे देवि, तुझ्या चार हातांनीं अभयप्राप्ति होईल या बुद्धीनें आपल्या चार मुखांनीं कमलिनीसारख्या अत्यंत कोमल अशा तुझ्या बाहुलतांचें स्तवन करीत आहे.

टीपा — ह्या व पुढील श्लोकांत देवी भगवतीच्या हातांचें वर्णन आहे. ब्रह्मदेव प्रथम पंचमुख होता. त्याचा ज्येष्ठ भ्राता विष्णु एकमुख होता, पण तो षड्गुणसंपन्न होता. विष्णूचे षड्गुण म्हणजे सर्वज्ञत्व, नित्यतृप्तत्व, अनादिबोधत्व, स्वतंत्रत्व, अलुप्तशक्तित्व व अमनाशक्तित्व हे होत. रुद्रहि पंचमुख होता. तो ब्रह्मा व विष्णु यांच्यापेक्षां सहस्रगुणांनीं श्रेष्ठ होता. रुद्र व आपण पंचमुख आहोंत, असा एकदां ब्रह्मदेवास अहंकार वाटला व त्या अहंकारामुळें ब्रह्मदेवानें एकदां शंकराला अवमानिलें. म्हणून त्यानें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक आपल्या नखांनीं कापून त्याचें गर्वहरण केलें व तेव्हांपासून ब्रह्मदेव चतुर्मुख झाला ही कथा पुराणांतरीं प्रसिद्ध आहे. या कथेतील पुढील वचन लक्ष्मीधरानें उद्धृत केलें आहे—

'ब्रह्मणः पञ्चमशिरो नखाग्रेणाच्छिनद्धरः।'

भगवतीचे हात कमलिनीप्रमाणें अत्यंत कोमल व सुंदर असून शरणागताला अभय देण्यास सदैव तत्पर असतात हा प्रस्तुतच्या श्लोकाचा आशय.

नखानामुद्द्योतैर्नवनलिनरागं विहसतां
कराणां ते कान्तिं कथय कथयामः कथमुमे ।
कयाचिद्वा साम्यं भजतु कलया हन्त कमलं
यदि क्रीडल्लक्ष्मीचरणतललाक्षारसचणम् ॥ ७२ ॥

तीन पदरीं मंगलसूत्र बांधण्याचें कारण दर्शविणारा वसिष्ठाचार्यांचा एक श्लोक डिंडिमटीकाकारानें उद्धृत केलेला पुढीलप्रमाणें आहे–

' ब्रह्मविष्ण्वीशरूपं पुरन्ध्रिवृत्तं त्रितं कृतम् ।
त्रिरत्नं रुक्मजं स्त्रीणां माङ्गल्याभरणं विदुः ॥ '

या मांगल्याभरणाचीं ब्रह्मा, विष्णु व रुद्र ह्या देवतामय तीन सूत्रें आहेत.

गळ्यावरील मंगलसूत्राची तीन पदरांची जी उपमा दिली आहे त्यांत आणखी एक अर्थ अभिप्रेत आहे तो असा–

*सभर्तृका पतिव्रता स्त्रिया मंगलसूत्राशिवाय एक क्षणभरहि असत नाहींत.* जणूं काय, पतीच्या प्राणाला आपल्या मंगलसूत्रांत त्या धारण करून ठेवतात. *अशा मंगलसूत्राप्रमाणें देवीच्या गळ्यावरील तीन रेखा कधींहि दूर होत नाहींत. याप्रकारें भगवतीची भगवान् शिवाविषयीची अनन्य भक्तिपर अलोट प्रीतीच या श्लोकांत व्यक्त केली आहे.* दुसरी एक कल्पना ह्या श्लोकांत व्यक्त होते, ती अशी– संगीतनिर्मिति कंठांतून होते व रेखाहि कंठावर आहेत. म्हणून प्रस्तुत श्लोकांत सांगितलेल्या त्या तीन रेखा जणूं कंठोद्भव तीन रागांचें नियमन करतात.

संगीतांत नानाविध मधुर राग आहेत त्यांच्या उत्पत्तीचें मूलस्थान असें तीन ग्राम संगीतज्ञ मानतात. ते ग्राम म्हणजे षड्जग्राम, गांधारग्राम व मध्यमग्राम. गांधारग्राम सध्यां प्रचलित नाहीं कोणताहि स्वर 'सा' कल्पून त्या स्वरांत गाणें म्हणणें त्याला षड्जग्राम गाणें म्हणतात आणि त्या मूळ 'सा' स्वराच्या मध्यमाला म्हणजे 'म' स्वराला 'सा' मानून गाणें म्हणणें त्याला मध्यमग्राम गाणें म्हणतात. त्याचप्रमाणें मूळ 'सा' स्वराच्या गांधारला म्हणजे 'ग' स्वराला 'सा' कल्पून गायन करणें त्याला गांधारग्राम गाणें म्हणतात. याच तीन ग्रामांच्या तीन रेषा भगवतीच्या गळ्यावर शोभन दिसतात. जणूं

हिमालयाच्या कीर्तीची ध्वजा उंचावून फडकविणाऱ्या हे भगवति, हें तुझें स्तनद्वय अमृतरसानें भरलेले माणिक्यरत्नाचें जणूं कलश आहेत याबद्दल आमच्या मनांत तिळमात्र शंका नाहीं. कारण तुझें स्तनपान केल्यामुळें गणपति व कार्तिकस्वामी आतांपर्यंत कुमारच राहिल्यानें स्त्रीसंगाच्या आनंदाचा अनुभव त्यांनी मुळींच घेतला नाहीं.

टीपा—या श्लोकांतील कांहीं कल्पनांची सुसंगति अद्याप कोणत्याहि टीकाकारानें लावलेली नाहीं. गणपति व कार्तिकेय यांना 'अविदितवधू-संगरसिक' व 'कुमार' हीं दोन विशेषणें दिली आहेत. पण पौराणिक वाङ्मयांत गणपतीला ऋद्धि व सिद्धि ह्या दोन पत्नी, तसेंच अष्टनायिका व शारदा—सरस्वती इत्यादि नांवांच्या पत्नी असल्याचें सांगितलें आहे. डिंडिमटीकेंत गणपतीच्या अंकावर बसलेली महालक्ष्मी सिद्धि असल्याचें ऐकिवांत असल्याचें लिहिलें आहे. कार्तिकेयालाहि देवसेना नांवाची पत्नी होती अशी आख्यायिका आहे. प्रस्तुत श्लोकांतील वर्णन मात्र ह्या आख्यान व पुराणांतरीच्या कथेशीं जमत नाहीं आणि कोणत्याहि टीकाकारानें यासंबंधीं स्पष्टीकरण केले नाहीं. सदर संदर्भाचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें देतां येईल—

गजानन हा ऋद्धि व सिद्धि यांचा दाता आहे आणि त्याच्या उपासनेमुळें सर्व जन वश होतात. म्हणजे जनगणाचा अधिपति गणपति असल्यामुळें त्याचे भक्तहि गणपतिरूपच म्हणजे गणस्वामीच होतात. 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' या मंत्रांतील अभिप्रायहि हाच आहे. ह्या भक्तजनांना गणपति हा ऋद्धिदाता व सिद्धिदाता असल्यामुळें गणेशोपासकांनीं त्यांना स्त्रिया कल्पून आणि गणपतीच्या पत्नी संबोधून रूपक केलें आहे. तसेंच कार्तिक-स्वामीचा जन्म दैत्याधिपति व देवांना अजिंक्य असणाऱ्या तारकासुराच्या वधासाठीं झाला असें पुराणें सांगतात. याच विषयावर कालिदासानें कुमार-संभव हें महाकाव्य लिहिलें आहे. कुमार कार्तिकेयानें देवसेनेचें साहाय्य घेऊन तारकासुराशीं निकरानें लढून त्यास ठार केलें. तेव्हां देवांनी आनंद प्रदर्शित करून त्या देवतेस देवसेनारूप शक्तिदेवता कल्पून कुमाराची पत्नी म्हणून संबोधून कवीनें रूपक साधलें आहे. म्हणून कार्तिकेयास—कार्तिक-स्वामीस कुमार म्हणून संबोधितात हें सयुक्तिकच आहे. कार्तिकस्वामी व गणपति यांना पत्नी होत्या असें आचार्यांना मान्य नसावेसें वाटतें. त्याशिवाय त्यांनीं 'कुमारावद्यापि' असें म्हटलें नसतें आणि 'अविदितवधूसंगरसिकौ' असेंहि म्हटलें नसतें.

हे भगवति उमे, नवीनच उमललेल्या कमलाच्या प्रभेला–टवटवीलाहि आपल्या नखांच्या कांतीनें मागें टाकणाऱ्या तुझ्या हातांच्या शोभेचें वर्णन आम्ही कसें करूं तें तूं सांग. क्रीडा करणाऱ्या लक्ष्मीच्या पायाच्या लाक्षारसानें तें कमल युक्त झालें तर कदाचित् तुझ्या हातांच्या कांतीशीं अंशतः तरी निदान साम्य पावेल.

टीपा— प्रस्तुत श्लोकांत भगवतीच्या नखांपासून उत्स्फूर्त होणाऱ्या *किरणांनीं आरक्तवर्ण झालेल्या तिच्या कोमल हातांचें वर्णन आहे.*

समं देवि स्कन्दद्विपवदनपीतं स्तनयुगं
तवेदं नः खेदं हरतु सततं प्रस्नुतमुखम् ।
यदालोक्याशङ्काकुलितहृदयो हासजनकः
स्वकुम्भौ हेरम्बः परिमृशति हस्तेन झटिति ॥ ७२ ॥

हे देवि, ज्यांतील दूध स्कंद–कार्तिकस्वामी व गजानन एकाच वेळीं प्राशन करतात व त्यामुळें ज्यांतून सतत दुग्धस्राव होत आहे असें तुझें स्तनद्वय आमचें सर्व तिमिर दूर करोत. त्या स्तनद्वयाला पाहून मनांत कांहीं शंका उत्पन्न झाल्यामुळें आपल्या कुम्भांना एकदम हात लावून गजानन हास्यजनक विनोद करतात.

आपल्या पतीच्या प्रतापाची व कीर्तीची प्रतीकमय प्रतिकृतीच ही माळ होय ती धारण करण्यात मोठा अभिमान व पतिव्रता धर्मच आहे

तव स्तन्यं मन्ये तुहिनगिरिकन्ये हृदयतः
पयःपारावारः परिवहति सारस्वत इव ।
दयावत्या दत्तं द्रविडशिशुरास्वाद्य तव य-
त्कवीनां प्रौढानामजनि कमनीयः कवयिता ॥ ७६ ॥

हे हिमगिरिसुते भगवति, मला वाटतें कीं, तुझ्या स्तनातील दूध हे तुझ्या हृदयातून सर्व बाजूनीं वाहणारा जणू ज्ञानसागरच आहे तें दूध तू दयेनें द्रविडकुमाराला दिलें होतेस त्याचें प्राशन करून तो उत्तम कवींच्या मध्येंहि अतिरमणीय काव्य करणारा झाला त्याच्यापेक्षांहि सरस झाला

टीपा—या श्लोकात निर्दिष्ट केलेला द्रविडकुमार कोण असावा ह्याबद्दल वेगवेगळीं विवाद मतें आहेत लक्ष्मीधर ह्या कुमाराविषयीं स्पष्ट उल्लेख करीत नाहीं तो म्हणतो–'द्रविडशिशु द्रविडजातिसमुद्भव बाल एतत्स्तोत्रकर्ता'. पण हा बाल कोण, त्याचे नाव काय, वगैरेचा तो उल्लेख करीत नाहीं सौंदर्यलहरींतील पहिल्या श्लोकावर टीका करण्यापूर्वी तो म्हणतो–'इह खलु शंकरभगवत्पूज्यपादा समयमततत्त्ववेदिन समयाख्या चन्द्रकला श्लोकशतेन प्रस्तुवन्ति।' या वचनात लक्ष्मीधरानें स्तोत्रकर्त्याचा आदरार्थी बहुवचनी उल्लेख केला आहे परंतु प्रस्तुत श्लोकावरील टीकेंत 'एतत्स्तोत्रकर्ता' असा एकवचनी उल्लेख नाव न देता केला आहे त्यामुळे प्रस्तुत द्रविडशिशु हा लक्ष्मीधराच्या मतें कोण असावा हें खात्रीपूर्वक कांहीं सांगता येत नाहीं

कैवल्याश्रमाच्या मतें ह्या स्तोत्राचे कर्ते आद्यशंकराचार्यच होते असें दिसते टीकेच्या प्रारंभीं तो म्हणतो–'भगवान् परमकारुणिक शंकरावतार शंकराचार्य शिवशक्त्योरभेद ज्ञापयितु सकलप्रपञ्चसाक्षिण्या ब्रह्माविनाभूत चिच्छक्तेः स्तुतिद्वारा मातृकादिभिन्नानुद्धरति'

कामेश्वरसूरि आपल्या टीकेच्या प्रारंभीं–'भगवन्त भगवत्पादाचार्या' इत्यादि असा उल्लेख करतो प्रस्तुत वाक्यात भगवत्पादाचार्य ह्या उल्लेखानें आद्यशंकराचार्यच अभिप्रेत आहेत असें नाहीं तसेंच प्रस्तुत श्लोकावरील टीकेंतहि 'द्रविडशिशु द्रविडजात्युद्भवो बालक, द्रविडपितुर्वा नाम। तस्य

मातेच्या स्तनपानाची अमृतमय अवीट गोडी कुमाराला व गणपतीला इतकी होती कीं, तें स्तनपान अद्यापि त्यांना सोडवत नव्हतें. म्हणून ते कुमार राहिले. त्या अमृतमय स्तनपानामुळें ते कौमार्यावस्थेंतच राहिले

वहत्यम्ब स्तम्बेरमदनुजकुम्भप्रकृतिभिः
समारब्धां मुक्तामणिभिरमलां हारलतिकाम् ।
कुचाभोगो बिम्बाधररुचिभिरन्तःशबलितां
प्रतापव्यामिश्रां पुरविजयिनः कीर्तिमिव ते ॥ ७५ ॥

हे माते, तुझा स्तनमण्डलभाग हा गजासुराच्या गंडस्थलांतून निघालेल्या मुक्तामण्याची हारलतिका धारण करतो त्या शुभ्र हारलतेमध्यें तुझ्या अधरोष्ठाची लालसर कांति प्रतिबिंबित झाल्यामुळें ती त्रिपुरासुरावर विजय मिळविणाऱ्या शंकराच्या रक्तवर्ण शौर्यानें मिश्र अशा श्वेतवर्ण कीर्तीप्रमाणें दिसत आहे

टीपा–हत्तीच्या गंडस्थलांत मोती असतात ह्याविषयीं लक्ष्मीधरानें सोमेश्वराची पुढील वचनें उद्धृत केलीं आहेत

'गजकुम्भेषु वंशेषु फणासु जलदेषु च ।
शुक्तिकायामिक्षुदण्डे षोढा मौक्तिकसंभवः ॥'
'गजकुम्भे कर्बुराभा वंशे रक्तसिताः मताः ।
फणासु वासुकेरेव नीलवर्णाः प्रकीर्तिताः ॥
ज्योतिर्वर्णास्तु जलदे शुक्तिकाया सिताः स्मृताः ।
इक्षुदण्डे पीतवर्णा मणयो मौक्तिकाः स्मृताः ॥'

हत्तीच्या गंडस्थलातील मोती कर्बुरवर्णाच असतात वेळूमधील मोती तांबडी व पांढरी असतात वासुकिनागाच्या फण्यावरील मोती निळ्या रंगाची असतात मेघातील म्हणजे ढगांतून पडणारी मोती ज्योतिर्मय असतात शिंपल्यातील मोती पांढऱ्या वर्णाची तर इक्षुदण्डातील मोती पिवळ्या रंगाची असतात. अशा प्रकारें सहा प्रकारच्या मोत्यांचा वर्ण सहा प्रकारचा आहे.

कविसंकेताप्रमाणे शौर्याचा वर्ण रक्त आणि कीर्तीचा वर्ण श्वेत आहे

त्रिपुरासुरास मारणाऱ्या शंकरानें गजासुराच्या कुम्भस्थलातील मोत्यांची माळ पार्वतीच्या–भगवतीच्या गळ्यांत घातली तेव्हा तिला वाटलें कीं,

नांव देत नाहीं. आमच्याजवळ असलेल्या कांहीं हस्तलिखित पोथ्यांतहि स्तोत्रकर्त्याच्या नांवाचा उल्लेख नाहीं. यावरून असेंहि अनुमान निघतें कीं, प्रस्तुत श्लोकांतील द्रविडशिशु हे आद्यशंकराचार्य नव्हेत. ह्यासंबंधींचें अधिक विवेचन प्रस्तावनेंत आलेलेंच आहे.

ह्या श्लोकांतील द्रविडशिशु हे शंकराचार्य असावेत अशाविषयीं एक दंतकथा आहे. तिचा आशय असा—शंकराचार्यांच्या बालपणची गोष्ट. त्यांचे वडील प्रत्यहीं देवीस नैवेद्य दाखवून देवीचा प्रसाद आपल्या पुत्रास देत. एकदां हें बालकच, त्याचे वडील ग्रामांतरीं गेल्यामुळें, देवीस नैवेद्य दाखविण्यासाठीं दुधाचा नैवेद्य घेऊन गेलें बालकाची अशी कल्पना होती कीं, देवीला दाखविलेल्या नैवेद्याचा स्वीकार देवी करीत असे व शिल्लक राहिलेलें दूध त्याचे वडील त्याला देत या कल्पनेनें बालकानें देवीला नैवेद्य अर्पण केला. पण देवीनें त्याचा स्वीकार न केल्यानें बालक रडूं लागलें तेव्हां देवीनें प्रकट होऊन त्या नैवेद्याचा स्वीकार केला. पण प्रसादशेष न राहिल्यानें बालक पुनः रडूं लागलें, म्हणून देवीनें त्यास स्तनपान करवून दूध दिलें. त्यामुळे सर्व विद्या त्याच्यामध्यें उत्स्फूर्त झाल्या. हा प्रकार त्याच्या वडिलांस कळल्यावर त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. भगवतीनेंहि बालकाच्या वडिलाच्या स्वप्नात येऊन त्याला सांगितलें कीं, हा बालक शंकराचा अंश असून तो लोकोद्धार करील. तेच शंकराचार्य हे द्रविडशिशु होत असा संभ्रम प्रस्तुत दंतकथेवरून होतो.

अशीच दुसरी एक दंतकथा प्रचलित आहे—एका मुनीच्या शापामुळें कार्तिकेयांनीं मनुष्ययोनींत एका दरिद्री ब्राह्मण स्त्रीच्या उदरीं जन्म घेतला. तें बालक सहा महिन्याचें असताना त्याचे वडील भिक्षेस गेले व आई पाणी आणण्यासाठीं नदीवर गेली असताना तें बालक भुकेनें व्याकुळ होऊन रडूं लागलें त्याच वेळीं यदृच्छेनें भगवती आपल्या पतीसह आकाशांतून विहार करीत होती. तिला बालकाचा आर्त स्वर ऐकूं आला. तिला त्याची दया येऊन तिनें त्याला आपलें स्तन्य दिलें तेव्हांपासूनच त्याचे ठायीं कवित्व स्फुरलें.

शिशुः कश्चिदर्भकः ।' असें विवरण आहे. ह्या वाक्यांतहि शंकराचार्यांचा नामोल्लेख नाहीं.

श्रीरामकवि आपल्या टीकारंभीं प्रस्तुत स्तोत्रकर्त्याचें नांव देत नाहीं. मंगलाचरणांत यावावर्तीत तो खालील श्लोक उद्धृत करतो–

' स्तोत्रमेतद्वदन्त्येके शिवेन परिभाषितम् ।
तस्यैवांशावतारेण शंकरेणेति केचन ॥
केचिद्वदन्त्यादिशनेर्ललिताया महौजसः ।
दशनेभ्यः समुद्भूतमिति नानाविधा श्रुतिः ॥'

म्हणजे सदर स्तोत्रकर्त्याविषयीं नाना कथा आहेत असें श्रीरामकवीनें म्हटलें आहे. तसेंच सदर स्तोत्राचे त्यानें दोन भाग केले आहेत. पहिल्या भागांत श्लोक १ ते ४० आहेत. त्यावरील टीकेच्या शेवटीं ' आनन्दलहरी-भाष्यालोचने प्रथममुन्मीलनम् ' असें म्हटलें आहे आणि पुढील दुसऱ्या भागांत *श्लोक ४१ ते १०२ असून या भागाचे शेवटीं 'आनन्दलहरीभाष्यालोचने* द्वितीयमुन्मीलनं संपूर्णम्' असें म्हटलें आहे म्हणजे या संपूर्ण स्तोत्रास आनन्द-लहरी' असें नांव देऊन त्याचे त्यानें दोन भाग कल्पिले आहेत. तरीहि शेवटच्या उपसंहाराचे श्लोकांत तो

' काञ्चीदेशसमुद्भवः कविवरः श्रीरामसड्डिण्डिमः .. ...चकार महतीं टीकां भवानीस्तुतेः । असे म्हणून, संपूर्ण स्तोत्रास ' आनन्दलहरी ' हे नांव देऊनहि शेवटच्या वाक्यांत म्हणतो– ' सौंदर्यलहरीभाष्यं समाप्तम् '. ह्यावरून ' सौंदर्यलहरी ' हेंहि नांव तो कवि संपूर्ण स्तोत्रास देत आहे. त्यामुळें त्यांत विसंगति दिसते दुसरें वचन मूळ रामकवीचें नसावें असें वाटतें कारण लेखनकालनिर्देश केला आहे तो असा —

' चैत्र शु. १० शुक्रवासरे संवत् २००१ विक्रमे '

यदा ( २२ सप्टेंबर १९६४ ) शके १८८६ भाद्रपद कृ. १० ला विक्रम संवत् २०२० आहे. यावरून रामकवीची टीका फक्त वीसच वर्षांपूर्वीं लिहिली गेली काय ? पण रामकवि हा फार वर्षांपूर्वीं होऊन गेला म्हणून हा कालाचा *उल्लेख मागाहून कोणीतरी (लेखकानें ?) लिहिला असावा असें दिसतें ह्यावरून* 'सौन्दर्यलहरी' हें नांव त्या कवीनें दिलेलें नसून द्विभागात्मक 'आनन्दलहरी' हेंच ह्या स्तोत्राचें नाव आहे हें स्पष्ट होतें. पण हा कवि मूळ ग्रंथकर्त्याचें

आणखी अशीच एक दंतकथा प्रचलित आहे ती अशी—सौंदर्यलहरीचा कर्ता शंकराचार्य नसून तामीळ देशांतील एक शिवोपासक ज्ञानसंबंधनामक आहे. तामीळ देशांत चार शिवोपासक प्रसिद्ध आहेत. ते १ अप्पा, २ सुंदर, ३ माणिक्यवाचक व ४ श्रीज्ञानसंबंध हे होत. ते परमेश्वराचे अवतार आहेत असें तामीळ मानतात. त्यांनीं शिवस्तुतीपर अनेक स्तोत्रें केलीं आहेत. हा श्रीज्ञानसंबंध शियालीनामक गांवांत राहात असे. त्याच्या पित्याचें नांव शिवपादहृदय व मातेचें नांव भगवती. ते दोघेहि अत्यंत सात्त्विक वृत्तीचे असून धार्मिक प्रवृत्तीचे होते. शिव हें त्यांचें आराध्य दैवत. अपत्य नसल्यानें त्यांनीं बरेच दिवस तपश्चर्या केली. त्यायोगें त्यांना पुत्ररत्न प्राप्त झालें. तो पुत्र तीन वर्षांचा असतांना एके दिवशीं शिवपादहृदय त्या बालकास घेऊन मंदिरा जवळ असलेल्या तलावाकडे स्नानास गेला. त्या बालकास घाटांवर बसवून तो स्नानसंध्या उरकण्यासाठीं तलावांत गेला. भुकेनें त्या मुलाचा जीव व्याकुळ होऊन तें आक्रोश करूं लागलें. तेव्हा मंदिरांतील शिवमूर्तीस त्याची करुणा येऊन त्यानें पार्वतीस मुलाला स्तनपान देण्याबद्दल सुचविलें. स्तनपान मिळाल्यानें तें बालक शान्त झालें. पिता स्नान करून तेथें येऊन पाहतो तों त्या बालकाच्या मुखांतून थोडें दूध स्रवत असलेलें त्यानें पाहिलें. पित्यानें चौकशी केली, "तुला दूध कोणी दिलें?" बालकानें उत्स्फूर्त होऊन दिव्य वाणीनें शिवाची श्लोकबद्ध स्तुति केली. हाच श्रीज्ञानसंबंध सौंदर्यलहरीचा कर्ता होय असें द्रविडांचें मत आहे. त्याचा कालहि इ. स. सातव्या–आठव्या शतकातील असल्यानें तो शंकराचार्यांचा समकालीन होता हे स्पष्ट दिसते.

अशा प्रकारें स्तोत्रकर्त्याविषयीं भिन्न भिन्न आख्यायिका आहेत. त्यांतील सत्यतेसंबंधी मात्र संशय आहे. तसेंच हें स्तोत्र आद्यशंकराचार्यांचेंच आहे किंवा कसें ह्याचीहि शंका आहे यांविषयींचें सविस्तर विवेचन प्रस्तावनेंत केलेंच आहे.

हरक्रोधज्वालावलिभिरवलीढेन वपुषा
गभीरे ते नाभीसरसि कृतसङ्गो मनसिजः ।
समुत्तस्थौ तस्मादचलतनये धूमलतिका
जनस्तां जानीते तव जननि रोमावलिरिति ॥ ७७ ॥

लिहिलेले त्यानीं वाचलें तेव्हा भगवतीनें शंकराचार्यांना 'ते मानवानें वाच नयेत' म्हणून पुसून टाकण्यास सांगितलें भगवतीच्या आदेशाप्रमाणें त्यानीं ते श्लोक पुसून टाकले तरी शंकराचार्यांनीं परत स्वगृहीं आल्यावर स्मरणानें ते सर्व श्लोक लिहून काढले व पुढ साठ श्लोक अधिक लिहून तें स्तोत्र त्यानीं पूर्ण केल हेंच त सौन्दर्यलहरी स्तोत्र होय

प्रस्तुत श्लोकातील द्रविडशिशु म्हणजे आद्यशंकराचार्य असें समजून वरील आख्यायिका प्रचलित झाल्या आहेत माग सांगितल्याप्रमाणें काहीं टीकाकार शंकराचार्यांच्या नावाचा उल्लेख करीत नाहींत, इतकेंच नव्हे तर दुसरे दोन टीकाकार या स्तोत्राचें कर्तृत्व दुसऱ्या दोघाना देतात

सुधाविद्योतिनी या नावाची टीका सौन्दर्यलहरींतील पहिल्या एकेचाळीस श्लोकावर फक्त उपलब्ध आहे तिचा कर्ता प्रवरसेनसुत अरिजित् नावाचा आहे त्याच्या मतें हें स्तोत्र त्याचे वडिलानीं रचिलें आहे त्याच्या वडिलाच नाव प्रवरसेन असून तो द्रविड देशातील एक क्षत्रिय राजपुत्र होता त्याच वृत्त अस आहे—

प्रवरसेनाचा जन्म झाल्याबरोबर द्रविडनामक त्याच्या पित्यास शुकनामक प्रधानानें सल्ला दिला कीं ह्या पुत्राचा जन्म त्याच्या कुलास अनिष्ट असून तो जर जिवत राहिला तर त्याच राज्य दुसरे हिरावून घेतील हें ऐकून राजानें आपल्या सेवकास शहराबाहेरील पर्वतावर त्या मुलाचा त्याग करण्यास आज्ञापिलें सेवकानीं राजाज्ञप्रमाणें त्या लहान बालकाचा त्याग केल्यावर वाघानें त्यास गुहेकडे उचलून नेल परतु त्याचें तेज इतक देदीप्यमान होतें कीं, तो जणू दिव्य रत्नाचा समूहच आहे अस वाटून वाघान त्यास गुहच्या तोंडाशीं टाकून दिल पूर्वजन्मीच्या योगसामर्थ्यानें सपादन केलेली दैवी शक्ति त्या बालकाच ठिकाणीं त्या वेळा प्रादुर्भूत झाली आणि त्यायोगें त्यान भगवतीची स्तुति करण्यास सुरुवात केली त्याच्या स्तुतीनें सतुष्ट होऊन भगवतीन त्याच पालण केल काहीं कालानतर काहीं शिकाऱ्यानीं त्याची सुटका केली व त्याला राज्यावर बसविल त्या प्रवरसेनानें बालक असताना पूर्वी एकेचाळीस श्लोकात्मक जी स्तुति केली, त आनन्दलहरी स्तोत्र होय त्यावरच त्याच्या अरिजित् नांवाच्या पुत्रानें सुधाविद्योतिनी नावाची टीका केली आहे प्रस्तुत श्लोकातील द्रविडशिशु म्हणजेच बालक प्रवरसेन असें काहींचें मत आहे

हे शिवे, तुझ्या कृश असलेल्या मध्यात–उदराचे ठिकाणी यमुनेच्या अतिसूक्ष्म तरंगासारखें जें काहीं तुझ्या भक्ताना दिसतें, तें जणू काही तुझ्या स्तनयुगामध्यें असलेलं आकाश स्तनयुगाच्या संघर्षामुळें अतीव सूक्ष्मरूप धारण करून नाभिकुहरामध्य प्रवेश करीत आहे

टीपा — प्रस्तुत श्लोकातील 'व्योम' शब्द अखिल विश्वाचा निदर्शक आहे व त विश्व भगवतीच्या शरीराचा एक अत्यत सूक्ष्म अंश आहे, हा या श्लोकाचा अभिप्राय आहे आकाश, रोमावलि व यमुना नदी ह्याचा श्यामवर्ण आह ह सादृश्य प्रस्तुत श्लोकात अनुस्यूत आहे याहि श्लोकात मागील श्लोकाप्रमाणें भगवतीच्या नाभीचें व तेथून निघालेल्या रोमावलीचें वर्णन आहे याविषयीं कामेश्वरसूरि म्हणतो—' अनोत्प्रेक्षया निदर्शनासह कृतया देवीकुचकलशयोरतिश्लिष्टत्व भाग्यलक्षण रोमावलेरतिसूक्ष्मत्व प्रकाश मानता च सूच्यते।'

स्थिरो गङ्गावर्तः स्तनमुकुलरोमावलिलता–
फलावालं कुण्डं कुसुमशरतेजोहुतभुजः।
रतेर्लीलागारं किमपि तव नाभिर्गिरिसुते
बिलद्वारं सिद्धेर्गिरिशनयनाना विजयते ॥ ७९ ॥

हे गिरिसुते भगवति, तुझ्या नाभीचा विजय असो त्या नाभीला पुढील उपमा देण्यासारख्या आहेत– ( १ ) गगानदीच्या प्रवाहातील स्थिर भोवरा, ( २ ) स्तनरूपी कळ्यानीं युक्त असलेल्या रोमावलीरूपी लतारेखाच आळें, ( ३ ) कामदेवाच्या–मदनाच्या तेजोरूपी अग्नीच कुड, ( ४ ) रतीचें क्रीडास्थान व ( ५ ) भगवान् शकराच्या नेत्रतपास सिद्धि देणारं गुहेच द्वार असें तुझें नाभिस्थान अवर्णनीय आहे

'स्तनमुकुलरोमावलिलताकलावाल' यातील कल्पनेच साधर्म्य ललिता सहस्रनामातील खालील नावात आढळतें–

'नाभ्यालवालरोमालिलताफलकुचद्वयी।'

ए पर्वतपुत्रि भगवति, जव्हा मदनाचें शरीर शंकराच्या क्रोधाग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त झालें तेव्हा त्या मदनानें तुझ्या गंभीर असलेल्या नाभीरूप सरोवरात मज्जन केलें त्या वेळीं त्या नाभीरूपी सरोवरातून एक धूमलेखा वर आली तिलाच तुझी रोमावली असें लोक समजतात

टीपा — शंकरानें आपल्या तृतीय नेत्रांतील तेजानें मदनाचा दाह केला त्या वेळच्या प्रसंगाचा प्रस्तुत श्लोकात उल्लेख आहे या श्लोकांतील ' जननि ' हा शब्द अत्यंत सूचक आहे मुलास वडिलानीं मारल्यावर तो आई जवळ जाणें हे स्वाभाविकच आहे त्या वेळीं आई त्यास मांडीवर घेऊन त्याचें सांत्वन करते तसेंच शंकरानें दहन केलेला मदन मातृसदृश भगवतीपाशीं गेला तेव्हा भगवतीनें त्यास पुनरुज्जीवन दिलें

श्रीरामकवीच्या मतें ' शंकरानें मदनाचा दाह अनेक वेळा केला आणि प्रत्येक वेळीं त्यास पुनर्जन्म मिळाला, असें आहे ही कथा कोणत्या पुराणात आहे हें मात्र कळत नाहीं पण टीकाकारानें पुढील श्लोक देवीस्तोत्रांतील म्हणून उद्धृत केला आहे

' दग्धं यदा मदनमेकमनेकधा ते
मुग्धः कटाक्षविधिरङ्कुरयाचकार ।
धत्ते तदाप्रभृति देवललाटनेत्रं
सत्येन्द्रियैव मुकुलीकृतमिन्दुमौलिः ॥ '

श्रीरामकवीनें मदनाचा काञ्चिकापुरातील कामाक्षीदेवीशीं असलेला संबंध पुढील श्लोकात उद्धृत केला आहे

' कामोत्थितो यतो जातस्तस्या कामेशयोषित ।
कामाक्षीति ततः ख्यातिं सा गता काञ्चिकापुरे ॥ '

प्रस्तुत श्लोकात भगवतीच्या निम्ननाभीचें प्रेक्षणीयत्व व रोमावलीचें अति रमणीयत्व वर्णन केलें आहे

यदेतत्कालिन्दीतनुतरतरङ्गाकृति शिवे
कृशे मध्ये किंचिज्जननि तव यद्भाति सुधियाम् ।
विमर्दादन्योन्यं कुचकलशयोरन्तरगतं
तनूभूतं व्योम प्रविशदिव नाभिं कुहरिणीम् ॥ ७८ ॥

हे शिवे, तुझ्या कृश असलेल्या मध्यांत–उदराचें ठिकाणीं यमुनेच्या अतिसूक्ष्म तरंगासारखें जें कांहीं तुझ्या भक्तांना दिसतें, तें जणुं कांहीं तुझ्या स्तनयुगामध्यें असलेले आकाश स्तनयुगाच्या सघर्षामुळें अतीव सूक्ष्मरूप धारण करून नाभिकुहरामध्यें प्रवेश करीत आहे.

टीपा — प्रस्तुत श्लोकांतील 'व्योम' शब्द अखिल विश्वाचा निदर्शक आहे व ते विश्व भगवतीच्या शरीराचा एक अत्यंत सूक्ष्म अंश आहे, हा या श्लोकाचा अभिप्राय आहे. आकाश, रोमावलि व यमुना नदी ह्यांचा श्यामवर्ण आहे हें साद्दश्य प्रस्तुत श्लोकांत अनुस्यूत आहे. याहि श्लोकांत मागील श्लोकाप्रमाणें भगवतीच्या नाभीचें व तेथून निघालेल्या रोमावलीचें वर्णन आहे याविषयीं कामेश्वरसूरि म्हणतो—'अत्रोत्प्रेक्षया निदर्शनासहकृतया देवीकुचकलशयोरतिश्लिष्टत्वं भाग्यलक्षण रोमावलेरतिसूक्ष्मत्वं प्रकाशमानता च सूच्यते।'

स्थिरो गङ्गावर्तः स्तनमुकुलरोमावलिलता–
कलावालं कुण्डं कुसुमशरतेजोहुतभुजः।
रतेर्लीलागारं किमपि तव नाभिर्गिरिसुते
बिलद्वारं सिद्धेर्गिरिशनयनानां विजयते ॥ ७९ ॥

हे गिरिसुते भगवति, तुझ्या नाभीचा विजय असो. त्या नाभीला पुढील उपमा देण्यासारख्या आहेत–(१) गंगानदीच्या प्रवाहातील स्थिर भोवरा, (२) स्तनरूपी कळ्यानीं युक्त असलेल्या रोमावलीरूपी लतारेखाच आळें, (३) कामदेवाच्या–मदनाच्या तेजोरूपी अग्नीचें कुंड, (४) रतीचे क्रीडास्थान व (५) भगवान् शंकराच्या नेत्रतपास सिद्धि देणारं गुहेचे द्वार असें तुझें नाभिस्थान अवर्णनीय आहे

'स्तनमुकुलरोमावलिलताकलावालं' यातील कल्पनेचें साधर्म्य ललितासहस्रनामातील खालील नांवांत आढळतें–

'नाभ्यालवालरोमालिलताफलकुचद्वयी।'

निसर्गक्षीणस्य स्तनतटभरेण क्लमजुपो
नमन्मूर्तेर्नाभौ वलिपु शनकैस्त्रुट्यत इव ।
चिरं ते मध्यस्य त्रुटिततटिनीतीरतरुणा
समावस्थास्थेम्नो भवतु कुशलं शैलतनये ॥ ८० ॥

हे शैलतनये भगवति, स्वभावतः कृश असलेला आणि स्तनरूपी तटाच्या भारानें श्रान्त होऊन वांकलेला तुझ्या देहाचा मध्यभाग-कटि, नाभिस्थान व रोमावलि या ठिकाणीं मोडेल कीं काय असें वाटतें त्या तुझ्या देहाच्या मध्यभागाची स्थिति हळूंहळूं ढासळण्याच्या बेतांत आलेल्या नदीच्या कांठावरील वृक्षासारखी झालेली दिसते.

टीप—कटीची कृशता व भारयुक्त स्तन हीं स्त्रियांना भूषणभूत आहेत. प्रस्तुत श्लोकांत वर्णन केलेल्या अवस्थेचें साम्य थोड्याफार फरकानें खालील श्लोकात आढळून येतें—

'वयं येभ्यो जाताश्चिरमपगता एव खलु ते
समं यैः संवृद्धाः स्मृतिविपयतां तेऽपि गमिताः ।
इदानीमेते स्मः प्रतिदिवसमासन्नपतना
गतास्तुल्यावस्थां सिकतिलनदीतीरतरुभिः ॥'

प्रस्तुत श्लोकाचा आशय कामेश्वरसूरीनें खालीलप्रमाणें दिला आहे—

'अत्र मध्यत्रुटनस्य सकलजगद्विलयहेतुत्वात् सकलजगत्सर्जन-हेतुभूतदेवीवलग्नस्य त्रुटनाभावो जगत्क्षेमलाभाय आशास्यते। तव मध्यस्यातिसूक्ष्मत्वेऽपि अतिसारवत्वं सूचितम् ।'

कुचौ सद्यः स्विद्यत्तटघटितकूर्पासभिदुरौ
कपन्तौ दोर्मूले कनककलशाभौ कलयता ।
तव त्रातुं भङ्गादलमिति वलग्नं तनुभुवा
त्रिधा नद्धं देवि त्रिवलि लवलीवल्लिभिरिव ॥ ८१ ॥

हे देवि, तत्काल निर्माण होणाऱ्या घामानें ज्यांचे पार्श्वभाग डबडबले आहेत व त्यामुळें ज्यावरील वस्त्र-कंचुकी तुटण्याच्या बेतांत आहे, जे

बाहुमूलांचें ठिकाणीं घासले जात आहेत व जे सुवर्णकलशाप्रमाणें शोभून दिसत आहेत अशा तुझ्या स्तनांना निर्माण करणाऱ्या कामदेवानें तुझा कृश असलेला मध्यभाग (कंबर) मोडून जाऊं नये म्हणून त्याचें रक्षण करण्यासाठीं येवढें बंधन पुरेसें आहे असा विचार करून त्यावरील असलेल्या त्रिवलीरूपी लवली नांवाच्या वेलीच्या तीन वेढ्यांनीं तो बांधून ठेवला आहे.

टीपा — भगवान् शंकरांविषयीं असलेल्या अनुरागातिशयामुळें भगवतीच्या ठिकाणीं जो सात्त्विक भाव निर्माण होतो त्यामुळें तिच्या अंगाला घाम सुटतो, असें टीकाकार वर्णन करतात.

ललितासहस्रनामांत ह्याच अर्थाचा एक श्लोकार्ध आहे तो असा—

'स्तनभारदलन्मध्यपट्टबन्धवलित्रया ।'

गुरुत्वं विस्तारं क्षितिधरपतिः पार्वति निजा-
न्नितम्बादाच्छिद्य त्वयि हरणरूपेण निदधे ।
अतस्ते विस्तीर्णो गुरुरयमशेषां वसुमतीं
नितम्बप्राग्भारः स्थगयति लघुत्वं नयति च ॥ ८२ ॥

हे पार्वति, पर्वतराज हिमालयानें आपल्या नितंबापासून गुरुत्व व विस्तार काढून कन्याधन म्हणून तुला अर्पण केले–तुझ्या ठिकाणीं ठेवलें आणि म्हणून तुझ्या नितंबाचा विस्तार व गुरुत्व संपूर्ण पृथ्वीला झांकून टाकीत आहेत आणि तिला न्यूनत्व आणीत आहेत.

टीपा — हरण म्हणजे विवाहाचे वेळीं पित्यानें कन्येस दिलेलें धन म्हणजे आंदण हा अर्थ दाखविणारें स्मृतिवचन असें—

'यौतकादिषु यद्देयं स्वदायो हरणं च तत् ।'

कालिदासानेंहि रघुवंशांत 'सत्त्वानुरूपं हरिणीकृतश्रीः' असें म्हटले आहे. हें स्त्रीधन दोन प्रकारचें आहे असें हारीतमुनींनें सांगितलें आहे—

'अध्यग्न्यध्यावाहनिकं हरणं स्त्रीधनं स्मृतम् ।'

अध्यग्नि म्हणजे विवाहकालीं होमाजवळ पित्यानें कन्येला दिलेलें धन आणि अध्यावाहनिक म्हणजे लग्नानंतर वर जेव्हां वधूला बरोबर घेऊन आपलें घरीं जावयास निघतो त्या वेळीं पित्यानें कन्येला दिलेलें धन. ह्या दोन्ही प्रकारच्या धनाला स्त्रीधन ही संज्ञा आहे.

कांहीं टीकाकार 'हरण' ऐवजीं 'भरण' पाठ घेऊन 'आयुधें शस्त्रें इत्यादींचें दान' असा अर्थ करतात. महिषासुरवधाचे वेळीं इंद्रादि देवांनीं भगवतीस जीं विविध आयुधें दिलीं त्यांस उद्देशून 'भरण' शब्द आहे.

या श्लोकाशीं समानार्थक असे सप्तशतींतील श्लोक येणेंप्रमाणें—

'स ददर्श ततो देवीं व्याप्य लोकत्रयं त्विषा ।
पादाक्रान्त्या नतभुवं किरीटोल्लिखिताम्बराम् ॥
क्षोभिताशेषपातालां धनुर्ज्यानिःस्वनेन ताम् ।
दिशो भुजसहस्रेण समन्ताद् व्याप्य संस्थिताम् ॥'

**करीन्द्राणां शुण्डान् कनककदलीकाण्डपटली-**
**मुभाभ्यामूरुभ्यामुभयमपि निर्जित्य भवति ।**
**सुवृत्ताभ्यां पत्युः मणतिकठिनाभ्यां गिरिसुते**
**विजिग्ये जानुभ्यां विबुधकरिकुम्भद्वयमपि ॥ ८३ ॥**

हे गिरिकन्ये, श्रेष्ठ अशा हत्तींच्या सोंडांना व सोनेरी केळीच्या खांबांना अशा दोघांनाहि तुझ्या दोनहि मांड्यांनीं जिंकून पतिदेवतेस जमिनीवर गुडघे टेकवून वारंवार प्रणाम केल्यामुळें घट्ट व वर्तुलाकार झालेल्या तुझ्या दोन गुडघ्यांनीं तूं इंद्रादि देवांच्या ऐरावताच्या दोन्हीं गंडस्थळांनाहि पराभूत केले आहेस.

लक्ष्मीधर 'विजिग्ये' ऐवजीं 'विधिज्ञे' असा पाठ घेतो.पण 'विजिग्ये' हाच पाठ योग्य वाटतो.

स्त्रीसौंदर्याचें वर्णन करतांना स्त्रीच्या मांड्यांना हत्तीच्या सोंडेची किंवा कदलीस्तम्भाची उपमा देतात. कालिदासानेंहि अशाच उपमा पुढील श्लोकांत दिल्या आहेत—

"नागेन्द्रहस्तास्त्वचि कर्कशत्वा-
देकान्तशैत्यात्कदलीविशेषाः ।
लब्ध्वापि लोके परिणाहिरूपं
जातास्तदूर्वोरुपमानबाह्याः ॥"

प्रस्तुत श्लोकांत भगवतीच्या मांड्यांचें व गुडघ्यांचें वर्णन आहे. भगवतीच्या मांड्या केळीच्या खांबापेक्षांहि अत्यंत सरस व सुकुमार आहेत आणि गुडघे ऐरावताच्या गंडस्थळाप्रमाणें वर्तुळाकार व सुदृढ आहेत.

पराजेतुं रुद्रं द्विगुणशरगर्भौ गिरिसुते
निषङ्गौ जङ्घे ते विषमविशिखो बाढमकृत ।
यदग्रे दृश्यन्ते दश शरफलाः पादयुगली-
नखाग्रच्छद्मानः सुरमकुटशाणैकनिशिताः ॥ ८४ ॥

हे गिरिकन्ये, शंकरावर विजय मिळविण्यासाठीं म्हणजे त्यास जिंकण्यासाठीं मदनानें तुझ्या पिंढऱ्या ह्या दहा बाणांनीं युक्त असलेले दोन सुंदर भातेच बनविले आहेत. कारण त्यांच्या अग्रभागीं इंद्रादि देवांच्या मुकुटरूपी शस्त्राला धार लावण्याच्या पाषाणावर धार लावून तीक्ष्ण केलेली दहा बाणांचीं पातीं तुझ्या दोन पायांच्या बोटांच्या दहा नखांच्या मिषानें स्पष्ट दिसत आहेत.

टीपा—कामदेवाला विषमविशिख म्हणतात. त्याचें कारण असें कीं, कामदेवाचे बाण पांच म्हणजे विषम आहेत. विषम म्हणजे दुःखदायक असाहि अर्थ होतो. हे पांच बाण म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे अनुक्रमें कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक या पंचेंद्रियांचे विषय आहेत. संस्पर्शज भोग हे दुःखदायक होत असें गीतावचन आहे तें असें—

'ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।'

मागील पांचव्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विष्णूनें मोहिनीरूप धारण करून तुझ्या कृपेनेंच शंकरास मोहित केलें. तसेंच मदनानेंहि तुझ्या कृपेनें शंकरावर विजय मिळविला हा संदर्भ प्रस्तुत श्लोकांत आहे.

भगवतीच्या पिंढऱ्या व पायांच्या बोटांचीं नखें अतिरम्य असल्याचें प्रस्तुत श्लोकांत वर्णन आहे. पिंढऱ्याला भात्याची व त्या अनुरोधानें नखांना बाणांच्या पात्यांची दिलेली उपमा अत्यंत मनोवेधक आहे.

श्रुतीनां मूर्धानो दधति तव यौ शेखरतया
ममाप्येतौ मातः शिरसि दयया धेहि चरणौ ।
ययोः पाद्यं पाथः पशुपतिजटाजूटतटिनी
ययोर्लाक्षालक्ष्मीररुणहरिचूडामणिरुचिः ॥ ८५ ॥

हे दयानिधे देवि, वेदांचीं मस्तकें म्हणजे उपनिषदें तुझ्या चरणांना शिरोभूषण म्हणून धारण करतात. तुझ्या चरणांचें प्रक्षालन करण्याचें जल म्हणजे भगवान् शंकराच्या जटाजूटांतील गंगानदीच होय आणि तुझ्या दोन्ही पायांना लावलेल्या लाक्षारसाची तांबूस लाल शोभा विष्णूच्या मुकुटांतील रत्नांची कांति होय. असे हे तुझे चरण माझ्या मस्तकावर कृपा करून धारण कर.

टीपा—कविराज शर्मानामक टीकाकारानें 'अरुणहरि' ऐवजीं 'अरुणहर' असा पाठ घेतला आहे. पण तो युक्त नाहीं. कारण शिवमस्तकावर मुकुट नसून जटाजूट आहे. ही टीका अद्यापि अप्रकाशित आहे. त्याची एक हस्तलिखित प्रत आमच्या संग्रहांत आहे.

*श्रुतिमूर्धानः* म्हणजे वेदांचीं मस्तकें म्हणजेच उपनिषदें. हीं उपनिषदें अखिल विश्वाला कारणीभूत असलेल्या देवतेचें प्रतिपादन करतात आणि म्हणून भगवतीचें चरण हीं उपनिषदें शिरोभूषण म्हणून धारण करतात असें म्हटलें आहे. कामेश्वरसूरि म्हणतात—'समस्तवेदान्तप्रतिपाद्याविमौ भवत्पादाविति भावः।' सर्व लोकांना पावन करणारी आणि शंकराच्या जटाजूटांत स्थित असलेली पवित्र गंगानदी हेंच भगवतीच्या पादप्रक्षालनाचें जल आहे आणि विष्णूच्या मुकुटांतील रत्नांना भगवतीच्या पायाला लावलेल्या लाक्षारसाचा स्पर्श झाल्यामुळें तें अरुणवर्ण दिसत आहेत. हा प्रस्तुत श्लोकाचा भावार्थ.

उपनिषदें हीं सायुज्यमुक्ति देतात व जन्ममरणाचा फेरा चुकवून मोक्ष देतात. तद्वतच देवीच्या चरणस्पर्शानेंहि सायुज्य मुक्ति मिळते. पहिल्या चरणांतील कल्पनेचें सादृश्य वसिष्ठसंहितेंतील खालील श्लोकांत आढळतें.

'नमो देव्यै महालक्ष्म्यै श्रियै सिद्ध्यै नमो नमः।
ब्रह्मविष्णुमहेशानवेदकैः पूजिताङ्घ्रये ॥'

भगवतीच्या कृपेनें साधकाची इच्छा पूर्ण होते या अर्थाची पुढील श्रुति पाहा—

'यं कामये तं तमुग्रं कृणोति तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम्।
अहं रुद्राय धनुरातनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्त वा उ ॥'

नमोवाकं ब्रूमो नयनरमणीयाय पदयो-
स्तवास्मै द्वन्द्वाय स्फुटरुचिरसालक्तकवते ।
असूयत्यत्यन्तं यदभिहननाय स्पृहयते
पशूनामीशानः प्रमदवनकङ्केलितरवे ॥ ८६ ॥

हे भगवति, नयनरम्य अशा तुझ्या दोन्ही चरणांना आम्ही नमस्कार करतों. तुझे हे दोन चरण सुंदर दिसणाऱ्या मेंदीच्या लाक्षारसाच्या लालसर वर्णानें कान्तियुक्त आहेत. पशुपति शंकर तिच्या पादाघाताची इच्छा करीत असल्यामुळें ते प्रमदवनातील अशोकवृक्षाशीं अतीव असूया करतात.

टीपा– पद्मिनी जातीच्या स्त्रीच्या पादप्रहारानें अशोकवृक्ष बहरतो अशी कविकल्पना आहे. निरनिराळ्या वृक्षांचे दोहद रामकवीनें दिले आहेत ते असे —

'पादाहत्या त्वशोको वदनमदिरया केसरः पाणिस्पर्शा-
च्चूतो वीक्षाहसाभ्यां तिलकतरुनमेरुप्रियालुश्च गत्या ।
संलापात्कर्णिकारः कुरवकतरुरालिङ्गनात्सिन्दुवारः
श्वासात्स्त्रीणां विकासं भजति च मदरागेण चम्पश्च शरसी ॥'

इतरहि बरेच वृक्ष स्त्रीच्या गीतादिकांनीं फुलतात भगवान् पशुपतीसुद्धां भगवतीचा पादाघात मिळण्याची इच्छा करतात. प्रमदवनांतील अशोकास तें भाग्य मिळतें पण शंकरास नाहीं म्हणून ते अशोकाशीं असूया करतात. कविराज शर्मा प्रमदवनाविषयीची पुढील कथा उद्धृत करतो —

एके काळीं भगवान् शिव व भगवती त्रिपुरसुंदरी एका वनांत क्रीडा करीत होती त्या वेळीं शिवदर्शनास सप्तर्षि आले पण त्यांच्या येण्यानें रतिक्रीडेत व्यत्यय आल्यामुळें भगवतीनें क्रुद्ध होऊन सप्तर्षींना शाप दिला की, या वनांत शिवाशिवाय जो कोणी अन्य पुरुष येईल तो स्त्रीरूप होईल. तेव्हांपासून या वनास प्रमदवन असें नांव मिळालें.

आध्यात्मिकदृष्ट्या अशोक म्हणजे शोकरहित आणि पशुपति म्हणजेहि शोकरहित होय कारण जीव हे पशु असून संसारांतील आसक्तीमुळें ते बद्ध आहेत आणि शिव हा जिवाचा अधिपति म्हणजे संयमी होय. अर्थात् पशुपति म्हणजे शोकरहित व बद्ध न असलेला होय.

खालील श्लोकाचा मथितार्थ हाच आहे—

‘ पाशबद्धस्तथा जीवः पाशमुक्तः सदाशिवः ।
पाशबद्धः पशुः प्रोक्तः पाशमुक्तः पशुपतिः ॥ ’

प्रत्येक मनुष्यात जीवभाव व शिवभाव बरोबरीनेंच राहतात म्हणून बद्ध जीवातील अन्तरात्मा शिव नेहमीं नि.सग राहण्यासाठीं भगवतीच्या पादस्पर्शाची व अशोक शोकरहित होण्याची स्पृहा नेहमीं करीत असतो

**मृषा कृत्वा गोत्रस्खलनमथ वैलक्ष्यनमितं**
**ललाटे भर्तारं चरणकमले ताडयति ते ।**
**चिरादन्तःशल्यं दहनकृतमुन्मीलितवता**
**तुलाकोटिक्वाणैः किलिकिलितमीशानरिपुणा ॥ ८७॥**

हे भगवति, तुझ्या नांवाचा उल्लेख करण्यांत चूक केल्यामुळें शिव पश्चात्ताप पावून लाजेनें नम्र झाला तेव्हा तुझ्या चरणकमलाचा तुझ्या पतीच्या कपाळीं आघात होत असताना उत्पन्न झालेला तुझ्या नूपुराचा झणत्कार हा फार पूर्वीपासून अतःकरणात डाचत असलेल्या आपल्या दहनाच्या शल्याचें उन्मूलन करणारा शिवाचा शत्रु म्हणजे मदन याचा जणू काहीं आनदद्योतक किलकिल आवाज होय

**टीपा**—पूर्वोक्त श्लोकात भगवतीनें आपणास चरणप्रहार न केल्यामुळें अशोकवृक्षाची असूया शकरास वाटल्यामुळेंच जणू ह्या श्लोकात तिनें त्याच्या कपाळीं चरणप्रहार करून त्याची इच्छा पूर्ण केली असें दिले आहे. कामशास्त्रात स्त्रीच्या चरणाचा प्रहार पतीस होणें हा शृगाराचा भाग सम जला आहे

ज्या शकरानें पूर्वी आपल्या तृतीय नेत्रातील तेजानें कामदेवाला भस्म केलें त्यानेंच पत्नीची लाथ खाल्ल्यामुळें तो कामदेवाच्या उपहासाचा विषय झाला आणि त्यानें आनदानें किलकिल असा आवाज केला

गोत्रस्खलन म्हणजे नावाची चूक शकराच्या मस्तकावरील जटतील गगा ही त्याची द्वितीय पत्नी म्हणून पुराणातरीं वर्णिली आहे शकरानें पार्वतीस गगेच्या नावानें चुकून हाक मारल्यामुळें सवतीमत्सरानें तिन रागावून त्याच्या कपाळीं लत्ताप्रहार केला असें ह्या श्लोकांत वर्णिन आहे

हिमानीहन्तव्यं हिमगिरिनिवासैकचतुरौ
निशायां निद्राणं निशि च परभागे च विशदौ ।
परं लक्ष्मीपात्रं श्रियमतिसृजन्तौ समयिनां
सरोजं त्वत्पादौ जननि जयतश्चित्रमिह किम् ॥ ८८ ॥

हे माते, तुझे दोन चरण कमलांनाहि जिंकतात यांत काय आश्चर्य आहे ? कारण कमलाचा नाश बर्फसमूहामुळें होतो, तर तुझे चरणकमल हिमालयपर्वतावर वास्तव्य करण्यास समर्थ आहेत. कमल रात्रीं निद्रित होते म्हणजे मिटतें, तर तुझें चरणकमल रात्रीं व दिवसाहि विकसित असतात. कमल हें लक्ष्मीचें निवासस्थान आहे तर तुझें चरणकमल समयमार्गानें उपासना करणाऱ्या उपासकांना त्यांच्या इच्छेपेक्षांहि अधिक लक्ष्मी वैभव देतात.

टीपा—कांहीं टीकाकारांनीं प्रस्तुतचा श्लोक मागील दोन श्लोकांपूर्वी घेतला आहे.

भगवतीचें चरणकमल नैसर्गिक कमलापेक्षां कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहेत असें ह्या श्लोकांत वर्णिलें आहे.

या श्लोकांतील 'परभाग' शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे रात्रीहून अन्य भाग म्हणजेच दिवस, आणि दुसरा अर्थ म्हणजे रात्रीचा पुढील भाग–शेवटचा भाग अर्थात् उषःकाल 'निशि च परभागे' ह्या पाठाऐवजीं 'निशि चरमभागे' असेंहि पाठांतर कांहीं ग्रंथांतून आहे. चरमभाग म्हणजे शेवटचा भाग अर्थात् उषःकालाचा भाग.

भगवतीचें चरणकमल लक्ष्मी प्राप्त करून देतात याविषयीं प्रमाणभूत श्लोक चर्चास्तवात आहेत ते असे—

'पृथ्वीभुजोऽप्युदयनप्रवरस्य तस्य
विद्याधरप्रणतचुम्बितपादपीठः ।
तच्चक्रवर्तिपदवीप्रणयः स एष–
स्त्वत्पादपङ्कजरजःकणजः प्रसादः ॥
लक्ष्मीवशीकरणकर्मणि कामिनीना–
माकर्षणव्यतिकरेषु च सिद्धमन्त्रः ।
नीरन्ध्रमोहतिमिरच्छिदुरप्रदीपो
देवि त्वदङ्घ्रिजनितो जयति प्रसादः ॥'

कांहीं ग्रंथांतून 'समयिनां' ऐवजीं 'प्रणयिनां' असा पाठभेद घेतला आहे. 'प्रणयिनां' म्हणजे प्रणयी भक्ति करणाऱ्यांच्या.

ललितासहस्रनामांत देवीला 'समयाचारतत्परा' असें नांव असून याचा अर्थ समयाचाराप्रमाणें वागणाऱ्या उपासकांवर कृपा करणारी असा आहे.

शाक्त उपासकांचे दोन प्रमुख भेद आहेत—(१) समयाचार व (२) कौलाचार. कौलमार्गास वाममार्ग असेंहि नांव असून त्यांत बाह्यपूजेला अधिक महत्त्व आहे. समयमार्ग म्हणजे भगवतीची अन्तर्ध्यानानें उपासना करण्याचा मार्ग. अम्बास्तवांतील खालील श्लोकांत मानसपूजेचें वर्णन आहे—

'आविर्भवत्फलकसंहतिभिः शरैश्च
निष्यन्दमानसलिलैर्नयनैश्च नित्यम् ।
वाग्भिश्च गद्गदपदाभिरुपासते ये
पादौ तवाम्ब भुवनेषु त एव धन्याः ॥

या अन्तर्ध्यानाचें विविध प्रकार आहेत—

(१) योगमार्गानें कुण्डलिनी उत्थापन करून सहस्रदलकमलांत नेऊन तेथें शिवशक्तिऐक्याचें ध्यान करणें.

(२) नाभीचें ठिकाणीं किंवा हृत्कमलांत भगवतीचें ध्यान करणें.

(३) ॐ किंवा ह्रीं ह्या बीजाचें नादरूपानें ध्यान करणें.

कौलमार्ग हा बाह्यपूजेचा आहे. त्यांत कुण्डलिनीचें उत्थापन किंवा नादानुसंधान इत्यादि प्रकार नाहींत. आत्मानुभव घेणें हेंहि नाहीं. बाह्यमूर्ति अथवा यंत्र ह्याचीच पूजा करणें ह्या मार्गांत आहे. शिवाय यांत पंचमकारांचा उपयोग आहे.

पदं ते कीर्तीनां प्रपदमपदं देवि विपदां
कथं नीतं सद्भिः कठिनकमठीकर्परतुलाम् ।
कथं वा बाहुभ्यामुपयमनकाले पुरभिदा
यदादाय न्यस्तं दृषदि दयमानेन मनसा ॥ ८९ ॥

हे देवि, तुझें चरणकमल कीर्तीचें स्थान असून दोषांना किंवा संकटांना तेथें मुळींच थारा नाहीं. कविजनांनी तुझ्या चरणांची कासवाच्या पाठीवरील

कठीण कवचाशीं तुलना कशी केली हें समजत नाहीं. त्रिपुरासुराचा वध करणाऱ्या शिवानें विवाहसमयीं तुझे चरण आपल्या हातांनीं उचलून मोठ्या काळजीपूर्वक सहाणेवर–शिळेवर कसे ठेवले?

टीपा — कैवल्याश्रमाच्या मतें हा श्लोक मद्रास व केरळदेशीय प्रतींत नाहीं 'कथ वा' ह्या पाठाऐवजीं कांहीं टीकाकारांनीं 'कथंचित्' हा पाठ घेतला आहे व हाच सयुक्तिक वाटतो. 'कथं वा' ह्या पाठानें शंकरावर एक आक्षेप ध्वनित होतो. म्हणजे 'कशी शक्यता आहे?' 'कशा प्रकारें?' इत्यादि असमर्थतेचा ध्वनि सूचित होतो तें योग्य नाहीं. 'दयमानेन' ह्या चतुर्थ चरणांतील शब्दानें 'त्यानें–शंकरानें दयार्द्र होऊन' असा अर्थ असल्यानें असमर्थतेच्या पोटीं कांहीं दया उपजत नाहीं. तर 'कथंचित्' ह्या पाठानें 'हळुवारपणें' असा अर्थ होऊन दयार्द्रता ध्वनित होते व तेंच योग्य आहे.

'पुरभिदा' ह्या तृतीय चरणांतील शब्दानें त्रिपुरासुराचा नाश शंकरानें केल्याचा प्रताप किंवा प्रभाव दर्शविला आहे. त्रिपुरासुर हा कठीण धातूंच्यापेक्षाहि दणकट होता. त्यालाहि शिवानें तीक्ष्ण बाणानें ठार मारलें पण तुझ्या पायांना हालविण्यास मात्र तो कसा तरी हळुवार झाला हा भाव येथे अभिप्रेत आहे. सामर्थ्यवान् व अगडबंब त्रिपुरासुराला—बळकट धातुमय अंग असलेल्या राक्षसाला मारण्याचे शर अधिक वजनदार व दणकट असणारच शिवाय ते शर धारण करणारे हातहि किती बळकट असतील हें सांगावयास नकोच अशा त्या दणकट हातांनी हळुवारपणें व दयार्द्रपणें तुझे कोमल चरणकमल उचलून विवाहसमयीं सहाणेवर ठेवलें हा भाव.

विवाहसमयीं सहाणेवर दोघांनीं म्हणजे उभयतां पतिपत्नींनीं सप्तपदी-नंतर अश्मारोहण—सहाणेवर उभें राहावयाचें असतें. 'आतिष्ठेममश्मानमश्मेव त्वं स्थिरा भव' असा मंत्र म्हणून वरानें वधूचे चरण उचलून सहाणेवर ठेवावयाचे असतात.

'स्त्रियो मेध्यास्तु सर्वत.' ह्या वचनानुसार स्त्रिया सदा पवित्र असतात. अशा पवित्र स्त्रीचा चरणस्पर्श कधीं अपवित्र नसतो. स्त्रियांना प्रमुख देवतां-नींहि अनुग्रह करून पावित्र्य दिलें आहे. विवाहाचे वेळीं पहिल्या रात्रीं सोमदेव–चंद्रमा तिला वर देतो कीं, ती सदासर्वकाळ शुद्ध असो. दुसऱ्या रात्रीं गंधर्वराज विश्वावसु तिला वर देतो कीं, तिचा आवाजहि शुद्ध व कोमल

असो तिसऱ्या रात्रीं यज्ञपुरुष तिला वर देतो कीं, तिनें वाग्मेल तें खावें अशा प्रकारें या तिन्ही देवतानीं वर दिल्यानें ती निर्दोष, निष्पाप व निष्कलंक होऊन तिच्या चरणाचें वंदन पुण्यकारण होतें ह्याचें आधारभूत वचन 'सोम प्रथमो विविदे गन्धर्व ' इ हा मन्त्र होय

अशी ही स्त्री गृहस्वामिनी झाल्यावर लौकिक कन्यासुद्धा देवताच्या अनुग्रहामुळें तेजस्विनी होते भगवती तर अलौकिक कन्या ती अखिल विश्वाच्या भरणपोषणाचें कार्य करण्यास समर्थ आहे हें ओळखूनच तिच्याशीं विवाह करून तें कार्य तिच्यावर सोंपवून स्वत शंकर उदासीन राहिले असें करण्यांत शंकराचा विश्वाविषयींचा उदारभावच स्पष्ट होत आहे

प्रस्तुत श्लोक काहीं प्रतीत नसल्यानें प्रारंभी सांगितलेंच आहे तेंहि युक्त वाटतें कारण ह्यापूर्वीच्या व नंतरच्या श्लोकांत भगवतीच्या चरणाचें वर्णन असून त्यामधील श्लोकांत तिच्या चरणामार्चे वर्णन कसें हा प्रश्न येतो

नखैर्नाकस्त्रीणां करकमलसंकोचशशिभि–
स्तरूणां दिव्यानां हसत इव ते चण्डि चरणौ ।
फलानि स्वःस्थेभ्यः किसलयकराग्रेण ददतां
दरिद्रेभ्यो भद्रां श्रियमनिशमह्नाय ददतौ ॥ ९० ॥

हे चण्डि, तुझे चरण आपल्या अतीव रमणीय व निर्मल असलेल्या नखरूपी चंद्रानीं स्वर्गांगनाच्या करकमलाना संकुचित करतात असे तुझे चरण स्वर्गांतील वृक्षाना–कल्पवृक्षाना जणू काहीं हसत आहेत कारण ते कल्पवृक्ष नवपल्लवरूपी कराग्रानें नेहमीं तृप्त असलेल्या स्वर्गांतील देवानाच फल देतात पण तुझें चरणकमल दरिद्री लोकानाहि सत्वर आणि मत्त्वर वैभवयुक्त करतात

टीपा—'हसत ' या क्रियापदावर श्लेष आहे त्याचा एक अर्थ हसतात व दुसरा अर्थ म्हणजे उपहास–तिरस्कार करतात तसेंच ' स्व स्थ ' शब्दहि द्व्यर्थी आहे पहिला अर्थ 'स्वावलंबी, समाधानी ' असा असून दुसरा अर्थ ' स्वर्गांत राहणारा–देव ' असा आहे

भगवतीच्या चरणाचीं नखें रमणीय व निर्मल असल्यामुळें तीं जणू चंद्रच आहेत अशी कल्पना आहे व त्यामुळें स्वर्गांगनाच्या करकमलांना त्यांचा स्पर्श झाल्यावर तीं मुकुलित होतात म्हणजेच देवस्त्रिया ह्या भगवतीच्या चरण कमलाना हात जोडून वंदन करतात हा भावार्थ

